


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

. टिळक रस्ता, पुणे ४११०३०

महाराष्ट्र साहित्य परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार २५ जुलै १९९३ रोजी सायंकाळी ४-३० वाजता परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात भरणार आहे. सर्व सभासदांनी या सभेस उपस्थित राहावे ही विनंती.

डॉ. म. वि. गोखले
कार्याध्यक्ष

अनुक्रमणिका

## महाराष्ट्र साहित्य परिषदेची संग्राह्य प्रकाशने

■

मराठी वाङ्मयाचा इतिहास

(१३५० ते १६८०) खंड २ रा

संपादक- स. गं. मालशे

रु. ११०/-

■

मराठी वाङ्मयाचा इतिहास

(१९२० ते १९५०) खंड ६ भाग १

संपादक- गो. म. कुलकर्णी, डॉ. व. दि. कुलकर्णी

रु. १३५/-

■

मराठी वाङ्मयाचा इतिहास

(१९२० ते १९५०) खंड ६ भाग २

संपादक- गो. म. कुलकर्णी, डॉ. व. दि. कुलकर्णी

रु. १३५/-

■

भाषा व साहित्य : संशोधन

खंड ३

संपादक- डॉ. वसंत जोशी, प्रा. म. ना. अदवंत

रु. ८०/-

■

*प्राप्तिस्थळ*

■

*कार्यवाह*

**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे ४११०३०

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २६५, एप्रिल-जून १९९३



**संपादक :** वि. स. वाळिंबे

संपादन समिती : प्रा. म. द. हातकणंगलेकर, डॉ. वि. भा. देशपांडे
प्रा. विजय कसबेकर, हरी नरके, संतोष शेणई



**मुखपृष्ठ :** रविमुकुल



**या अंकाची किंमत : २५ रुपये**
वार्षिक वर्गणी (संस्थांसाठी : ७५ रुपये)
आजीव सदस्य शुल्क ५०० रु. वार्षिक सदस्य शुल्क ५० रु.

- महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकास अनुदान दिले असले तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच असे नाही.
- या नियतकालिकाच्या प्रकाशनार्थ महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले आहे.

मुद्रक - प्रकाशक : डॉ. गं. ना. जोगळेकर, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०. (दूरभाष : ४४२९६३)
अक्षरजुळणी : प्रमोद प्रिंटर्स, ११२०, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.
मुद्रणस्थळ : स्मिता प्रिंटर्स, १०१९, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

# अंतरंग



लेखांतील मतांशी संपादक सहमत असतीलच असे नव्हे

अनुक्रमणिका

# *संपादकीय*

**विविध ठिकाणी साजरे झालेले साहित्य-सोहळे**

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे सातवे विभागीय संमेलन गेल्या २३ आणि २४ जानेवारी रोजी डोंबिवली येथे साजरे झाले. परिषदेच्या डोंबिवली आणि कल्याण येथील शाखांनी या संमेलनाचे संयुक्त संयोजन केले होते. ज्येष्ठ विनोदी कथाकार प्रा. द. मा. मिरासदार यांनी या संमेलनाचे अध्यक्षस्थान भूषविले होते. डोंबिवली आणि कल्याण येथील साहित्य रसिकांच्या सक्रिय सहकार्यामुळे संमेलनाच्या संयोजकांना विशेष समाधान वाटणे स्वाभाविक होते.

प्रा. मिरासदार मुख्यतः विख्यात आहेत ते विनोदी लेखक म्हणून. त्यामुळे त्यांच्या भाषणात विनोदासंबंधी विवेचन येणे अपरिहार्य होते.

'जीवनात आनंद फुलविण्याचे सामर्थ्य केवळ विनोदातच असते' हे अनेक उदाहरणे देऊन सिद्ध केल्यावर आपल्या भाषणाचा समारोप करताना प्रा. मिरासदार म्हणाले :

"या रूक्ष आणि शुष्क मानवी जीवनात आनंद फुलवणारा संजीवनी मंत्र फक्त विनोदच देऊ शकतो. सगळे विसरून पुन्हा एकदा हे जीवन आनंदाने जगावे हे सामर्थ्य विनोदाचा हा संजीवनी मंत्रच माणसास देत असतो."

'स्वभावनिष्ठ विनोद हाच शाश्वत टिकणारा विनोद होय' असे प्रा. मिरासदार यांनी उपहास, विडंबन यांचे सामर्थ्य किती मर्यादित असते यासंबंधी बोलताना प्रतिपादन केले.

कामगार कल्याण मंडळाच्या वतीने दुसरे कामगार साहित्य संमेलन नागपूर येथे फेब्रुवारीच्या प्रारंभी आयोजित करण्यात आले होते. या संमेलनाच्या अध्यक्षपदी प्रसिद्ध साहित्यिक श्री. बाबूराव बागूल यांची निवड झाली होती.

'नवीन ऊर्जेच्या सहवासात राहणाऱ्या कामगारांनी आणि ग्रामीण भागातील कष्टकऱ्यांनी वर्णवर्चस्ववादी विचारसरणी नाकारून जाती नष्ट कराव्यात. तसे झाले तरच आपल्या देशाची दुर्दशा करणारी, देशाचा इतिहास हा पराभवाचा इतिहास करणारी आक्रिते नष्ट होतील,' असे आवाहन करून श्री. बागूल यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात 'एकलव्याला अंगठा परत मिळेल, असे लेखन करू या' अशी कामगार साहित्यिकांकडून अपेक्षा व्यक्त केली.

सहासष्टावे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन दैनिक 'लोकसत्ता'चे भूतपूर्व संपादक आणि अनेक यशस्वी संगीत नाटकांचे लेखक श्री. विद्याधर गोखले यांच्या

अध्यक्षतेखाली सातारा येथे १२ आणि १३ फेब्रुवारी रोजी आयोजित करण्यात आले होते. या सोहळ्यासाठी छत्रपती शाहू स्टेडियमवर छत्रपती शिवरायनगर उभारण्यात आले होते. ग्रंथदिंड्या आणि साहित्यिकांच्या स्मृतिज्योती यांच्या देखण्या मिरवणुकीने या साहित्य संमेलनास अत्यंत उत्साहपूर्ण वातावरणात प्रारंभ झाला.

आपल्या अध्यक्षीय भाषणात श्री. विद्याधर गोखले म्हणाले :

"घसघशीत आर्थिक पुरस्कार आणि पारितोषिके यांच्या खिरापतींनी साहित्याची उंची वाढत नाही. त्यामुळे दुय्यम दर्जाच्या लेखकांचा माज मात्र वाढू शकतो म्हणून ग्रंथोपजीवींना लाचार बनविणारे पुरस्कारांचे खूळ आणि कलहाचे मूळ नाहीसे करणे योग्य ठरेल."

याच संदर्भात त्यांनी पुढे सांगितले :

"साहित्यिकांनी साहित्यधर्म पाळला नाही, तर त्यांच्या लेखणीला तेज कसे येईल? राजकारणाच्या दृश्य-अदृश्य मायापाशांनी आम्ही साहित्यिक जखडले गेलो, साहित्यसृष्टीची सार्वभौमता-स्वायत्तता कळत-नकळत गहाण ठेवू लागलो, लोकाश्रयापेक्षा राजाश्रयाच्या हत्तीवरील अंबारीत आम्ही साहित्यशारदेला बसवू लागलो, तर अमृतातेही पैजा जिंकणारे बोल तिच्या वीणेतून कसे उमटतील?"

या तीन संमेलनांव्यतिरिक्त आणखी दोन साहित्य संमेलने गेल्या काही दिवसांत साजरी झाली.

त्यांपैकी अकरावे मराठी बालकुमार साहित्य संमेलन ठाणे येथे भरले होते. लहान मुलांचे हात बळकट, बुद्धी तरल आणि अंतःकरण विशाल कसे करता येईल हा दृष्टिकोन समोर ठेवून बालसाहित्यिकांनी लेखन करावे, असे या संमेलनाच्या समारोपप्रसंगी अध्यक्षपदावरून बोलताना प्रा. ग. प्र. प्रधान यांनी सांगितले.

पहिले कोथरूड उपनगर साहित्य संमेलन नामवंत समीक्षक डॉ. व दि. कुलकर्णी यांच्या अध्यक्षतेखाली ९ मे रोजी साजरे झाले. पुण्यात उपनगर साहित्य संमेलन आयोजित करण्याची ही पहिलीच वेळ. त्यामुळे या उपक्रमाला कितपत प्रतिसाद मिळतो, यासंबंधी काही जणांकडून शंका व्यक्त केली जात होती, परंतु हा एकदिवसीय साहित्य सोहळा कोथरूडकरांच्या भरगच्च उपस्थितीत साजरा झाला.

मंगेश तेंडुलकर, मोहन शिराळकर, सुभाष नाईक प्रभृतींनी या संमेलनाच्या आखणी-जुळणीत पुढाकार घेतला होता.

साहित्य संमेलनांमुळे काय साधते यासंबंधी बोलताना डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी सांगितले :

'साहित्य संमेलन हे केवळ साहित्यिकांचे नसते. साहित्य-व्यवहारातील सर्वांचे मिळून भरणारे ते संमेलन असते. साहित्य संमेलनांतून स्वतः साहित्यिक नवे काय घेऊन जातात; हे



अनुक्रमणिका







सांगता येणार नाही. पण साहित्यप्रेमिक मात्र खूपसे काही पाहून-ऐकून बरेचसे वेगळे भान घेऊन जातात. या बहुसंख्य साहित्यप्रेमिकांची साहित्याभिरुची विशुद्ध आणि चोखंदळ होण्यास साहित्य संमेलनांसारखी दुसरी गोष्ट नाही.'

गेल्या काही महिन्यांत विविध ठिकाणी आयोजित करण्यात आलेल्या साहित्यसंमेलनांना साहित्यरसिकांनी दिलेली स्वयंस्फूर्त दाद लक्षात घेता अशा सोहळ्यांची आवश्यकता आणि उपयुक्तता जाणवली.

**अभिनंदन**

'वाङ्मयशोभा' या मासिकाचे संपादक आणि 'मनोहर ग्रंथमाला' या प्रकाशनसंस्थेचे संचालक श्री. म. म. केळकर यांनी गेल्या २१ मार्च रोजी ८१ व्या वर्षात पदार्पण केले. 'स्वभावाला औषध नाही आणि दैवापुढे गती नाही' या आत्मकथनातून श्री. मनोहरपंत केळकरांचे जीवनानुभव प्रकट झालेले आहेत. साहित्यावरील निष्ठेपायी ते मासिकाच्या आणि ग्रंथप्रकाशनाच्या क्षेत्राकडे वळले. आजच्या अनेक प्रथितयश लेखकांनी आपल्या कारकीर्दीचा प्रारंभ 'वाङ्मयशोभे'मधूनच केलेला आहे. नवोदितांचे लेखनगुण हेरून त्यांना प्रोत्साहन देण्यात केळकरांनी सदैव पुढाकार घेतला. त्यांचे हे कार्य साहित्याच्या विकासाच्या दृष्टीने फार मोलाचे ठरते. 'मनोहर ग्रंथमाले'च्या प्रकाशनांना विशिष्ट दर्जा प्राप्त झाला, याचे श्रेय श्री. केळकर यांच्या चिकित्सक दृष्टीला दिले पाहिजे.

अनिरुद्ध साहित्य या प्रकाशन संस्थेचे प्रमुख श्री. गजानन क्षीरसागर हे कल्पक गृहस्थ आहेत. त्यांनी प्रकाशित केलेली विज्ञानावरील पुस्तके पाहिली की त्यांची कल्पकता जशी जाणवते, तसाच त्यांच्या या गुणाचा आणखी एक आविष्कार म्हणजे 'प्रकाशन डायरी'. १९६८ पासून गेली पंचवीस वर्षे गजाभाऊ क्षीरसागरांची 'प्रकाशन डायरी' नियमितपणे प्रसिद्ध होत असे. तिची उपयुक्तता वादातीत असल्यामुळे गजाभाऊंच्या या उपक्रमाला चांगला प्रतिसाद लाभला.

आता त्यांनी 'डायरी'ला रजा दिली असून या वर्षापासून 'प्रकाशन वार्षिक' प्रसिद्ध करण्यास प्रारंभ केलेला आहे. साहित्यिक आणि साहित्यव्यवहाराशी संबंधित असलेल्या व्यक्ती यांना जी माहिती तपशीलवार उपलब्ध असावी असे वाटते, ती या प्रकाशन वार्षिकामध्ये अंतर्भूत करण्यात आलेली असल्यामुळे 'डायरी'प्रमाणे श्री. क्षीरसागर यांचा वार्षिकाचा उपक्रमही यशस्वी होईल, असा विश्वास वाटतो.

ज्येष्ठ नाट्यसमीक्षक, महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे आणि 'पत्रिके'च्या संपादन समितीचे सदस्य डॉ. वि. भा. देशपांडे यांचा मराठी रंगभूमीसंबंधीचा व्यासंग सर्वपरिचित आहे. मराठी नाट्यसृष्टीची विशेषता विशद करणारे त्यांचे ग्रंथलेखन मान्यता पावलेले आहे. डॉ. देशपांडे आता एका नव्या प्रकल्पाकडे वळलेले आहेत.











रंगभूमीविषयक शब्दकोश तयार करण्याचे कार्य त्यांनी हाती घेतले असून त्यासाठी त्यांना विद्यापीठ अनुदान मंडळाकडून दीड लाख रुपयांचे अनुदान मिळणार आहे. रंगभूमीच्या संदर्भातील शब्दकोश तयार करण्याचे कार्य या निमित्ताने प्रथमच होत असून आपल्या चिकाटीच्या बळावर श्री. देशपांडे ते नियोजित काळात पूर्ण करतील, याची खात्री वाटते.

**शोकसमाचार**

श्री. नानासाहेब गोरे यांच्या निधनामुळे महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनातील एक वडीलधारे व्यक्तिमत्त्व अंतर्धान पावले आहे. केवळ महाराष्ट्राच्याच नव्हे, तर भारताच्या गेल्या साठ-पासष्ट वर्षांतील वाटचालीमध्ये नानासाहेबांचा सहभाग होता.

महाविद्यालयीन शिक्षण पुरे केल्यावर नानासाहेबांनी स्वातंत्र्यसंग्रामामध्ये प्रवेश केला. त्यापायी त्यांना अनेक वेळा कारावासही सोसावा लागला. काँग्रेस समाजवादी पक्षाची प्रस्थापना करण्यात नानासाहेबांचा पुढाकार होता. पुढे प्रजासमाजवादी पक्षाचे अध्यक्षपदही त्यांच्याकडे आले. १९४२ चे भारत छोडो आंदोलन, संयुक्त महाराष्ट्राचा आणि गोव्याच्या मुक्तीचा लढा हे नानासाहेबांच्या कार्यशील जीवनातील त्यांची झुंजार वृत्ती प्रकट करणारे समर प्रसंग.

समताधिष्ठित समाजव्यवस्था अस्तित्वात यावी, हा नानासाहेबांचा ध्यासविषय झालेला होता.

नानासाहेब केवळ राजकीय नेते नव्हते. ते उत्कृष्ट नखचित्रकार होते. तशीच त्यांची अभिरुची अभिजात होती. या अभिजात अभिरुचीचे दर्शन त्यांच्या सर्वच लेखनात आढळते– मग ते अमेरिकेहून धाडलेले एक साधे वार्तापत्रही का असेना.

नानासाहेबांचा साहित्य परिषदेशी घनिष्ठ संबंध होता. १९७०-७३ या काळात त्यांनी परिषदेचे अध्यक्षपद भूषविले होते.

१ मे रोजी पहाटे झोपेत नानासाहेबांचे निधन झाले, हा विलक्षण योगायोग म्हटला पाहिजे. कारण १ मे हा जसा महाराष्ट्रदिन, तसाच कामगार दिनही.

महात्मा ज्योतिबा फुले यांच्या विचारांचे पुरस्कर्ते आणि ज्येष्ठ सत्यशोधक विचारवंत श्री. रामचंद्र नारायण चव्हाण यांचे १० एप्रिल रोजी निधन झाले. ते ७९ वर्षांचे होते.

श्री. चव्हाण महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांच्या सहवासात आले आणि तेव्हापासून ते हरिजन उद्धाराच्या कार्यात सहभागी झाले. दलितांसाठी त्यांनी केलेले बहुमोल कार्य लक्षात घेऊन महाराष्ट्र शासनाने त्यांना १९८३ मध्ये 'दलितमित्र' या पुरस्काराने गौरविले.

श्री. चव्हाण यांनी १९३६ पासून वैचारिक प्रबोधनाला चालना देणारे अनेक लेख लिहिले. राष्ट्रवीर, समाजप्रबोधन, नवभारत, अस्मितादर्श, मराठा जागृती आदी अनेक

नियतकालिकांमध्ये त्यांचे लेखन प्रसिद्ध होत असे. चिंतनशील समाजसेवक म्हणून रा. ना. चव्हाण यांना सर्वत्र मान्यता लाभली होती.

विदर्भातील एक ज्येष्ठ साहित्यिक आणि समीक्षक प्रा. मधुकर केचे यांचे २५ मार्च रोजी अमरावती येथे देहावसान झाले.

तेथील केशरबाई लाहोटी महाविद्यालयात मराठी विभागाचे प्रमुख म्हणून त्यांनी अनेक वर्षे कार्य केले. १९८५ मध्ये विदर्भ साहित्य संघाच्या कारंजी येथे भरलेल्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावर त्यांची निवड झाली होती.

'आसवांचा ठेवा', 'पुनवेचा थेंब', 'चेहरेमोहरे', 'वेगळे कुटुंब', 'इंदू एक बिंदू दोन', 'पुष्पांजली' आदी त्यांची पुस्तके विशेष लोकप्रिय ठरली.

'वसुधा' या मासिकाचे संपादक श्री. वसंतकुमार सराफ यांचे गेल्या ३१ जानेवारी रोजी निधन झाले.

श्री. सराफ यांची प्रकृती गेली काही वर्षे ठीक नव्हती. त्यांना यापूर्वी हृदयविकाराचे चार झटके येऊन गेले होते. त्यामुळे अलीकडे ते निवृत्तीचे जीवन व्यतीत करीत होते. परंतु सुरुवातीच्या काळात 'वसुधा' मासिकाने वेगळ्या प्रकृतीचे मासिक म्हणून लौकिक संपादन केला होता. 'वसुधा'पाठोपाठ 'ललना' आणि 'शामसुंदर' ही मासिकेही श्री. सराफ यांनी सुरू केली. 'नवलेखन प्रकाशना'च्या रूपाने ते ग्रंथ प्रकाशनाच्या क्षेत्रातही उतरले होते.

प्रयोगशील संपादक असा लौकिक श्री. सराफ यांना लाभला होता.

या सर्व मान्यवरांना भावपूर्ण श्रद्धांजली.

**वि. स. वाळिंबे**

**मनोहर माधव अळतेकर**

# प्रा. न. र. फाटक : एक निर्भीड संशोधक

सुमारे दीड-दोन वर्षांपूर्वीची गोष्ट. विलेपार्ल्याचा इतिहास लिहिणाऱ्या दोघांपैकी एक लेखक श्री. फणसळकर ह्यांच्याकडून आणून लोकमान्य सेवासंघाचे पहिल्या दहा वर्षांचे वृत्तांत वाचीत होतो. हे वार्षिक वृत्तांत वाचताना, एक शोधावे व दुसरेच अकस्मात सापडावे असे झाले. लोकमान्य सेवासंघाची व पहिल्या टिळक मंदिराची स्थापना १९२३ साली झाली. प्रा. न. र. फाटक आम्ही पार्ल्याला राहायला जाण्यापूर्वी म्हणजे मार्च १९२९ पूर्वी पार्ल्यात राहत हे मला माहीत होते. पण आणखी काहीच माहिती नव्हती. लोकमान्य सेवासंघाच्या वार्षिक वृत्तांतात मला काही नोंदी आढळल्या. "फाटकांनी एप्रिल १९२६ मध्ये १८५७ सालच्या बंडावर पाच व्याख्याने दिली. व्याख्याने नवीन माहितीने ओतप्रोत भरलेली होती–" ही एक नोंद.

ऑगस्ट १९२७ मध्ये श्री. न. र. फाटक यांनी 'अमेरिकेतील स्वातंत्र्ययुद्ध' या विषयावर अशी चार व्याख्याने दिली. १९५८ साली चित्रशाळेने प्रसिद्ध केलेला 'शिपाईगर्दी' हा ग्रंथ फाटकांनी लिहिला. सत्तावन्नच्या बंडाचे व त्यात भाग घेतलेल्या झाशीची राणी लक्ष्मीबाई, नानासाहेब पेशवे व तात्या टोपे ह्यांचे सर्वसामान्यांच्या मनात जे वाजवीपेक्षा जास्त उदात्तीकरण झाले होते, त्याचे भंजन प्रा. फाटकांनी आपल्या रोखठोक व फटकळ भाषेत आणि युक्तिवादात केले होते. प्रत्येक ठिकाणी पुरावा दिला होता. 'ना मूलं लिख्यते किंचित्' हे तर प्रा. फाटकांचे जणू ब्रीदवाक्य होते. त्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत आलेल्या उल्लेखावरून लेखकाचे लक्ष ह्या विषयाकडे १९१५ पासून होते. त्यांनी वाचलेल्या पुस्तकांची टिपणे केली होती. मात्र १९२६ च्या एप्रिलमध्ये १८५७ च्या बंडावर दिलेल्या भाषणमालेचा 'शिपाईगर्दी'च्या प्रस्तावनेत उल्लेख आढळत नाही.

जे जे आपणासी ठावे ते ते इतरांसी सांगावे व इतरेजनांना शहाणे करावे हा प्रा. न. र. फाटकांचा रामदासी बाणा जो त्यांच्या समग्र आयुष्यात प्रामुख्याने दिसतो, त्याचा प्रारंभ पार्ल्याला दिलेल्या व्याख्यानमालेत झाला असावा, असे वाटते. १९६८ च्या एप्रिल महिन्यात प्रा. फाटकांना ७५ वर्षे पूर्ण झाली. १५ एप्रिल रोजी त्यांच्या जन्मतारखेच्या दिवशी त्यांचा साहित्य संघात मोठा सत्कार करण्यात आला व त्या वेळी त्यांच्या चरित्राची, त्यांच्या ग्रंथांची व भाषणमालांची माहिती देणारे एक टिपण प्रसिद्ध करण्यात आले. त्या टिपणात केवळ साहित्य संघात १९५३ ते १९६६ पर्यंत झालेल्या भाषणमालांची यादी दिली आहे.

तशाच भाषणमाला ब्राह्मणसभेत व ग्रंथसंग्रहालयात झाल्या आहेत त्यांचा उल्लेख नाही. नुसती विषयांची यादी व त्यातील विविधता पाहूनच मन थक्क होते.

मध्यंतरी काही काळ लोटला व १५ एप्रिल १९९३ हा प्रा. न. र. फाटकांच्या जन्मशताब्दीचा दिवस जवळ येऊ लागला. प्रा. फाटकांच्या शब्दांत सांगायचे म्हणजे ते मला माझ्या जन्मापासून ओळखत होते. संबंध घरोब्याचा होता. अभ्यासासाठी एम.ए.च्या वर्गात त्यांची भाषणे ऐकली. वेगवेगळी पुस्तके, लेख व झालेले वाद वाचले. सार्वजनिक व्याख्याने ऐकली. माहितीने भरलेली पण तितकीच परखड संभाषणे ऐकली. ऐकली म्हणजे अक्षरश: ऐकली. त्या गुरूचे व्यक्तिमत्व इतके प्रखर होते की मधेच बोलण्याचा व तेसुद्धा बेसावधपणे बोलण्याचा धीर होत नसे. कितीही समीप गेले तरी वयामुळे व आदरामुळे अंतर हे राहीच. ग्रंथ वाचताना, भाषणे ऐकताना किंवा बोलणे ऐकताना भरपूर नवी माहिती मिळे, अगदी वेगळे विचार व केलेले मूल्यमापन ऐकावयास मिळे. प्रा. फाटकांचे सहज बोलणे ऐकणे हेच एक शिक्षण असे. त्याला प्राचीन व अर्वाचीन व्यक्तींच्या वेधक आठवणींची, घटनांची तसेच त्यासंबंधीच्या तिरकस शेऱ्यांची जोड मिळत असल्यामुळे थोडे अंतर ठेवून का होईना पण सारखे ऐकावेसे वाटे.

समर्थ रामदासांचे आणखी एक वचन प्रा. फाटकांनी आजन्म व अहोरात्र शिरोधार्य मानले होते– 'दिसामाजी काही तरी ते लिहावे। प्रसंगी अखंडीत वाचीत जावे.' घरी केव्हाही गेला तरी ह्या पुरुषाचे वाचन, लेखन व टेबल-खुर्चीजवळच असलेल्या पलंगावर पडून थोडी विश्रांती व मनन चालू असे. सर्व खोली व टेबल हे पुस्तकांनी भरलेले असे. मराठी, हिंदी, संस्कृत व इंग्रजी ह्या विविध भाषांतील शेकडो पुस्तके गुण्यागोविंदाने एकत्र नांदत असत. कोणी भेटायला आला की समोरचा कागद व लेखणी तर कधी पुस्तक नजरेआड होई आणि एखादा चिकित्सक विद्यार्थी, विचार करून वाचणारा व लिहिणारा एखादा लहानमोठा लेखक ह्यांच्याबरोबर कधी प्रश्नोत्तरांचा तर कधी केवळ गप्पांचा तास सुरू होई. काही अडले की प्रा. फाटकांच्याकडे जायचे हा केवळ माझाच नव्हे, तर कित्येक विद्यार्थ्यांचा, होतकरू अभ्यासकांचा व संशोधकांचा प्रघात असे. कधी विन्मुख यावे लागत नसे.

पत्रकार म्हणून प्रा. फाटकांची कारकीर्द प्रदीर्घ व स्मरणीय आहे. १९१७ ते १९३५ अशा दीर्घ काळाची आहे : (१) १९१८ ते १९२४ विविधज्ञान विस्तार (२) १९१८ ते १९२४ इंदुप्रकाश सहसंपादक; ज्ञानप्रकाश व नवाकाळ उपसंपादक. १९२३ ते १९३५ पर्यंत विविधवृत्त, प्रकाश साप्ताहिक ह्यांमधून स्तंभलेखन, अग्रलेख, स्फुटे व समीक्षण हे लेखन 'अंतर्भेदी', 'फरिस्ता', 'मराठा', 'आलमगीर' ह्या टोपणनावांनी झाले. वृत्तपत्रांमधूनच त्यांचे काही गाजलेले टीकालेख येऊन गेले.

हैद्राबाद साहित्य संमेलनाचे अध्यक्ष झाल्यावर एका सत्कारसभेत प्रा. फाटक म्हणाले,

"मी प्रथम वृत्तपत्रकार, नंतर प्राध्यापक व ग्रंथकार आहे" आणि मिस्किलपणे पुढे म्हणाले होते, "अहो, ही माझी उसनी ऐट आहे." काकासाहेब खाडिलकर अध्यक्ष झाल्यावर म्हणाले होते, "मी प्रथम नाटककार व नंतर पत्रकार आहे." एकंदर पत्रकाराचे लेखन हे आज सर्वत्र लोकप्रिय असलेल्या झटपट पदार्थाप्रमाणे (फास्ट फूड) असते. तसे फाटकांचे लेखन चटकदार व खमंग होते, पण त्याचा उगम अविरत व्यासंगातून व ज्ञानोपासनेतून झाला होता. बारीकसारीक तपशिलाचा हव्यास, उणेपणा किंवा तर्कदुष्टपणा हेरण्याची सूक्ष्मदृष्टी व रोखठोक विवेचन करून अगदी कोरड्या शब्दांत दुसऱ्या पक्षाला वा मताला नामोहरम करण्याचा आवेश असे काही गुण फाटकांच्यात वृत्तपत्रलेखनामधून आले असावेत.

प्रा. न. र. फाटकांचे वृत्तपत्रांमधून व नियतकालिकांमधून आणखी वेगळ्या प्रकारचे लेखन प्रसिद्ध झाले आहे. 'इतिहास व संस्कृती' ह्या त्रैमासिकाच्या 'कै. न. र. फाटक विशेषांका'त संपादक खोबरेकरांनी फाटकांनी लिहिलेल्या फुटकळ लेखांची एक व्यापक यादी दिली आहे. यादीतील विषयांची विविधता व विपुलता बघून विस्मय वाटतो. हे अक्षरशः शेकडोंनी लिहिलेले लेख, लेखमाला, आठवणी, व्यक्तिचित्रे पाहिली, अनेक विषयांत फाटकांना असणारा रस पाहिला की त्यांच्या चौकसपणाचे कौतुक करावे, वाचनाच्या वेडाचे करावे की त्यासाठी त्यांनी घेतलेल्या अपरंपार कष्टाचे करावे हेच कळत नाही. रामायण, महाभारत, भगवत्गीता असो किंवा एखादा ज्वलंत, वर्तमान विषय असो, त्याची माहिती व तीसुद्धा काटेकोर, तपशीलवार मिळाल्याशिवाय ह्या वाचनवेड्या जगावेगळ्या माणसाला स्वस्थ बसवत नसे. फाटकांची वृत्तपत्रकार म्हणून कारकीर्द १९१७ ते १९३५ अशी आहे. पुढे फाटक प्राध्यापक झाले. पण फाटक जन्मजात किंवा हाडाचे पत्रकार होते. त्यामुळे मृत्युपूर्वी एक वर्ष म्हणजे १९७८ पर्यंत वृत्तपत्रांतील व नियतकालिकांतील त्यांचे लेखन सतत चालू होते. वयाच्या ८५ व्या वर्षापर्यंत हा क्रम चालू होता.

रोज पुस्तक हातात धरल्याशिवाय व लेखणी कागदाला लावल्याशिवाय ह्या तपस्वी पुरुषाला स्वस्थ वसवतच नसावे. लेखनाचे विषय अभिजात असोत, तत्कालीन असोत किंवा राजकीय, सामाजिक वा धार्मिक असोत, फाटक आपल्या लेखनात तपशिलाला पक्के असतात. कोठेही कल्पनाशक्तीवर, अंदाजावर ते अवलंबून राहत नाहीत आणि हीच अपेक्षा ते इतर लेखकांच्याकडून करीत. भोंगळपणा किंवा बारीकसारीक चुकासुद्धा त्यांना खपत नसत. आणि त्या दृष्टीने ते पुस्तकावर, व्यक्तीवर टीका करीत. अनेकांना ही टीका दोषैक दृष्टीची वाटे. फाटकांना फक्त उणेच दिसते, चांगलेपणा दिसत नाही अशी ज्यांना त्यांचे प्रहार सहन करावे लागले त्यांना व एकंदर गोळाबेरीज वाचणाऱ्या वाचकांना वाटे. हैदराबाद साहित्य संमेलनाचे अध्यक्ष झाले तेव्हा सत्कारसभेत उत्तरादाखल केलेल्या भाषणात फाटक शेवटी म्हणाले होते, "माझी दृष्टी वर टिळक, भांडारकर, तेलंग ह्यांच्याकडे असते, त्यामुळे



अनुक्रमणिका

मला फक्त दोषच दिसतात असे अनेकांना वाटते. मी समोर बघत नाही, खाली बघत नाही, वर ह्या विद्वानांकडे बघतो."

एखाद्या विषयाचा अभ्यास करीत असले की फाटक व्याख्यान किंवा व्याख्यानमाला देत. महाभारत, रामायण, ना. गोखले, १८५७ चे बंड ह्यांवर त्यांनी व्याख्यानमाला दिल्या आहेत व त्यावरच पुढे ग्रंथ लिहिले आहेत. ही त्यांची लेखनपद्धती होती. श्री. खोत्ररेकरांनी केलेल्या यादीत बहुतेक लेखांचा, लेखमालांचा व व्याख्यानमालांचा समावेश झाला आहे.पण त्यांच्याही नजरेतून काही लेख, काही व्याख्याने सुटली असावीत. अगदी प्रारंभीच दिल्याप्रमाणे १९२६-२७ मध्ये विलेपार्ले येथे फाटकांनी दोन व्याख्यानमाला '१८५७ चे बंड' व 'अमेरिकन स्वातंत्र्ययुद्ध' ह्यावर दिल्या. पुढे लोकमान्य सेवासंघाचा सुवर्ण महोत्सव झाला, त्या वेळी निघालेल्या स्मरणिकेत 'विलेपार्ले' ह्यावर त्यांनी सुरेख लेख लिहिला आहे. असेच काही लेख व व्याख्यानमाला दुर्लक्षित राहिल्या असण्याची शक्यता आहे. प्रा. फाटकांच्या विपुल, विविध व जवळजवळ ६० वर्षांच्या प्रदीर्घ कालखंडातील साहित्यनिर्मितीच्या मागे धावावे लागते व असे धावताना धाप लागते. आयुष्यातील शेवटच्या दोन-तीन वर्षांत 'आत्मवृत्त' ह्या सदराखाली फाटकांनी सुमारे ४५ लेख 'साप्ताहिक लोकप्रभा'त लिहिले आहेत. असे वेचक लेख जरी गोळा केले, तरी माहितीपूर्ण, वाचनीय अशी कित्येक पुस्तके तयार होतील.

एक न्यायमूर्ती रानडे ह्यांचे चरित्र सोडल्यास फाटकांचे सर्व लहानमोठे ग्रंथ हे वयाच्या पन्नाशीनंतरचे आहेत. मागे कोणीतरी लागल्याशिवाय फाटक लिहू शकत नसत. १९३५ नंतर फाटक प्रथम एस.एन.डी.टी.त, तर त्यानंतर १९३७ सालापासून ते निवृत्त होईपर्यंत रुईया कॉलेजात प्राध्यापक होते. उभयतांच्या सुदैवाने वि. पु. भागवत व श्री. पु. भागवत हे शिष्य फाटकांना मिळाले. त्यांच्या आग्रहामुळे व मौज प्रकाशनामुळे ज्ञानेश्वर, एकनाथ व रामदास ही चरित्रे फाटकांच्या हातून लिहून झाली. व्यासंगामुळे, विवादामुळे, लिहिलेल्या लेखांमुळे व दिलेल्या व्याख्यानांमुळे ह्या ग्रंथांची पूर्वतयारी कित्येक वर्षे चाललीच होती. एक प्रसंग मला अजून आठवतो. वयाची ८० वर्षे उलटून गेल्यावर मुंबई महानगरपालिकेच्या विनंतीवरून 'मुंबई नगरी'चे लेखन चालू होते. वयामुळे व बोटांना सूज आल्यामुळे लिहिताना त्रास होत होता. तसेच कष्टाने फाटक लिहीत होते. मात्र अक्षर बारीक व वळणदार होते. मध्यंतरी महानगरपालिकेतील राजकारणामुळे लेखन बरेच खंडित झाले होते व लांबणीवर पडले होते- माझ्याकडे लेखकांचा हा भीष्माचार्य तक्रार करीत होता. "अगोदर का लिहून ठेवले नाहीत ?" मी विचारले. "गरज असल्याशिवाय मला लिहिता येत नाही." "कुणाला तोंडी मजकूर का सांगत नाही ?" माझा दुसरा सवाल. "मला तोंडाने मजकूर सांगता येत नाही". अगोदर लेखन झाले असते तर 'मुंबापुरी' हे पुस्तक अधिक व्यापक व परिपूर्ण झाले असते. इतकी माहिती फाटकांच्याकडे ठासून भरली होती. उत्तर-

वयात ग्रंथलेखन झाले त्याचा एक फायदा झाला. विचारात व भाषेत प्रगल्भता आली. विचार ठाम झाले. मला अजूनही त्यांच्या एका गोष्टीचा विस्मय वाटतो तो म्हणजे त्यांची अद्भुत स्मरणशक्ती ! वृद्धपणामुळे स्मरणशक्ती अनेकांना दगा देते, पण बाळपणी व तरुणपणी होती तितकीच प्रखरता प्रा. फाटक यांच्या स्मरणशक्तीत अखेरपर्यंत होती. सगळ्या तारखा, सन, घटना, व्यक्ती त्यांच्या डोक्यात हात जोडून उभ्या असत. बोलताना किंवा लिहिताना पाचारण केले की तत्परतेने त्या हजर होत. शरीर थकले पण बुद्धीची धार व स्मरणशक्तीचा प्रखरपणा शेवटपर्यंत कायम होता.

रानडे, गोखले, टिळक, एकनाथ, श्री. ज्ञानेश्वर, नाट्याचार्य खाडिलकर, समर्थ रामदास, यशवंतराव होळकर इतक्या पुरुषांची चरित्रे फाटकांनी लिहिली. 'मुंबईचे मानकरी' व 'सहा महापुरुष' असे चरित्रविषयक लेख लिहिले आहेत. कित्येकांच्या आठवणी व व्यक्तिचित्रे लिहिली आहेत. 'शिपाईगर्दी' व व्याख्यानमालेवरून तयार केलेले 'मराठेशाहीचे विहंगावलोकन' ह्या इतिहासात घटनांच्याबरोबर अनेक लहानथोर स्त्रीपुरुषांची चरित्रे समाविष्ट झाली आहेत. इतिहास म्हणजे थोर, शूर व कर्तबगार पुरुषांची चरित्रे अशी एक व्याख्या आहे. सारांश : प्रा. फाटकांनी प्रामुख्याने लिहिले ते चरित्रवाङ्मय होय. मराठी इतिहासाचे फाटक हे उत्तम जाणकार होते. चरित्र नसलेले व कालखंड घेऊन त्याची चिकित्सा करीत लिहिलेले फाटकांचे अभ्यासपूर्ण पण तितकेच अप्रिय पुस्तक म्हणजे 'शिपाईगर्दी'. पण राजवाडे किंवा सरदेसाई ह्यांच्या तोडीचे किंवा जातीचे फाटक हे इतिहासकार नाहीत. कारण त्यांच्याप्रमाणे चिकाटीने बैठक मारून त्यांनी पाठपुरावा केला नाही, असे सेतु माधवराव पगडी म्हणतात.

चरित्रे ही साधारण स्तुतिपर असावीत, अशी आपल्याकडे अनेक वर्षे चालत आलेली एक समजूत आहे. (आता ती तितकीशी नाही.) रानडे, गोखले व एकनाथ तसेच ज्ञानेश्वर ह्यांची चरित्रे ह्या कसोटीला उतरतात. पण लोकमान्य व रामदास ह्यांच्या चरित्रात मात्र फाटक चरित्रनायकांचे काही दोष व मर्यादा तपशीलवार, पुराव्यासह मांडतात. फाटकांच्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे अनेक चरित्रमूर्तींच्यावर व त्या चरित्रात येणाऱ्या अनेक व्यक्तींच्यावर आंधळ्या आदराची व भक्तीची शेंदराची पुटे जी वर्षानुवर्षे चढलेली असतात, ती ते खरवडून काढतात व सत्यदर्शन घडवतात. पण रानडे व गोखले ही फाटकांची श्रद्धास्थाने आहेत. आणि श्रद्धा ही डोळस असली तरी थोडी आंधळी असतेच. त्यामुळे टिळकांची परीक्षा करताना जो मापनदंड ते वापरतात त्यापेक्षा थोडा वेगळा ते रानडे व गोखले ह्यांच्याविषयी योजताना दिसतात. टिळकांनी मामलेदार होण्यासाठी अर्ज केला होता; टिळक दारूबंदी चळवळ चालवीत, पण त्याच वेळी देशी साखर कारखान्यांना दारू गाळण्याची परवानगी सरकारने दिली पाहिजे, असे म्हणण्यातील विसंगती फाटक दाखवतात. चिपळूणकरांनी 'चित्रशाळा' सुरू केली आणि इतर काही उद्योग केले, तेव्हा

त्यांचा स्वार्थत्याग टिळक-आगरकरांसारखा बावनकशी नाही; न्यू इंग्लिश स्कूल काढताना तसे उदात्त ध्येय चिपळूणकरांच्या समोर नव्हते. त्यांना सरकारी शाळा ओस पाडायची होती, अशा तशा खऱ्या पण क्षुल्लक गोष्टी फाटक तत्परतेने देतात. पण आपल्या दोन आराध्य देवतांच्याबद्दल मात्र मौन पाळतात. आगरकर व गोखले ह्यांच्याबद्दल फाटक एक मनोरंजक विधान करतात. 'गोखले हे खऱ्या अर्थाने आधुनिक (मॉडर्न) होते. आगरकर तसे नव्हते. आगरकर धोतर नेसत, बंडी घालत व त्यांना शेंडी होती.' आगरकरांचे विचार व त्यांनी आपल्या ओजस्वी व द्रष्ट्या लेखांमधून केलेला उच्चार किती सुधारलेला व पुढारलेला होता, आधुनिक होता, हे सांगण्याची गरज नाही. गोखल्यांच्या विचारांची व आचारांची इमारत ही आगरकरांच्या सुधारणावादावर उभी होती. आणि पोशाखावरून कोणी आधुनिक व सनातनी थोडाच ठरतो? विलक्षण चिकित्सक अशा फाटकांच्याकडून हे विधान होते ह्याचे कारण त्यांना गोखल्यांच्याबद्दल असणारा असीम जिव्हाळा! खुद्द फाटकच ह्या चरित्रात दुसऱ्या एका ठिकाणी लिहितात, 'गोखले इंग्लंडला जाईपर्यंत त्यांना शेंडी होती.' आणि खुद्द फाटकांचा वेष कसा होता? आखूड पंचेवजा धोतर, अंगात साधा सदरा, साधा कोट व केसांचे पूर्ण निर्दाळण केलेल्या डोक्यावर काळी टोपी! आता अशा वेषातील फाटकांची सामाजिक मते पूर्ण पुरोगामी होती, आधुनिक होती.

गोखले व आगरकरांविषयीची ही झाली लहान गोष्ट. पण सुरत काँग्रेसमध्ये झालेली भांडणे आणि जहाल व मवाळातील फूट असो किंवा टिळक मंडालेहून सहा वर्षांच्या कारावासातून सुटून आल्यानंतर १९१४ साली जहाल व मवाळांनी एकत्र यावे म्हणून झालेले प्रयत्न असोत, फाटकांची याकडे बघण्याची दृष्टी पूर्वग्रहदूषित आहे असे स्पष्ट दिसते. फाटक सगळा तपशील बरोबर देतात, पण त्यावरून निष्कर्ष काढताना मात्र त्यांचे पारडे टिळकांच्या विरुद्ध बाजूला गोखल्यांच्याकडे झुकते. 'भारतसेवक' ह्या चरित्राचे परीक्षण करताना डॉ. य. दि. फडक्यांनी फाटकांनी दिलेल्या तपशिलाचा अन्वय आणि अर्थ नेमका उलटा लावला आहे. फाटकांच्याइतकेच डॉ. फडके हेही तपशिलाला, चिकित्सेला पक्के आहेत. त्यामुळे ते एक मार्मिक वाक्य लिहितात : 'चांगले चरित्र लिहिणे म्हणजे चरित्रविषय झालेल्याचे वकीलपत्र घेणे नव्हे.'

प्रा. न. र. फाटकांची अशी एक-दोन मर्मस्थळे आहेत. 'शिपाईगर्दी' हे १८५७ च्या बंडावरचे पुस्तक व 'भारतसेवक' या, नामदार गोखल्यांच्या चरित्राचा विचार केला तरीसुद्धा फाटक जे काही संदर्भग्रंथ, कागदपत्रे, पत्रव्यवहार व समकालीनांचे विचार उपलब्ध आहेत ते सर्व मिळवीत, त्यांचा बारीक नजरेने, तर्कशुद्ध अभ्यास व विचार करीत. आणि त्यानंतर लेखणी हातात धरीत. ह्यात आणखी एका गोष्टीची भर पडते ती म्हणजे फाटकांच्या तिखट व रोखठोक लेखनामुळे येणारी विचारप्रक्षोभता. नामदार गोखल्यांचे चरित्र वाचताना त्यातील टिळक व गोखले ह्या महापुरुषांच्या आयुष्यात आलेल्या संघर्षप्रसंगांचे व

त्यावरील फाटकांच्या स्पष्टोक्तिपूर्ण टिपणांचे वाचन केल्यावर, टिळकभक्त जर प्रक्षुब्ध झाले व लेखकाच्या कुत्सित व दोषैक दृष्टीचा त्यांनी उद्धार केला, तर नवल नाही. फाटकांची माहिती व मते तशी पुराव्यानिशी दिलेली असल्यामुळे नाकारता किंवा खोडता येत नाहीत. वाचकाला विचार करावा लागतो. समग्र घटना, प्रसंग परत डोळ्यासमोर आणावे लागतात. 'शिपाईगर्दी' वाचतानासुद्धा हाच प्रकार होतो. सावरकरांच्या 'स्वातंत्र्यसमरातील' बंडाचे उदात्तीकरण व वीररसपूर्ण काव्यात्मीकरण आठवते. फाटकांची खडबडीत भाषा व त्यापेक्षा त्या वेळच्या बंडखोरांचे किंवा स्वातंत्र्यवीरांचे केलेले वास्तव पण बोचरे वर्णन वाचले की सर्वसामान्य वाचक संतापतो. एकीकडे फाटकांचे वर्णन व विवेचन मनाला पटत नाही, पण त्यांनी पुढे केलेले बिनतोड पुरावे व तपशील नाकारताही येत नाहीत. फाटकांचे लेखन अप्रिय पण पथ्यकर असते हेच खरे. पण ते सर्वच निःपक्षपाती व न्यायी नसते. टिळकांचा अलौकिकपणा, बुद्धिमत्ता, त्याग, धैर्य, देशभक्ती त्यांना मान्य आहेत, पण रानडे व गोखले ह्यांचे गुणवर्णन करताना त्यांचा जो उदारपणा आहे तो टिळकांच्या बाबतीत नसून उलट कंजूषपणा किंवा हिशोबीपणा मात्र जाणवतो. भावनाप्रधानता फाटकांच्यात नाही, पण दिसलीच तर ती गोखले व रानडे ह्यांच्या बाबतीत दिसते. उलट टिळक मात्र तसे कोरडेच राहतात. रानडे, टिळक व गोखले ह्यांची चरित्रे एकत्र वाचली व विचार केला तर ही गोष्ट लक्षात येते.

१९३५ साली फाटक जवळजवळ १९ वर्षे केलेल्या वृत्तपत्रकाराच्या व्यवसायामधून प्राध्यापकाच्या पेशात आले. पण छापण्याच्या शाईचा वास हा फाटक काय किंवा त्या पेशातील दुसरा माणूस काय विसरणे शक्य नसते. विद्वत्ता, व्यासंग हा पत्रकाराच्या पेशाला लागतोच असे नाही. पण फाटक हे सुदैवाने चिपळूणकर, टिळक, आगरकर, शिवराम महादेव परांजपे ह्यांच्या संप्रदायातले होते.

मराठी पत्रकारांची परंपरा वृत्तपत्रांची नसून मतपत्रांची . त्यामुळे विशिष्ट मतप्रणाली, पक्ष ह्यासाठी आणि तेसुद्धा ठामपणे मांडायचे ही सवय पत्रकाराला लागते. लिहावयाचे ते प्रतिपक्षावर घाव घालण्यासाठी किंवा स्वपक्षाचा असल्यास त्याचे कितीही चुकले असले तरी त्याची तळी उचलून धरण्यासाठी, एकांतिकपणे लिहिणे हे एक वळण लागते. कितीही अभ्यासू व व्यासंगी असले तरी प्रा. फाटकांना त्यांच्यातील हा पत्रकार पूर्णपणे विसरणे अशक्य होते.

शांतपणे मूलभूत विचार करून एखादा सिद्धांत किंवा सत्य सांगणे हे फाटकांना अनेकदा जमत नाही आणि ह्याचे मुख्य कारण इतकी वर्षे पत्रकार म्हणून काम केले हे असावे. कोणालाही चिमटा न काढता, घाव न घालता समतोलपणे, नेमस्तपणे लिहिता येते व ते अधिक परिणामकारक ठरते. फाटक विचारात नेमस्त पण लेखणीने मात्र 'कठीण शब्द ह्या धोंड्यांनी हाणाहाण करणारे' आहेत.

अर्वाचीन चरित्रलेखनाकडून ऐतिहासिक चरित्रलेखनाकडे वळले तरी काहीच फरक पडलेला दिसत नाही. कारण लिहिणारे व्यक्तिमत्त्व किंवा वृत्ती एकच आहे, शैली एकच आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ व रामदास ह्या तीन भिन्न कालखंडांतील संतांची चरित्रे लिहिण्याची प्रेरणा १९१५ पासून १९३५-४० पर्यंत महाराष्ट्राच्या १९ व्या व २० व्या शतकातील पूर्वार्धातल्या राजकीय व सामाजिक इतिहासात रममाण झालेल्या फाटकांना होण्याचे कारण त्यांचे महाविद्यालयातील व विद्यापीठातील बी. ए. व एम. ए. चे विद्यार्थी होत. वर्गात शिकविताना ह्या तीन किंवा चार ग्रंथांचा जन्म झाला. त्यातील ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी हे पुस्तक प्रा. फाटकांनीच एका प्रसंगी डॉ. फडक्यांकडे केलेल्या व्याख्येप्रमाणे व्याख्यानांमधून तयार केलेले असल्यामुळे ग्रंथ ह्या संज्ञेस पात्र ठरत नाही. कॉलेजात दिलेल्या व्याख्यानांचा सारांश लिहून तो प्रसिद्ध करण्याचा आग्रह त्यांचे रुइया कॉलेजातील ख्यातनाम विद्यार्थी व मित्र श्रीकृष्ण भागवत यांनी केला. त्यामुळे ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान व ऐतिहासिकदृष्ट्या घडलेले कार्य हे स्थूलमानाने कळण्यासाठी ह्या पुस्तकाचे प्रकाशन झाले. एकनाथ व रामदास ह्यांच्यावरची पुस्तके स्वतंत्र लिहिलेली असल्यामुळे ग्रंथ आहेत. ह्या छोट्या पुस्तकांचे महत्त्व एकच आहे. पुढील चरित्रात दिसणारी ऐतिहासिक काळातल्या संदर्भात विचार करण्याची व त्या त्या संताचे कार्य विशद करण्याची पद्धती ह्या पुस्तकात स्पष्ट दिसते. फाटक स्पष्ट करतात, 'कोणत्याही वाङ्मयकृतीचे रसग्रहण व मूल्यमापन करताना तत्कालीन परिस्थितीचे आकलन आवश्यक आहे. वाङ्मय ही कलाकृती खरी पण ती समाजनिरपेक्ष नसते.' (पृ. २ प्र. १- ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी). त्या दृष्टीने ज्ञानेश्वर हे कर्मयोगाचे कट्टर पुरस्कर्ते आहेत. मुसलमानी आक्रमणामुळे देवाधर्माची जी विटंबना झाली, अनेक देवळे जमीनदोस्त झाली, तिथे मशिदी उभारल्या त्यामुळे निराशेच्या आहारी न जाता आता हिंदू समाज आपले स्वत्व कसे कायम राखील या काळजीतून 'ज्ञानेश्वरी' हा ग्रंथ तयार झाला. (पृ. १०८) ही एक भूमिका सोडल्यास ह्या पुस्तकाचा अधिक विचार करण्याचे कारण नाही. कारण इतर प्रकरणांत जे विवेचन येते ते एकतर त्रोटक व खोलात जाऊन फारसा अभ्यास केलेले नाही.

'एकनाथांचे वाङ्मय आणि कार्य' हा ग्रंथ मात्र चरित्रनायकाशी समरस होऊन फाटक विस्ताराने लिहितात. एकनाथांच्या चरित्राचा, वाङ्मयाचा व कार्याचा आपण कसा अभ्यास केला ह्याचा आढावा लेखक प्रस्तावनेत घेतो. ह्या पुस्तकात प्रामुख्याने एकनाथी वाङ्मयाची ऐतिहासिक दृष्ट्या व तत्त्वज्ञानदृष्ट्या पाहणी करून लेखक आपले विचार मांडतो आणि विचाराबरोबर 'भावार्थ रामायण', 'रुक्मिणी स्वयंवर' आणि 'एकनाथी भागवत' ह्यांची सविस्तर सांगोपांग माहिती देतो. फाटक ह्या पुस्तकात एका प्रकरणात एकनाथांच्या 'काळाचा कानोसा' घेतात. एकनाथांचे चरित्र सांगतात, पण परत लोकस्थितीचा आढावा घेतात. ह्यासंबंधी वाङ्मयाचे विवेचन करताना एकनाथांच्या

काव्यातील कितीतरी उतारे उद्‌धृत करतात. इतकेच नव्हे, तर भावार्थ रामायणात पारतंत्र्यातील परिस्थितीचे कसे प्रतिबिंब पडले आहे त्याचे सोदाहरण वर्णन करतात. ग्रंथाचा बराचसा भाग भावार्थ रामायणाचा सारांश देण्यातच खर्ची पडला आहे. वाचकाने बहुधा काही वाचलेले नाही असे समजूनच फाटक लिहीत असतात. रुक्मिणी स्वयंवराचे वैशिष्ट्य वर्णन करताना त्यातील एकनाथांना वापरलेले प्रकृती-पुरुषाचे रूपक हे अभिनव असून ते सूफी पंथावरून आले असा तर्क करण्यास बळकट जागा आहे, अशी पुस्ती जोडतात. प्रकृती-पुरुषाचे रूपक संस्कृत वाङ्‌मयात येते. 'पार्वती-परमेश्वरौ' हे प्रकृती व पुरुषच आहेत. माया आणि ब्रह्म यांचे वर्णन करतात. ज्ञानदेव माया-प्रकृती ही पुरुषाला कशी गिळते हा खेळ वर्णन करतात. पण एकनाथांच्या बाबतीत त्या काळच्या परिस्थितीशी व परधर्मातील पंथाशी ते कसे समरस झाले होते हे पटवण्याचा फाटकांचा आग्रह दिसतो. एकनाथांच्या वाङ्‌मयाचा व कार्याचा इतका विस्तारपूर्वक विचार केला कारण फाटकांनी लिहिलेले समर्थ रामदासांचे चरित्र.

रामदासांच्यावरचे फाटकांचे लेखन दोन ग्रंथांत विभागले गेले आहे. एक 'श्री समर्थ चरित्र' आणि दुसरे 'रामदास- वाङ्‌मय आणि कार्य.' ह्या दोन्हीपैकी वादग्रस्त ग्रंथ म्हणजे चरित्र. पहिल्या प्रकरणात १६०८ ते १६४८ ह्या काळातील महाराष्ट्राची स्थिती कशी होती, मुसलमानी राज्ये हिंदूंचा छळ करीत होती की काय, सामान्यतः मुसलमानी राजे व हिंदू प्रजा ह्यांचे संबंध कसे होते, ह्या प्रश्नांची चर्चा केली आहे. त्यानंतर तोपर्यंत प्रसिद्ध झालेल्या समग्र चरित्रसाधनांची फाटकांच्या आवडत्या शब्दात 'झडती' घेतली आहे. परत प्रस्तावनेत हे झडतीसत्र प्रथम घेण्यात आले आहे, ते वेगळेच. ह्या पुस्तकाचे मेरुमणी प्रकरण म्हणजे 'शिवसमर्थ भेट' हे होय. पृष्ठ ८९ ते १७० इतका त्या प्रकरणाचा ८० पानांचा विस्तार आहे. कोणतेही मत, सिद्धांत खोडावयाचा असल्यास व तिथे नवे विचार प्रस्थापित करावयाचे असल्यास फाटकांच्या विसंगती हेरणाऱ्या विवेचक व तिरकस लेखणीला एक भलतेच स्फुरण चढते. फाटकांच्या आक्रमक शैलीचा हा एक तेजस्वी पण तितकाच काटेरी विलास आहे. बाकीच्या प्रकरणांत रामदासांच्या चरित्राचे इतर पैलू दिले आहेत. पण वाचकाच्या लक्षात राहते ते शिवसमर्थ-भेट प्रकरण. एकेकाच्या युक्तिवादाचे, पुराव्याचे आणि कल्पनाविभ्रमाचे फाटकांनी जे वाभाडे काढले आहेत त्याला तोड नाही. शिवाजी-रामदास भेट १६७२ साली प्रथम झाली हे फाटकांचे, मिळालेल्या पत्रांच्या व इतर पुराव्यांच्या आधारे झालेले स्पष्ट मत. १६४८ वगैरे अगोदरची सर्व वर्षे त्यांना अमान्य आहेत. 'शिवसमर्थ-भेट' प्रकरण म्हणजेच खरा ग्रंथ इतकी इतर प्रकरणे गौण वाटतात.

रामदासांचे वाङ्‌मय आणि कार्य वाचायला लागले की एकनाथांच्या बाबतीत उदार असणारे फाटक रामदासांच्या बाबतीत मात्र पार कंजूष बनतात. एकनाथ आपल्या दारूण परिस्थितीला तोंड देणारे, नवी आत्मजाणीव निर्माण करणारे व त्यासाठी वाङ्‌मयाचा साधन

म्हणून उपयोग करणारे योजक पुरुष आहेत असे फाटकांना वाटते, तर बिचाऱ्या रामदासांचे 'राजकारणी' हे बिरूद ते हिरावून घेतात व राजकारण म्हणजे व्यवहार-कौशल्य असे बजावतात. एकनाथांचा परिस्थितीसूचक असा प्रत्येक उल्लेख, मग तो कितीही गौण असो, फाटक आवर्जून देतात. साधा भजन-कीर्तनाला जमणारा जमाव हा धर्मप्रवृत्तीप्रमाणेच स्वाभिमानही जागृत करतो हे त्यांचे मत. उलट रामदासांनी गोळा केलेला जमाव त्यांना दुर्लक्षणीय वाटतो. रामदासांचा 'महाराष्ट्रधर्म' हा शब्द व 'मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्र धर्म वाढवावा' ह्याकडे ते दुर्लक्ष करतात. रामदासांनी देवळे उभी केली, मारुतींची स्थापना केली, 'स्वधर्माची' ओळख लोकांना पटवली हे फाटकांना मान्यच नाही. त्यांना ते फक्त पारमार्थिक व मठ स्थापन करणारे आणि शिष्यपरिवार गोळा करणारे म्हणून जाणतात. उलट एकनाथांचे कुठे कुठे आलेले उल्लेख ह्यांचा त्या काळच्या परिस्थितीशी संबंध जोडतात. कवी म्हणून ज्ञानदेव, तुकाराम आणि एकनाथांपेक्षा रामदास गौणच आहेत. लोकमानसावर परिणाम म्हणून जरी पाहिले तरी वारकरी संप्रदाय व त्यांच्या घोषवाक्यात येणारे हे संत आजही पंढरपूर, देहू, आळंदीला लक्षावधी यात्रेकरूंना आकर्षित करतात तसे रामदासांचे नाही. सज्जनगड म्हणजे पंढरपूर किंवा आळंदी नव्हे. रामदासांचे कार्यक्षेत्र मर्यादित आहे. पण त्यात त्यांना योग्य तो न्याय दिला पाहिजे. एकनाथ समाजजागृती करणारे तर रामदास का नाहीत? एकनाथांनी भावार्थ रामायण लिहिले तर रामदासांनी प्रभू रामचंद्रावर बरीच काव्यरचना केली आहे. रामदासांच्या गौरवाचा त्यांच्या भक्तगणांनी अतिरेक केला असेल, अनेक भाकडकथा त्यांच्या नावावर पसरविल्या असतील, पण भक्तांचे प्रायश्चित बिचाऱ्या गुरूला- रामदासांना का? ह्या तीन चरित्रग्रंथांचे, विशेषतः एकनाथ व रामदास ह्यांच्या चरित्रांचे व कार्याचे मूल्यमापन करताना फाटक एकनाथांचे पक्षपाती आहेत. पण ही एक गोष्ट सोडल्यास फाटकांसारखे चरित्रवाङ्मयाचे व इतिहासाचे अभ्यासक मिळणे खरोखरच दुर्मिळ होय.

इतिहासकार फाटकांचे तसे ग्रंथ दोन- 'शिपाईगर्दी' व 'यशवंतराव होळकरांचे चरित्र'. 'मराठेशाहीचे विहंगावलोकन' हे कुठेतरी केव्हातरी दिलेल्या व्याख्यानमालेवरून एक छोटे १५०-१७५ पानांचे पुस्तक आहे. त्या पुस्तकात शाहू महाराज अधिकार ग्रहण करतात तेव्हापासून म्हणजे बाळाजी विश्वनाथांच्यापासून ते थेट पेशवाईअखेरपर्यंतचा इतिहास येतो. पेशवाई झाली तरी ती एका दृष्टीने मराठेशाहीच! सगळे लेखन अगदी त्रोटक व वरवरचे आहे. पण फाटकांचे चांगल्या व वाईट अर्थाने गाजलेले पुस्तक म्हणजे 'शिपाईगर्दी'. सावरकरांचे 'स्वातंत्र्यसमर' फाटक मानायलाच तयार नाहीत. त्यासाठी त्यांनी केलेली कारणमीमांसा कितीही अप्रिय व कटू असली तरी ती खरी आहे. झाशीची राणी लक्ष्मीबाई व तात्या टोपे हे सेनापती या दोन व्यक्ती सोडल्यास ह्या बंडातील कुणाहीबद्दल फाटकांचे मत चांगले नाही. त्यांचे दोष फाटक अगदी निर्दयपणे मांडतात. शिपायांचा

वैयक्तिक पराक्रम काहीही असला तरी त्यांचा एकंदर बौद्धिक व सामाजिक जाणिवांचा वकूब किती कोता होता हे सोदाहरण स्पष्ट करतात. त्या विषयावरील सर्व संदर्भग्रंथांची यादी फाटक देतात, त्यात 'भारतीय स्वातंत्र्यसमरा'चा ते उल्लेख करतात. सबंध विवेचनात या एकेकाळी समग्र भारतातील क्रांतिकारकांना, देशभक्तांना व जनतेला स्फूर्तिदायक झालेल्या ह्या ग्रंथांची संदर्भ म्हणून टीका करण्यासाठी सुद्धा दखल घेत नाहीत. सावरकरांनी बंडाचे उदात्तीकरण सहेतुक केले होते. इंग्रजांच्या विरुद्ध असंतोष व विरोध उभा करण्यासाठी हा ग्रंथ त्यांनी लिहिला. ह्या पुस्तकात इतकी दाहक शक्ती होती की इंग्लंडमध्येच या पुस्तकाची हस्तलिखित प्रत जप्त करण्यात आली. (सुदैवाने त्याची एक हस्तलिखित प्रत पळविण्यात क्रांतिकारक यशस्वी झाले.) पण फाटकांच्या त्या ग्रंथाचा अनुल्लेख खटकल्याशिवाय राहत नाही. त्या काळी तर आचार्य अत्र्यांनी 'शिपाईगर्दी'वर व त्याच्या जनकावर तुफानी हल्ले चढविले होते. बराच भाग भावनाविवशतेचा व शिवराळपणाचा होता, हे मान्य करूनही लोकमत दुखावले होते हे तितकेच खरे.

काळाचे भान म्हणतात ते शिपाईगर्दीत कधी कधी सुटते. १८५७ व त्याअगोदरचे सर्व राजकारण हे धर्मावर व स्वाभिमानावर अधिष्ठित असे. परंपरेचा, वंशाचा अभिमानही असे. ह्या शिपायांना व त्यांच्या पुढाऱ्यांना राष्ट्रीयत्व म्हणजे काय, राष्ट्राभिमान म्हणजे काय याची कल्पना नसल्यामुळे समान दिशा व समान ध्येय नसल्यास नवल नाही. ह्या सर्व कल्पना इंग्रजी अमदानीबरोबर इंग्रजांच्या अद्ययावत शस्त्रांबरोबर आयात झाल्या. इंग्लंडमधील औद्योगिक क्रांतीही पाठोपाठ आली. १८८५ साली राष्ट्रीय सभेची स्थापना झाली तोपर्यंत काही सुशिक्षित विचारवंत चाचपडत होते. आजही राजकारणात धर्माचे, घराणेशाहीचे म्हणजे स्वामिनिष्ठेचे किती प्रस्थ आहे, जातिभेदांनी, बेसुमार स्वार्थाने किती थैमान घातले आहे हे पाहिले की 'शिपाईगर्दी' म्हणून त्यांच्यावर टीका करताना त्याला सहानुभूतीची व समजूतदारपणाची जोड पाहिजे होती असे राहून राहून वाटते. इंग्रजांनी लिहिलेल्या पत्रांवर, कागदपत्रांवर, आठवणींवर व पुस्तकांवर, स्वातंत्र्यसमराचे पुरस्कर्ते, इंग्रजांवर टीका करणारे व बंडवाल्यांचा गौरव करणारे प्रामुख्याने लिहितात हे फाटकांचे म्हणणे मान्य करूनही त्यांनी लेखणीची धार इतकी तीक्ष्ण करणे आवश्यक होते का हा प्रश्न आजही पडतो. 'भारतीय राष्ट्रवादाचा विकास' ह्या पुस्तकाचा निर्देश केल्याखेरीज फाटकांच्यावरील कोणताही लेख अपुरा राहील. गोपीनाथ तळवलकर ह्यांनी 'साधना' मध्ये ११ लेखांक लिहून ह्या पुस्तकाचे परीक्षण केले. आचार्य जावडेकर व आचार्य भागवत ह्यांना ही लेखमाला इतकी आवडली की ती पुस्तकरूपाने प्रसिद्ध करण्यात आली. एका पुस्तकाच्या विस्तृत परीक्षणाचे पुस्तक होणे ही एक अपूर्व गोष्ट होय.

प्रा. न. र. फाटक कसे लिहितात हे सांगून झाले. समग्र, सविस्तर व सप्रमाण लिहावयाचे म्हटले तर कितीही मोठा लेख असला तरी तो अपुराच वाटेल. प्रबंधाची आवश्यकता

वाटावी इतकी लेखक व अभ्यासक म्हणून फाटकांची योग्यता थोर आहे. प्रा. फाटकांच्या अभ्यास-पद्धतीचा व लेखन-पद्धतीचा एक साचा किंवा प्रौढ शब्दात सांगावयाचे म्हणजे आकृतिबंध आहे. एक मात्र वाटते– प्रा. न. र. फाटकांचे 'लोकप्रभा' साप्ताहिकात ४५ लेखांत प्रकाशित झालेले 'आत्मवृत्त' अपुरे असले तरी पुस्तकरूपाने एकत्र आले पाहिजे. त्यात फाटकांचे कितीतरी अनुभव, आठवणी, विविध क्षेत्रांत भेटलेल्या लहान-थोर व्यक्ती, त्यांचे वृत्तपत्रातील काम ह्या गोष्टी केवळ मनोरंजक नव्हे, तर उद्‌बोधक असतील.

(कपिलतीर्थ, १२५ शिवाजीपार्क, माहीम, मुंबई ४०००१६)

---

## महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाची नवलेखक अनुदान योजना

नवलेखकांना उत्तेजन मिळावे म्हणून त्यांच्या प्रथम व द्वितीय पुस्तकाच्या प्रकाशनार्थ अनुदान देण्याची 'नवलेखक अनुदान योजना' महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या वतीने कार्यान्वित करण्यात येत असून या योजनेखाली १९९३-९४ या आर्थिक वर्षासाठी नवलेखक/कवींकडून साहित्य मागविण्यात येत आहे. नवलेखक/कवी या संज्ञेत ज्याचे एकही पुस्तक प्रकाशित झालेले नाही किंवा ज्याचे पहिले पुस्तक मंडळाच्या या योजनेतील अनुदानाने प्रकाशित झाले आहे अशाच नवलेखक/कवींचा समावेश करण्यात येतो.

• या नवलेखक अनुदान योजनेत अनुदानासाठी सादर करावयाच्या अर्जासोबत संबंधित नवलेखकाने/कवीने त्याच्या छायाचित्रांसह राजपत्रित अधिकारी, महाविद्यालयाचे प्राचार्य व प्राथमिक/माध्यमिक शाळेचे मुख्याध्यापक यांपैकी एकाचे ओळख दर्शविणारे प्रमाणपत्र संस्थेच्या शिक्क्यासह सादर करणे आवश्यक आहे. लेखक/कवीने हे ओळख प्रमाणपत्र आपल्या अर्जासोबत न पाठविल्यास त्याचा अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

• काव्य, नाटक/एकांकिका संग्रह, कादंबरी, लघुकथा, ललितगद्य, बालकुमारसाहित्य या कोणत्याही प्रकारातील वाङ्मय असावे आणि ते १ ऑक्टोबर, १९९३ पर्यंत मंडळाकडे पाठवावे. त्यानंतर पाठविलेले हस्तलिखित पुढील वर्षात विचारात घेतले जाईल. वैचारिक स्वरूपाचे हस्तलिखित विचारात घेतले जाणार नाही.

अनुदानासाठी नमुना अर्ज व माहितीपत्रक मागविण्यासाठी तसेच हस्तलिखिते पाठविण्यासाठी पत्ता खालीलप्रमाणे :

सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
एल्सा हटमेंट 'डी' ब्लॉक, आझाद मैदान,
महापालिका मार्ग, मुंबई - ४०० ००१.

□

# लेखनचिन्हानुसारी वर्णक्रमी

१

म. सा. पत्रिकेच्या सप्टेंबर १९५७ च्या अंकात प्रा. रा. श्री. जोगांनी 'मराठी वर्णमालेतील आनुपूर्वी' हा लेख लिहिला होता आणि 'वाङ्मय-विमर्श' या त्यांच्या लेखसंग्रहात पुढे तो समाविष्ट झाला आहे. पत्रिकेच्याच १९७७ च्या २०२ व्या अंकात डॉ. अशोक केळकर यांनी 'मराठी देवनागरी वर्णक्रमी : एक टिपण' हा लेख लिहिला आहे आणि पुढे तो 'वैखरी' या त्यांच्या लेखसंग्रहात समाविष्ट झाला आहे. १९८१ च्या सुमारास श्री. मो. रा. वाळंबे यांनी 'मराठी सूची व कोशवाङ्मयातील वर्णानुक्रमी' या नावाची १६ पृष्ठांची पुस्तिका काढली होती. मात्र ती आधी एखाद्या नियतकालिकात प्रसिद्ध झाली होती किंवा नाही, ते मला माहीत नाही. या तिन्ही लिखाणांवरून वर्णक्रमाविषयी मराठीत किती अराजक आहे त्याची कल्पना येते. मोल्सवर्थच्या मराठी-इंग्रजी कोशापासून दाते-कर्वे आदींच्या महाराष्ट्र शब्दकोशापर्यंत किंवा डॉ. केतकरांच्या महाराष्ट्रीय ज्ञानकोशापासून पं. महादेवशास्त्री जोशींच्या संस्कृति-कोशापर्यंत विविध कोश बघताना हे अराजक मनावर अधिक ठसते. विविध ग्रंथांना जोडलेल्या सूची तपासल्या तर या विषयात फारसे कोणी लक्ष घातलेले दिसत नाही. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा जो विश्वकोश सध्या प्रसिद्ध होत आहे तो या अराजकाला काही आळा घालील अशी आशा होती. पण विश्वकोशाने हे अराजक आहे तसेच चालू ठेवले आहे.

सर्व प्रकारच्या कोशातील माहिती वर्णक्रमाने देण्याची रीत आहे. ही रीत हरतऱ्हेच्या शब्दकोशांत आणि ज्ञानकोशांत पाळली जाते. पुस्तकातील विशिष्ट विषय किंवा संदर्भ मिळण्याची हमखास सोय म्हणजे पुस्तकाला जोडलेली सूची होय. ही सूची वर्णक्रमाने देण्याचा प्रघात आहे. दूरध्वनीची दर्शिका (directory), मतदारांच्या याद्या, आगगाडीच्या समयसारणीमधील स्टेशनांची नावे, परीक्षेचे क्रमांक देणारी परीक्षार्थींची नावे, नकाशाच्या पुस्तकात शेवटी दिलेली ठिकाणे वगैरे वगैरे अनेक जागी वर्णक्रमावर अवलंबून राहावे लागते. निर्माता नि उपभोक्ता, ग्रंथकार नि वाचक यांचे जर वर्णक्रमासंबंधी आधीच एकमत नसेल, तर या सर्व जागी घोटाळे होतील. अर्थात, सर्वमान्य, एकच, ठाम वर्णक्रमी नसणे, हा आपल्या सामूहिक व्यवहाराची गती कमी करणारा एक अडथळा आहे.

ही परिस्थिती सुधारण्यासाठी जे थोडेफार प्रयत्न होत आहेत त्यातलाच एक नम्र प्रयत्न म्हणजे प्रस्तुत लेख होय. बहुमान्य शास्त्रशुद्ध नि सुलभ 'मराठी वर्णक्रमी' या लेखाने मिळू

शकेल, निदान तशा वर्णक्रमीच्या कामाला हातभार लागेल अशी आशा आहे.

२

संभाव्य घोटाळा टाळण्यासाठी आपण 'वर्ण' या शब्दाचा अर्थ प्रथम निश्चित करून घेऊ या. मराठीत या शब्दाचे अनेक अर्थ आहेत. 'वर्ण' शब्द जसा उच्चाराला लावतात तसाच लेखनचिन्हालाही लावतात. येथे तो उच्चारापुरता मर्यादित करू या. उच्चारातही फक्त मूलोच्चाराला आपण तो लावूया. अर्थात 'वर्ण' म्हणजे मूलोच्चार. ज्या उच्चाराचे आणखी विभाजन केले जात नाही तो मूलोच्चार. 'काठी' या शब्दात 'का' 'ठी' हे दोन उच्चार आहेत. पण ते मूलोच्चार नव्हेत. कारण, का = क् + आ, ठी = ठ् + ई असे त्या उच्चारांचे व्यंजनामध्ये व स्वरामध्ये विभाजन केले जाते. 'क्, आ, ठ्, ई' हे मात्र मूलोच्चार होत. कारण त्यांचे विभाजन पुढे केले जात नाही. अर्थात, 'क्, आ, ठ्, ई,' हे वर्ण आहेत.

विविध भाषांमधील वर्ण (म्हणजे मूलोच्चार) काही प्रमाणात भिन्न असण्याचा संभव आहे. उदा. काही वर्षांपूर्वी मराठीत अॅ, ऑ हे वर्ण नव्हते; पण तेव्हा ते इंग्रजीत होते.

वर्ण नि उच्चारचिन्हे यांत फरक आहे. 'चहा' आणि 'चमचा' या दोन्ही शब्दांच्या लेखनात आपणाला 'च' हे लेखनचिन्ह दिसते. पण पहिल्या शब्दात त्याचा उच्चार तालव्य आहे; तर दुसऱ्या शब्दात दंत्य आहे. म्हणजे 'च' ह्या एका चिन्हाचे दोन उच्चार झाले. अर्थात, उच्चार वेगळा नि लेखनचिन्ह वेगळे. (cut नि put या दोन्ही इंग्रजी शब्दांत u हे एकच लेखनचिन्ह आहे. पण त्याचा उच्चार एकदा 'अ' आणि एकदा 'उ' आहे.) जेव्हा आपण 'वर्ण' उच्चारतो, तेव्हा 'वर्ण'चा अर्थ आपण उच्चार असाच घेतो. पण आपण जेव्हा 'वर्ण' लिहितो तेव्हा लेखनचिन्ह वापरतो, आणि त्या लेखनचिन्हासही आपण लक्षणेने 'वर्ण' म्हणतो. पण आपण 'वर्ण'चा जो काटेकोर मर्यादित अर्थ येथे घेतला आहे त्याप्रमाणे 'वर्ण' म्हणजे लेखनचिन्ह नव्हे.

अर्वाचीन मराठीत मुख्यतः पुढील वर्ण (म्हणजे मूलोच्चार) आढळतात.

वर्ण (मूलोच्चार)

अ अॅ आ ऑ इ ई उ ऊ ऋ लृ ए ऐ ओ औ (१४)

ं (स्वरादी नासोच्चार) : (स्वरादी विसर्ग) (२)

क् ख् ग् घ् ङ् (५) च् छ् ज् झ् ञ् (५ + ४)

ट् ठ् ड् ढ् ण् (५) त् थ् द् ध् न् (५)

प् फ् ब् भ् म् (५)

य् र् ल् व् श् ष् स् ह् ळ् (९)

एकूण वर्ण ५० + ४ = ५४

(च्, छ्, ज्, झ् यांचे प्रत्येकी २ उच्चार / वर्ण होतात)

–'अॅ, ऑ' हे वर्ण इंग्रजीच्या संसर्गाने मराठीत आले आहेत. (बॅट, कॉट)
–ॠ (दीर्घ), ॡ (दीर्घ) मराठीत नाहीत. संस्कृतात आहेत.
–'शेळी बें बें करते.' यातील 'बें' मधून 'बे' काढून टाकल्यावर जो उच्चार उरतो तो स्वरादी अनुनासिक होय. 'बाण सूं करीत सुटला.' यातील 'सूं' मधून 'सू' काढून टाकल्यावर 'स्वरादी अनुनासिक' हा उच्चार उरतो.
–दुःख, अन्तःकरण, निःसत्व या शब्दांत 'स्वरादी विसर्ग' आहे. स्थानपरत्वे त्याच्या उच्चारात थोडाफार फरक पडतो. त्यामुळे, तो एक वर्णसमूह (म्हणजे मूलोच्चार समूह) आहे की काय, असे वाटते.
–'च्, छ्, ज्, झ्' यांचे जे दोन दोन उच्चार मराठीत आहेत त्यातील एक तालव्य नि दुसरा दंत्य आहे. (चहा-चमचा, छत्र-वछहरण (उच्चार वत्सहरण सारखा), जन्म-जहाज, झेंडा-झवले.)
–'ळ' अभिजात संस्कृतात नाही. पण मराठीत आहे.
–'क्ष, ज्ञ' हे वर्ण किंवा मूलोच्चार नाहीत. ती लेखनचिन्हे आहेत. त्यांत अनेक वर्णांचे मिश्रण आहे. क्ष् = क्ष = क् + ष्. ज्ञ् = द्न्य् = द् + न् + य्. (संस्कृतात 'ज्ञ' चा उच्चार ज् + ञ् + अ असा आहे. अर्वाचीन मराठीत 'ज्ञ'चा तसा उच्चार नाही.)

३

आपण वर्ण (मूलोच्चार) आणि लेखनचिन्हे यांत फरक केला आहे. मराठीत पुढील 'मूलभूत' लेखनचिन्हे आढळतात.

मूलभूत लेखनचिन्हे

अ अॅ आ ऑ इ ई उ ऊ ऋ ऌ ए ऐ ओ औ (१४)
ं (शिरोबिंदू) ः (विसर्ग) (२)
क् ख् ग् घ् ङ् (५) च् छ् ज् झ् ञ् (५)
ट् ठ् ड् ढ् ण् (५) त् थ् द् ध् न् (५)
प् फ् ब् भ् म् (५)
य् र् ल् व् श् ष् स् ह् ळ् (९)
एकूण मूलभूत लेखनचिन्हे ५०

–पहिल्या चौकटीशी ह्या दुसऱ्या चौकटीचे खूपच साम्य आहे. कारण प्रत्येक वर्णा'ला (मूलोच्चाराला) एक स्वतंत्र 'मूलभूत चिन्ह' द्यावे, अशी मराठीच्या लिपीची प्रवृत्ती आहे. या प्रवृत्तीला एक अपवाद 'च् छ् ज् झ्' या लेखनचिन्हांचा आहे. त्यातील प्रत्येक लेखनचिन्ह दोन वर्ण (मूलोच्चार) दर्शविते. दुसरा अपवाद ं चा (म्हणजे शिरोबिंदूचा) आहे.

त्या लेखनचिन्हाने पुढीलप्रमाणे सुमारे १० वर्ण (मूलोच्चार) दर्शविले जातात. पहिल्या चौकटीतील 'स्वरादी नासोच्चार'हा वर्ण शिरोबिंदूनेच दाखविला जातो. तेव्हा मुख्य वर्ण ५४ झाले आणि मूलभूत लेखनचिन्हे ५० झाली.

शिरोबिंदू ( ं ) या चिन्हाने जे सुमारे १० वर्ण दर्शविले जातात ते असे :

१) 'ङ्, ञ्, ण्, न्, म्' हे पाच अनुनासिक मूलोच्चार शिरोबिंदू दाखवू शकतो. उदा. अनुक्रमे संकट (ङ्), पंच (ञ् उच्चार संस्कृताप्रमाणे), कंड (ण्), संत (न्), पंप (म्). शिरोबिंदूपुढे जे व्यंजन येते, त्या व्यंजनाच्या वर्गातील अनुनासिक म्हणजे पाचवे व्यंजन (अर्थात उच्चार) शिरोबिंदू दर्शवितो.

२) शिरोबिंदूपुढे जेव्हा र्, व्, श्, ष्, स्, ह् ही व्यंजने येतात, तेव्हा शिरोबिंदूचा '/व्' असा उच्चार होतो. उदा. अनुक्रमे, संरक्षण, संवाद, संसद, संहार

३) शिरोबिंदूपुढे जेव्हा 'ल्' हे व्यंजन येते तेव्हा शिरोबिंदूचा 'ल्' असा उच्चार होतो. उदा. संलाप, संलग्न.

४) शिरोबिंदूपुढे जेव्हा 'य्' हे व्यंजन येते तेव्हा त्याचा 'य्' असा उच्चार होतो. उदा. संयम, संयत

५) शिरोबिंदूने 'अ'चे दीर्घत्वही दर्शविले जाते. उदा. 'त्यानं माझं घोडं मारलं, असं कसं म्हणावं ?' या वाक्यातील प्रत्येक शब्दाच्या शेवटी येणारा शिरोबिंदू.

६) स्वरादी नासोच्चार शिरोबिंदूने दाखविला जातो, हे वर सांगितलेच आहे. (उदा. बें बें, सूं) या मूलोच्चाराला स्वरादी म्हणतात, कारण आधीच्या स्वराशिवाय त्याचा उच्चार होऊ शकत नाही. त्याला नासोच्चार म्हणण्याचे कारण तो नेहमी नाकातून करावा लागतो.

म्हणजे, शिरोबिंदू मुख्यतः ५ + १ + १ + १ + १ + १ = १० उच्चार दर्शवितो.

४

मूलोच्चार आणि मूलभूत लेखनचिन्हे आपण वर बघितली. मराठीत मूलोच्चाराशिवाय मिश्र उच्चार आहेत आणि मूलभूत लेखनचिन्हांशिवाय मिश्र लेखनचिन्हे आहेत.

क्, अ हे दोन मूलोच्चार, पण 'क' हा मिश्र उच्चार. तो क् + अ मिळून होतो. याप्रमाणे काही मूलोच्चार नि त्यांच्या मिळणीतून होणारे मिश्र उच्चार पुढे दिले आहेत : क् + आ = का, क् + ई = की, क् + उ = कु, क् + ऐ = कै, क् + र् + अ = क्र, क् + त् + ई = क्ती, क् + त् + य् + आ = क्त्या, क् + र् + ई = क्री. मिश्र उच्चार म्हणजे मूलोच्चारांच्या मिश्रणाने होणारा उच्चार होय. (येथे मूलोच्चार आणि मिश्र उच्चार 'लिहून' दाखवले आहेत. कारण वाचकांशी संपर्क साधण्याचा तोच एक मार्ग उपलब्ध होता. पण वाचकांनी लेखन ध्यानात न घेता, उच्चारण ध्यानात घ्यावे.)

उच्चारांप्रमाणे लेखनचिन्हांचेही सांगता येईल. मूलभूत लेखनचिन्हांच्या मिश्रणाने मिश्र लेखनचिन्हे तयार होतात. मूलभूत लेखनचिन्हांनी ज्याप्रमाणे मूलोच्चार दर्शविले जातात त्याप्रमाणे मिश्र लेखनचिन्हांनी मिश्र उच्चार दर्शवले जातात. मूलभूत लेखनचिन्हांपासून मिश्र लेखनचिन्हे कशी तयार करावयाची ते संकेताने ठरलेले आहे. मिश्र लेखनचिन्हांची काही उदाहरणे पुढीलप्रमाणे :

– क् + अ = क (क्, अ ही मूलभूत लेखनचिन्हे. क हे मिश्र लेखनचिन्ह) कोणत्याही मूलभूत लेखनचिन्हातील पायमोड गाळली की त्यात 'अ' मिसळला असे समजण्याचा संकेत आहे. – ट् + अ = ट, ग् + अ = ग, त् + अ = त.

पुढे काही मूलभूत लेखनचिन्हे आणि त्यापासून होणारी मिश्र लेखनचिन्हे दिली आहेत.

क् + आ = का, क् + ई = कि, क् + ई = की, क् + उ = कु, क् + ऊ = कू, क् + ऋ = कृ, क् + लृ = क्लृ, क् + ए = के, क् + ऐ = कै, क् + ओ = को, क् + औ = कौ, क् + ं = कं, क् + = कः.

ह्याप्रमाणे च्, ट्, प् वगैरे पायमोडीच्या कोणत्याही मूलभूत लेखनचिन्हात इतर लेखनचिन्हे मिळवता येतील. (रूढ भाषेत सांगावयाचे म्हणजे कोणत्याही व्यंजनचिन्हात स्वरचिन्हे मिळवून अक्षरे तयार करता येतील.)

- पायमोडींचे एकच मूलभूत चिन्ह न घेता पायमोडीची अनेक चिन्हे घेता येतील आणि त्यात इतर लेखनचिन्हे वरीलप्रमाणे मिळवता येतील. (जोडाक्षरे तयार करता येतील.) उदा. प् + र् + अ = प्र, क् + त् + आ = क्ता, क् + त् + य् + आ = क्त्या.
- शिरोबिंदू मिळवून पुढीलसारखी मिश्र लेखनचिन्हे होऊ शकतात. क् + अ + ं = कं, क् + आ + ं = कां, क् + ए + ं = कें, क् + त् + ई + ं = क्तीं, क् + त् + य् + आ + ं = क्त्यां.
- विसर्ग मिळवून पुढीलसारखी मिश्र लेखनचिन्हे होऊ शकतात. म् + अ + = मः, म् + आ + = माः, म् + उ + = मुः
- आता, काही अपवादात्मक मिश्र लेखनचिन्हांत मूलभूत लेखनचिन्हांची ओळख पुसलेली असते, हे लक्षात घ्यावयास पाहिजे. यांना स्वतंत्र मिश्र लेखनचिन्हे म्हणता येईल. (यांनाच परंपरेने 'स्वतंत्र जोडाक्षरे' असे नाव दिलेले आहे.) उदा. क्ष = क्ष = क् + ष् + अ, ज्ञ = द्न्य = द् + न् + य् + अ, ट्र = ट्र = ट् + र् + अ, द्य = द्य = द् + य् + अ.

वर ज्या गोष्टींचे कामापुरते विवेचन केले आहे, त्या अशा : (१) उच्चार नि लेखनचिन्ह

यांतील फरक, (२) मूलोच्चार किंवा वर्ण, (३) मूलभूत लेखनचिन्हे, (४) मिश्र उच्चार आणि (५) मिश्र लेखनचिन्हे. या विवेचनाने पुढील प्रतिपादनाची पृष्ठभूमी तयार होईल. पृष्ठभूमी स्पष्ट करण्यात बराच विस्तार झाला आहे. पण, वाचकांनी कृपया तो आवश्यक म्हणून मानून घ्यावा.

६

मराठीतील अनेक कोशकार आणि सूचिकार यांचे वर्णक्रमीविषयी एकमत नाही. त्यांच्यात नुसते दुमतच नाही, तर दोन्हींपेक्षा अधिक मतांचा गजबजाट आहे. मात्र, वर्णक्रमी उच्चारानुसारी असावी की लेखनचिन्हानुसारी असावी, याविषयी बहुतेकांचे आचरण कसेही असले तरी, मत ती उच्चारानुसारी असावी, असे दिसते. या बाबतीत त्यांनी संस्कृतचे अनुकरण केलेले असावे. कारण संस्कृतात शिरोबिंदूचे अनेक उच्चार होतात आणि उच्चाराप्रमाणे त्या त्या शिरोबिंदूला कोशाला वेगवेगळे स्थान दिले जाते. (उदा. आपटे यांच्या कोशात 'अंकुश' नि 'अंतके' या शब्दांतील शिरोबिंदूला उच्चारानुसार अनुक्रमे ङ् चे आणि 'न्'चे स्थान दिले आहे.) संस्कृतातील उच्चारानुसारी वर्णक्रमी मराठीत ठेवल्यास कोणत्या अडचणी येतात, ते बघू या. (१) शिरोबिंदू, (२) च्, छ्, ज्, झ् आणि (३) क्ष, ज्ञ ह्या तीन जागी येणाऱ्या अडचणी पुरेशा बोलक्या आहेत.

शिरोबिंदूने जे सुमारे १० मुख्य उच्चार दर्शवले जातात त्यांचा विचार यापूर्वी झाला आहे. अर्थात, शिरोबिंदुयुक्त शब्दांचा क्रम जेव्हा शिरोबिंदूवर अवलंबून असेल तेव्हा ते शब्द १० ठिकाणी उच्चारानुसार वाटले जातील. पण १० बिंदुविशेष जर १० 'भिन्न भिन्न' क्षेत्रांत वावरणारे असतील तरच हे शक्य होईल; नाहीतर घोटाळा होईल. एखाद्या बिंदुविशेषाचा उच्चार जर दुसऱ्या बिंदूविशेषासारखा होण्याची शक्यता असेल, तर घोटाळा टळणे अशक्य वाटते. प्रत्यक्ष परिस्थिती पाहिली तर काय दिसते ? वर, शिरोबिंदूचे १० प्रमुख उच्चार (१) ते (६) या अंकांखाली नोंदले आहेत. पैकी (१), (२), (३), (४) हा एक गट होतो आणि (५), (६) हा दुसरा गट होतो. विशिष्ट मूलोच्चार पुढे आला, तर बिंदूचा उच्चार कसा होतो, ते पहिल्या गटात आले आहे. पुढे येणारे मूलोच्चार भिन्न भिन्न असून त्यांच्याशी संगत होणारे बिंदूचे उच्चारही भिन्न भिन्न आहेत. अर्थात, या गटात घोटाळ्याचा संभव नाही. उदा. 'पंखा' नि 'पंत' यांतील शिरोबिंदूच्या उच्चारांचा घोटाळा होणारच नाही. कारण, पहिल्या शब्दात शिरोबिंदूपुढे क-वर्गीय मूलोच्चार येतो, तर दुसऱ्या शब्दात त-वर्गीय मूलोच्चार येतो. त्या शब्दांचे 'पङ्खा' नि 'पन्त' असेच उच्चार होणार.

पण दुसऱ्या गटाची अशी स्थिती नाही. स्वरादी नासोच्चार दाखविणारा शिरोबिंदू (शेळी बें बें करते. बाण सूं करीत सुटला.) किंवा 'अ'चे दीर्घत्व दाखविणारा शिरोबिंदू (त्यानं माझं घोडं मारलं) हे मागील किंवा पुढील विशिष्ट अक्षराशी बद्ध नाहीत. अर्थात, त्या शिरोबिंदूंचा उच्चार स्वरादी नासोच्चार आहे, की, 'अ'चे दीर्घत्व दाखविणारा नासोच्चार

आहे, हे ठामपणे सांगता येत नाही. अर्थात, त्यांची एकमेकांशी गल्लत होऊ शकते. शिवाय पहिल्या गटातील कुठल्याही बिंदूच्या उच्चाराशी त्यांची गल्लत होऊ शकते. उदाहरणार्थ, 'वेडं विडं' या सुट्ट्या शब्दातील पहिला शिरोबिंदू पाहा. त्याचे पुढील उच्चार होतील: १ वेडंव्रिडं (अ चा उच्चार नाकातून). २ वेडऽबिडऽ (अ दीर्घ). ३ वेडम्बिडम् (शिरोबिंदूचा उच्चार म्, कारण पुढे प वर्गीय 'ब' आहे). – अशा ठिकाणी उच्चार निश्चित करण्याची दोन साधने शक्य आहेत : १) जर शिरोबिंदूपूर्वी 'अ' नसेल तर तो शिरोबिंदू 'अ' चे दीर्घत्व दाखविणारा असणे शक्य नाही. २) जर सुट्ट्या शब्दाऐवजी वाक्याचा किंवा इतर काही संदर्भ उपलव्ध असेल तर त्यावरून शिरोबिंदूचा उच्चार निश्चित होऊ शकेल. ('रामानंदेखील पहिला वर्ग पटकावला' या वाक्यातील पहिल्या शब्दात जो शिरोबिंदू आहे तो 'अ' चे दीर्घत्व दाखवितो, इतर कोणताही उच्चार दाखवीत नाही, हे संदर्भावरून कळते.) पण ही साधने नसल्यास उच्चाराविषयी अनिश्चितता राहणारच.

सारांश, शिरोबिंदूचे सुमारे १० उच्चार होत असल्यामुळे, आणि त्यामधील २ उच्चार (दुसऱ्या गटातील उच्चार) केव्हा होतात, ते नक्की नसल्यामुळे, शिरोबिंदूचा उच्चारानुसारी क्रम नेहमी नेमका ठरविता येत नाही.

नव्या शुद्धलेखनात अनुच्चारित शिरोबिंदू, एक अपवाद वगळता, नष्ट झाले आहेत. जुन्या शुद्धलेखनात अनुच्चारित शिरोबिंदू पुष्कळ होते. ते व्याकरण, व्युत्पत्ती, रूढी वगैरे विविध कारणांनी आलेले होते. ते अनुच्चारित असल्यामुळे त्यांचे उच्चारानुसारी स्थान ठरवणे अशक्य होते, हे उघड आहे. सर्व अनुच्चारित शिरोबिंदूंना उच्चारित शिरोबिंदूनंतर किंवा आधी जागा देऊन किंवा त्यांच्याकडे पूर्ण दुर्लक्ष करून क्रम ठरविता आला असता, पण अनुच्चारित शिरोबिंदूंचे अनुच्चारितत्व निश्चित नसते. ते काहींच्या बोलण्यात, केव्हा केव्हा, उच्चारले जातात. ही अनिश्चितता, क्रमासंबंधी ऐकमत्य पार अशक्य करून टाकते. कारण कोणते शिरोबिंदू केव्हा उच्चारित नि केव्हा अनुच्चारित यासंबंधी कोशकार, सूचिकार यांच्यामध्ये नि वाचकांमध्ये एकमत असणे शक्य नसते; सर्व वाचकांमध्येही एकमत असणे शक्य नसते.

या परिस्थितीत काही कोशकारांनी व सूचिकारांनी असा मार्ग काढलेला आहे, की, शिरोबिंदूचे अस्तित्व दुर्लक्षून क्रम लावावयाचा आणि तसे करताना जर शिरोबिंदुरहित (उचट) नि शिरोबिंदुसहित (उंचट) शब्द जवळ जवळ आले तर प्रथम शिरोबिंदुरहित शब्द घेऊन मग शिरोबिंदुसहित शब्द घ्यावयाचा. (प्रथम उचट, मग उंचट). पण हा मार्ग म्हणजे एक व्यावहारिक युक्ती आहे. – शिरोबिंदू उच्चारानुसारी क्रम अशक्य करतात, याची ती कबुली आहे.

नव्या, म्हणजे महामंडळाच्या, शुद्धलेखनात अनुच्चारित शिरोबिंदूंचे 'बहुतेक सर्व' उच्चाटन झाल्यामुळे आणि शिरोबिंदू उच्चारित आहे की नाही यासंबंधी संदिग्धताही

'बहुतेक' संपल्यामुळे शिरोबिंदूंचा प्रश्न बराचसा सोपा झाला आहे. पण तो पुरता नष्ट झालेला नाही. स्वरादी नासोच्चार दर्शविणारा शिरोबिंदू किंवा 'अ'चे दीर्घत्व दर्शविणारा शिरोबिंदू, शिल्लक असल्यामुळे प्रश्न बाकी उरतोच. शिवाय, महामंडळाच्या शुद्धलेखनात नामाच्या अनेकवचनी सामान्यरूपावर शिरोबिंदू ठेवला आहे. तो केव्हा उच्चारित तर केव्हा अनुच्चारित असतो. (त्यास, त्यांस)

'च, छ, ज, झ' यांपैकी प्रत्येक चिन्हाचे तालव्य नि दंत्य असे दोन दोन उच्चार मराठीत होतात, हे आपण बघितले आहे. जर वर्णक्रमी सुसंगतपणे उच्चारानुसारी ठेवावयाची असेल तर या चिन्हांचे तालव्य उच्चार तालव्य उच्चारांत आणि दंत्य उच्चार दंत्य उच्चारांत केले गेले पाहिजेत. पण या चिन्हांचे उच्चार कोठे तालव्य होतात, नि कोठे दंत्य होतात, याचा सर्वत्र निर्णय होत नसल्यामुळे, बहुधा, कोशकारांनी किंवा सूचिकारांनी हे टाळले आहे. 'क-वर्गा' नंतर परंपरेने 'च-वर्ग' येतो. ही परंपरा संस्कृताची आहे. पण ती उच्चाराची आहे व संस्कृतात फक्त तालव्य उच्चार आहे, हे लक्षात न घेता; उच्चार जरी दंत्य असला तरी 'च, छ, ज, झ' ही लेखचिन्हे क वर्गानंतर लगेच, सरसकट घेतली आहेत. अर्थात, तेवढ्यापुरते कोशकारांनी वगैरे उच्चारानुसारित्व सोडून चिन्हानुसारित्व स्वीकारले आहे.

'क्ष, ज्ञ' हे मिश्र उच्चार व मिश्र लेखनचिन्हे (स्वतंत्र जोडाक्षरे) आहेत, हे आपण पाहिले आहे. क्ष = क्य, ज्ञ = द्न्य; तेव्हा, उच्चारानुसारी क्रमाप्रमाणे 'क्ष' 'क' बरोबर आणि 'ज्ञ' 'द' बरोबर राहावयास हवा. पण काही ठिकाणी त्यांना स्वतंत्र स्थाने दिली आहेत आणि शालेय तक्त्याप्रमाणे त्यांना शेवटचा क्रम दिला आहे. अर्थात्, येथे उच्चारानुसारी क्रम चिन्हानुसारी क्रमाला शरण तर गेला आहेच; पण त्याने 'क्ष, ज्ञ'चे स्थान ठरवताना शालेय तक्त्याची परंपरा पाळली आहे.

सारांश, उच्चारानुसारी क्रम संस्कृताची परंपरा राखण्याचा प्रयत्न करतो; पण १) शिरोबिंदू २) च, छ, ज, झ आणि ३) क्ष, ज्ञ - यांच्या बाबतीत त्या क्रमाला स्वतःशी सुसंगत राहता येत नाही- निदान, तो तसा राहिलेला नाही. उच्चारानुसारी क्रमाचे आणखी विश्लेषण व दोषदर्शन करता येईल. पण तो व्यवहार्य ठरलेला नाही, हे अभिप्रेत विधेय सूचित होण्यास एवढा विस्तार पुरे आहे.

७

उच्चारानुसारी वर्णक्रमीपेक्षा सकृद्दर्शनी चिन्हानुसारी वर्णक्रमी कमी सदोष वाटते. वर्ण म्हणजे जर 'मूलोच्चार' असेल, तर वर्णक्रमी उच्चारावरच आधारलेली असणार हे क्रमप्राप्त वाटते. पण वर्ण म्हणजे मूलोच्चार असला तरी वर्णक्रमीचा संबंध उच्चारापेक्षा लेखनाशी जास्त येतो. तेव्हा, वर्णक्रमी लेखनचिन्हांवर अवलंबून असणे अनैसर्गिक किंवा चुकीचे नाही. इंग्रजी वर्णक्रमी तर पूर्णपणे लेखनचिन्हानुसारीच आहे. a, u, i वगैरे अक्षरांचे उच्चार अनेक आहेत; पण त्यांच्या वेळोवेळच्या उच्चारांकडे लक्ष न देता त्यांचा alphabet मधील

आहे, हे ठामपणे सांगता येत नाही. अर्थात, त्यांची एकमेकांशी गल्लत होऊ शकते. शिवाय पहिल्या गटातील कुठल्याही बिंदूच्या उच्चाराशी त्यांची गल्लत होऊ शकते. उदाहरणार्थ, 'वेडं बिडं' या सुट्ट्या शब्दातील पहिला शिरोबिंदू पाहा. त्याचे पुढील उच्चार होतीलः १ वेडंविडं (अ चा उच्चार नाकातून). २ वेडऽबिडऽ (अ दीर्घ). ३ वेडम्बिडम् (शिरोबिंदूचा उच्चार म्, कारण पुढे प वर्गीय 'ब' आहे). — अशा ठिकाणी उच्चार निश्चित करण्याची दोन साधने शक्य आहेत : १) जर शिरोबिंदूपूर्वी 'अ' नसेल तर तो शिरोबिंदू 'अ' चे दीर्घत्व दाखविणारा असणे शक्य नाही. २) जर सुट्ट्या शब्दाऐवजी वाक्याचा किंवा इतर काही संदर्भ उपलब्ध असेल तर त्यावरून शिरोबिंदूचा उच्चार निश्चित होऊ शकेल. ('रामानंदेखील पहिला वर्ग पटकावला' या वाक्यातील पहिल्या शब्दात जो शिरोबिंदू आहे तो 'अ' चे दीर्घत्व दाखवितो, इतर कोणताही उच्चार दाखवीत नाही, हे संदर्भावरून कळते.) पण ही साधने नसल्यास उच्चाराविषयी अनिश्चितता राहणारच.

सारांश, शिरोबिंदूचे सुमारे १० उच्चार होत असल्यामुळे, आणि त्यामधील २ उच्चार (दुसऱ्या गटातील उच्चार) केव्हा होतात, ते नक्की नसल्यामुळे, शिरोबिंदूचा उच्चारानुसारी क्रम नेहमी नेमका ठरविता येत नाही.

नव्या शुद्धलेखनात अनुच्चारित शिरोबिंदू, एक अपवाद वगळता, नष्ट झाले आहेत. जुन्या शुद्धलेखनात अनुच्चारित शिरोबिंदू पुष्कळ होते. ते व्याकरण, व्युत्पत्ती, रूढी वगैरे विविध कारणांनी आलेले होते. ते अनुच्चारित असल्यामुळे त्यांचे उच्चारानुसारी स्थान ठरवणे अशक्य होते, हे उघड आहे. सर्व अनुच्चारित शिरोबिंदूंना उच्चारित शिरोबिंदूनंतर किंवा आधी जागा देऊन किंवा त्यांच्याकडे पूर्ण दुर्लक्ष करून क्रम ठरविता आला असता, पण अनुच्चारित शिरोबिंदूंचे अनुच्चारितत्व निश्चित नसते. ते काहींच्या बोलण्यात, केव्हा केव्हा, उच्चारले जातात. ही अनिश्चितता, क्रमासंबंधी ऐकमत्य पार अशक्य करून टाकते. कारण कोणते शिरोबिंदू केव्हा उच्चारित नि केव्हा अनुच्चारित यासंबंधी कोशकार, सूचिकार यांच्यामध्ये नि वाचकांमध्ये एकमत असणे शक्य नसते; सर्व वाचकांमध्येही एकमत असणे शक्य नसते.

या परिस्थितीत काही कोशकारांनी व सूचिकारांनी असा मार्ग काढलेला आहे, की, शिरोबिंदूचे अस्तित्व दुर्लक्षून क्रम लावावयाचा आणि तसे करताना जर शिरोबिंदुरहित (उचट) नि शिरोबिंदुसहित (उंचट) शब्द जवळ जवळ आले तर प्रथम शिरोबिंदुरहित शब्द घेऊन मग शिरोबिंदुसहित शब्द घ्यावयाचा. (प्रथम उचट, मग उंचट). पण हा मार्ग म्हणजे एक व्यावहारिक युक्ती आहे. — शिरोबिंदू उच्चारानुसारी क्रम अशक्य करतात, याची ती कबुली आहे.

नव्या, म्हणजे महामंडळाच्या, शुद्धलेखनात अनुच्चारित शिरोबिंदूंचे 'बहुतेक सर्व' उच्चाटन झाल्यामुळे आणि शिरोबिंदू उच्चारित आहे की नाही यासंबंधी संदिग्धताही

'बहुतेक' संपल्यामुळे शिरोबिंदूंचा प्रश्न बराचसा सोपा झाला आहे. पण तो पुरता नष्ट झालेला नाही. स्वरादी नासोच्चार दर्शविणारा शिरोबिंदू किंवा 'अ'चे दीर्घत्व दर्शविणारा शिरोबिंदू, शिल्लक असल्यामुळे प्रश्न बाकी उरतोच. शिवाय, महामंडळाच्या शुद्धलेखनात नामाच्या अनेकवचनी सामान्यरूपावर शिरोबिंदू ठेवला आहे. तो केव्हा उच्चारित तर केव्हा अनुच्चारित असतो. (त्यास, त्यांस)

'च्, छ्, ज्, झ्' यांपैकी प्रत्येक चिन्हाचे तालव्य नि दंत्य असे दोन दोन उच्चार मराठीत होतात, हे आपण बघितले आहे. जर वर्णक्रमी सुसंगतपणे उच्चारानुसारी ठेवावयाची असेल तर या चिन्हांचे तालव्य उच्चार तालव्य उच्चारांत आणि दंत्य उच्चार दंत्य उच्चारांत केले गेले पाहिजेत. पण या चिन्हांचे उच्चार कोठे तालव्य होतात, नि कोठे दंत्य होतात, याचा सर्वत्र निर्णय होत नसल्यामुळे, बहुधा, कोशकारांनी किंवा सूचिकारांनी हे टाळले आहे. 'क- वर्गा' नंतर परंपरेने 'च- वर्ग' येतो. ही परंपरा संस्कृताची आहे. पण ती उच्चाराची आहे व संस्कृतात फक्त तालव्य उच्चार आहे, हे लक्षात न घेता; उच्चार जरी दंत्य असला तरी 'च्, छ्, ज्, झ्' ही लेखचिन्हे क वर्गानंतर लगेच, सरसकट घेतली आहेत. अर्थात, तेवढ्यापुरते कोशकारांनी वगैरे उच्चारानुसारित्व सोडून चिन्हानुसारित्व स्वीकारले आहे.

'क्ष, ज्ञ' हे मिश्र उच्चार व मिश्र लेखनचिन्हे (स्वतंत्र जोडाक्षरे) आहेत, हे आपण पाहिले आहे. क्ष = क्य, ज्ञ = द्न्य; तेव्हा, उच्चारानुसारी क्रमाप्रमाणे 'क्ष' 'क' बरोबर आणि 'ज्ञ' 'द' बरोबर राहावयास हवा. पण काही ठिकाणी त्यांना स्वतंत्र स्थाने दिली आहेत आणि शालेय तक्त्याप्रमाणे त्यांना शेवटचा क्रम दिला आहे. अर्थात्, येथे उच्चारानुसारी क्रम चिन्हानुसारी क्रमाला शरण तर गेला आहेच; पण त्याने 'क्ष, ज्ञ'चे स्थान ठरवताना शालेय तक्त्याची परंपरा पाळली आहे.

सारांश, उच्चारानुसारी क्रम संस्कृताची परंपरा राखण्याचा प्रयत्न करतो; पण १) शिरोबिंदू २) च्, छ्, ज्, झ् आणि ३) क्ष, ज्ञ – यांच्या बाबतीत त्या क्रमाला स्वतःशी सुसंगत राहता येत नाही– निदान, तो तसा राहिलेला नाही. उच्चारानुसारी क्रमाचे आणखी विश्लेषण व दोषदर्शन करता येईल. पण तो व्यवहार्य ठरलेला नाही, हे अभिप्रेत विधेय सूचित होण्यास एवढा विस्तार पुरे आहे.

## ७

उच्चारानुसारी वर्णक्रमीपेक्षा सकृद्दर्शनी चिन्हानुसारी वर्णक्रमी कमी सदोष वाटते. वर्ण म्हणजे जर 'मूलोच्चार' असेल, तर वर्णक्रमी उच्चारावरच आधारलेली असणार हे क्रमप्राप्त वाटते. पण वर्ण म्हणजे मूलोच्चार असला तरी वर्णक्रमीचा संबंध उच्चारापेक्षा लेखनाशी जास्त येतो. तेव्हा, वर्णक्रमी लेखनचिन्हांवर अवलंबून असणे अनैसर्गिक किंवा चुकीचे नाही. इंग्रजी वर्णक्रमी तर पूर्णपणे लेखनचिन्हानुसारीच आहे. a, u, i वगैरे अक्षरांचे उच्चार अनेक आहेत; पण त्यांच्या वेळोवेळच्या उच्चारांकडे लक्ष न देता त्यांचा alphabet मधील

क्रमच वर्णक्रमीच्या वेळी त्यांना दिला जातो. इंग्रजी alphabet मधील अक्षरांचा क्रम उच्चारानुसारी नाही, हे सुप्रसिद्ध आहे. अर्थात्, तो लेखनचिन्हांचा क्रम आहे, हे उघड आहे. as, among, all या शब्दांत 'a' चा उच्चार अनुक्रमे अॅ, अ, ऑ असा आहे. पण त्या शब्दांना 'a' च्या उच्चाराप्रमाणे वेगवेगळे स्थान न मिळता 'a' चे alphabet मधील पहिले स्थानच प्रथम मिळून मग शब्दांचा क्रम ठरतो. म्हणजे इंग्रजी वर्णक्रमी पूर्णपणे चिन्हक्रमानुसारी अथवा चिन्हानुसारी आहे.

मराठी वर्णक्रमी जर लेखनचिन्हानुसारी ठेवावयाची असेल तर लेखनचिन्हांचा अनुक्रम आधी ठरला पाहिजे. लेखनचिन्हे उच्चारांवर अवलंबून असल्यामुळे उच्चारांचा क्रम त्याआधी ठरला पाहिजे. त्यातही, मूलोच्चारांचा, म्हणजे वर्णांचा, क्रम आधी ठरला पाहिजे. वर, पहिल्या चौकटीत वर्ण किंवा मूलोच्चार दिले आहेत आणि ते बव्हंशी परंपरागत मराठी क्रमानेच दिले आहेत. परंपरेने फक्त अॅ ऑ यांचा क्रम किंवा च्, छ्, ज्, झ् यांच्या दंत्य उच्चारांचा क्रम ठरवलेला नाही. पैकी च्, छ्, ज्, झ् यांच्या दंत्य उच्चारांचा क्रम आपण सध्या विचारातून वगळू या. कारण, त्यांच्या तालव्य उच्चारांचा क्रम मराठी परंपरेने ठरलेला आहे, आणि च्, छ्, ज्, झ् या लेखनचिन्हांचा क्रम त्यामुळे ठरल्यासारखा आहे. च्, छ्, ज्, झ् या दंत्य उच्चारांना वेगळी चिन्हेही उपलब्ध नाहीत. म्हणजे अॅ, ऑ या नवीन वर्णांचाच प्रश्न परंपरेबाहेर राहिला.

एका पक्षाचे म्हणणे असे आहे की, 'अॅ'चे 'ए'शी उच्चारदृष्ट्या नाते आहे, आणि 'ऑ'चे 'ओ'शी उच्चारदृष्ट्या नाते आहे. बॅट, कॅप्टन वगैरे शब्द पूर्वी बेट, केप्टन असे उच्चारले जात, आणि वॉल, हॉल वगैरे शब्द बोल, होल असे उच्चारले जात. दुसरा पक्ष असा की, 'अॅ, ऑ' हे उच्चारदृष्ट्या 'अ, आ' यांच्याशी अनुक्रमे जवळचे आहेत. दोन्ही पक्षांचा विचार करता मला वाटते की, बॅट, कॅप्टन यांचे उच्चार 'ब्याट, क्याप्टन' किंवा 'वॉल, हॉल' यांचे उच्चार 'वाल, हाल' असेही होत. त्यावरून 'अॅ'चा 'या' शी किंवा 'ऑ'चा 'आ'शी संबंध जोडता येईल. तेव्हा, पूर्वी कसा उच्चार होई एवढ्याचाच विचार न करता उपलब्ध वर्णांपैकी कोणते वर्ण 'अॅ ऑ' यांना उच्चारदृष्ट्या जवळचे आहेत, याचा विचार झाला पाहिजे. तसा विचार केल्यास 'अॅ'चे 'अ'शी आणि 'ऑ'चे 'आ'शी नाते अधिक जुळते. दाते-कर्वे आदिकांच्या प्रसिद्ध महाराष्ट्रीय शब्दकोशात अॅ अ मध्ये आणि ऑ आ मध्ये मिसळला आहे. (शिवाय, 'अॅ ऑ'हे रूपदृष्ट्या 'ए, ओ' पेक्षा 'अ, आ'ला जवळ आहेत, असा उपोद्‌बलक मुद्दा पुढे करता येईल.) तेव्हा अ– अॅ, आ– ऑ हा पहिल्या चौकटीत दिलेला क्रम स्वीकारार्ह ठरावा.

पहिल्या चौकटीतील वर्णक्रम किंवा मूलोच्चारक्रम मान्य ठरला तर दुसऱ्या चौकटीतील मूलभूत लेखनचिन्हांचा क्रम ओघानेच मान्य ठरतो.

८

लेखनचिन्हानुसारी वर्णक्रमीचे पालन कसे करावे, या विषयाला आता हात घालता येईल. ही वर्णक्रमी आचरणात आणताना पुढील पद्धती स्वीकारावी :

१) शब्दांचा क्रम लावताना, अंततः तुलनेसाठी दोन शब्द घ्यावे लागतात. हे शब्द मूलभूत नि मिश्र लेखनचिन्हांनी नेहमीप्रमाणे लिहिलेले असणार. त्यांचे, जरूर तेथे, मूलभूत चिन्हांत पृथक्करण व रूपांतर करून घ्यावे. उदा.

कांत = क् + आ + ं + त् + अ

२) कात = क् + आ + त् + अ.

३) प्रत्येक शब्दातील एकेक चिन्ह घेऊन चिन्हांच्या जोड्या लावाव्यात. असमान जोडी येईपर्यंत अशा जोड्या लावाव्यात. उदा.

| शब्द | समान जोड्या | असमान जोडी | इतर |
|---|---|---|---|
| कांत | क् आ | ं | त् अ |
| कात | क् आ | त् | अ |

४) समान जोड्या सोडून असमान जोडी लक्षात घ्यावी, आणि तीमधील चिन्हांचा क्रम जसा असेल तसा शब्दांचा क्रम लावावा.

पृथक्करण करताना ं चे (शिरोबिंदूचे) रूपांतर 'ङ्, ञ, ण्, न्, म्' यांमध्ये करू नये. त्याचप्रमाणे ङ्, ञ, ण्, न्, म् यांचेही रूपांतर ं मध्ये (शिरोबिंदूमध्ये) करू नये. ं (शिरोबिंदू) किंवा ङ्, ञ, ण्, न्, म्, ही मूलभूत चिन्हे असल्यामुळे रूपांतराचा प्रश्न उद्भवत नाही. (यामुळे, 'अन्योक्ती' चे रूपांतर 'अंयोक्ती' किंवा 'इन्किलाब' चे 'इंकिलाब' किंवा 'पेन्शन' चे 'पेंशन' किंवा 'अम्सूल' चे 'अंसूल' होण्याचे टळेल.)

५) कांत–कात या शब्दात 'ं त्' ही असमान जोडी आली. त्या जोडीत ं हे चिन्ह आधी आणि 'त्' हे चिन्ह नंतर, म्हणून 'कांत' आधी, कात नंतर.

*पुढे या पद्धतीने काही शब्दांचा क्रम लावून दाखवला आहे :*

| शब्द | समानचिन्ह जोड्या | असमान जोडी | शब्दक्रम |
|---|---|---|---|
| तिरंदाज | त्इर् | अ | तिरंदाज |
| तिर्कस | त् इ र् | क् | तिर्कस |
| सिंधू | स् | इ | संत |
| संत | स् | अ | सिंधू |
| दुःख | द् उ | | दुःख |
| दुखरा | द् उ | ख् | दुखरा |
| पद | प् अ | द् | पक्ष |
| पक्ष | प् अ | क् | पद |

या पद्धतीत आणि उच्चारानुसारी वर्णक्रमीच्या पद्धतीत तसा फरक नाही. मात्र

उच्चारानुसारी पद्धतीत शब्दांचे पृथक्करण आपण उच्चारांत करतो आणि या पद्धतीत ते चिन्हांत करतो. लेखनचिन्हे उच्चारांवर अवलंबून आहेत आणि लेखनचिन्हांचा क्रमही उच्चारक्रमावर अवलंबून आहे. त्यामुळे जो शब्दक्रम शेवटी निघतो तो दोन्ही पद्धतीत जवळजवळ सारखाच निघतो. मुख्य फरक 'शिरोबिंदू'मुळे पडतो. पैकी, क्र.(५) व (६) यांच्या दुसऱ्या गटातील उपर्युक्त शिरोबिंदूंमुळे अनिश्चितता येत असल्यामुळे व घोटाळा होत असल्यामुळे ते सोडून क्र.(१) ते (४) या पहिल्या गटातील शिरोबिंदू घेऊ या.

| शब्द | उच्चार-क्रम | चिन्हक्रम |
|---|---|---|
| अकस्मात | अकस्मात (= अ क्..) | अंकगणित (= अ ˙..) |
| अंकगणित | अंकगणित (= अ ङ्..) | अकस्मात (= अ क्..) |
| कंठमणी | कंठमणी (= क् अ ण्..) | कठीण (क् अ ठ्..) |

शिरोबिंदूचे अस्तित्वच दुर्लक्षून क्रम लावण्याची जी युक्ती आहे ती स्वीकारल्यास क्रमात बदल होऊ शकतो.

| शब्द | बिंदू दुर्लक्षून क्रम | चिन्हक्रम |
|---|---|---|
| अकस्मात | अंकगणित (= अ क् अ ग्..) | अंकगणित (= अ ˙ ..) |
| अंकगणित | अकस्मात (अ क् अ स्..) | अकस्मात (= अ क्..) |
| घंटी | घटित (घ् अ ट् इ..) | घंटी (= घ् अ ˙..) |
| घटित | घंटी (= घ् अ ट् ई..) | घटित (= घ् अ ट्..) |

याप्रमाणेच च्, छ्, ज्, झ् हे तालव्य व दंत्य उच्चार ज्यांत आहेत असे शब्द, किंवा 'क्ष, ज्ञ' चे शब्द घेऊन त्यांचा क्रम उच्चारानुसारी कोणता ठरतो व चिन्हानुसारी कोणता ठरतो, ते बघता येईल. कोशकारांनी जे सोयीचे मार्ग शोधले आहेत त्यांना अनुसरून अशा शब्दांचा कोणता क्रम ठरतो व चिन्हानुसारी कोणता क्रम ठरतो, तेही बघता येईल. चिन्हानुसारी क्रम थोडाफार वेगळा आहे, हे दोन्ही ठिकाणी दिसून येईल.

निवडक तीन ठिकाणी (म्हणजे १. शिरोबिंदू, २. च् छ् ज् झ्, ३. क्ष ज्ञ, या ठिकाणी) चिन्हानुसारी क्रम थोडाफार वेगळा असला तरी एकंदरीने तो फारसा वेगळा नाही. त्याचे मुख्य लाभ व विशेष पुढीलप्रमाणे दिसतात :

(१) वर्णक्रम चिन्हानुसारी ठेवल्यास संस्कृतची उच्चारानुसारी परंपरा सकृद्दर्शनी सुटल्यासारखी वाटते, हे खरे आहे. पण ती परंपरा पूर्णतः सुटत नसून अंतर्भागात चांगली जितीजागती राहिली आहे. चिन्हक्रमाला आधार उच्चारक्रमाचा असून उच्चारक्रम संस्कृत परंपरेतला आहे. शिवाय, लेखनचिन्हे देवनागरी म्हणजे संस्कृतचीच आहेत.

परंपरेचा धागा धरून चिन्हक्रम चालत असल्यामुळे कोणत्याही इतर वर्णक्रमीपुढे, तो

परकीय वाटावा एवढा, वेगळा दिसणार नाही.

(२) चिन्हक्रमाने चिन्हे पृथक करण्याची व शब्दक्रम ठसविण्यासाठी चिन्हे लावण्याची जी पद्धत स्वीकारली आहे ती उच्चार (किंवा अक्षरे) याबाबत पूर्वी सर्वांनी ग्राह्य मानलेलीच आहे.

(३) मराठीतील प्रत्येक मूलोच्चाराला स्वतंत्र लेखनचिन्ह जर उपलब्ध असते, त्या चिन्हांनी स्वतंत्र मिश्रचिन्हे जर तयार झाली असती, आणि या सर्व चिन्हांचा वापर जर लेखनव्यवहारात होत राहिला असता, तर वर्णक्रमीत हल्लीच्या अडचणी आल्या नसत्या. ती सुलभ झाली असती. पण हल्ली काही महत्त्वाच्या उच्चारांना चिन्हे नाहीत. (१) काही ठिकाणी एकच चिन्ह अनेक उच्चार दाखविते आणि ते उच्चार एकमेकात मिसळण्याची शक्यता असते. (उदाः च्, छ्, ज्, झ् यांचे दंत्य उच्चार) (२) केव्हा केव्हा एकाच उच्चाराला अनेक चिन्हे आहेत. (उदाः शिरोबिंदू) (३) आणि शालेय रूढी, बालांना सुलभ पद्धतीने शिकवू पाहणारी रूढी, एवढी प्रबल झाली आहे की शास्त्रज्ञही तिला शरण जातात. (उदाः शिरोबिंदू व ङ् य् ण् न् म् किंवा क्ष– क्व, ज्ञ– द्न्य) (४) यामुळे वर्णक्रमीचा प्रश्न उपस्थित झाला आहे. चिन्हानुसारी वर्णक्रमामुळे या सर्वांतून बराच सुसंगत नि बराच निर्दोष मार्ग निघू शकतो. (उदाः क्ष, ज्ञ यांना वर्णमालेत स्थान, 'अं' लाही स्वतंत्र स्थान) !

चिन्हानुसारी वर्णक्रमी चिन्हांची मूलभूत नि मिश्र अशी वर्गवारी करते आणि मग फक्त मूलभूत चिन्हे विचारात घेते. त्यामुळे बरेच प्रश्न आपोआप मिटतात. उदा. 'क्ष-ज्ञ'ला स्वतंत्र स्थान देण्याचा प्रश्न उद्भवत नाही. कारण सर्व मिश्र लेखनचिन्हांचे जसे मूलभूत लेखनचिन्हात रूपांतर होते तसेच त्यांचेही होते. शिरोबिंदूच क्रमविचारात घेतल्याने शिरोबिंदूने दर्शविलेल्या सुमारे १० उच्चारांचा घोळ क्रमवारीत पुढे येऊ शकत नाही. 'च्, छ्, ज्, झ्' ही चिन्हे विचारात घेतल्याने त्यांच्याही दोन-दोन उच्चारांची भानगड उपस्थित होत नाही. (याचा अर्थ अशा भानगडी संपतात असा नाही, तर क्रमनिश्चितीत त्या अडमडत नाहीत, एवढाच होतो.) अं अः यांना वर्णमालेत स्थान आहे का ? बाराखडीत कं आहे, खं वगैरे आहेत मग कां, किं, कुं, खीं, खें, खैं, खों वगैरे का नाहीत ? जे बाराखडीत आहेत ते वर्ण-क्रमीत का नसावेत ?– वगैरे समस्याही डोके वर काढीत नाहीत. कारण, पृथक्करणाने सर्वांचे विभाजन होऊन मूलचिन्हांत रूपांतर होते आणि या समस्या मिटतात.

(४) चिन्हानुसारी वर्णक्रमीला इंग्रजीचा मोठा आधार आहे. इंग्रजीचा एवढा मोठा व्यवहार जर २६ लेखनचिन्हांवर नि त्यांच्या अनुक्रमावर बिनबोभाट चालतो, तर मराठीचा लहानसा व्यवहार ५० लेखनचिन्हांवर व त्यांच्या अनुक्रमावर का चालू नये ?

(५) महामंडळाच्या नव्या शुद्धलेखनात बहुतेक सर्व अनुच्चारित शिरोबिंदू गेले आहेत, जे उरले आहेत त्यांतील काहींच्या उच्चाराबद्दल संदिग्धता आहे, पण ती थोडी आहे. तेव्हा नव्या संदर्भात चिन्हानुसारी वर्णक्रमी एकंदरीने सोपीच झाली आहे.

(६) अॅ, ऑ, हे मराठीने स्वीकृत केलेले नवे उच्चार चिन्हानुसारी वर्णक्रमाने स्वीकारून त्यांची सोय लावली आहे. मराठीने भविष्यकाळी जर आणखी उच्चार असेच 'पूर्ण' पचवले तर तेही या वर्णक्रमीत बसते करून घ्यावेत. ऋ (दीर्घ), लृ (दीर्घ) हे उच्चार मराठीत नाहीत. म्हणून चिन्हानुसारी वर्णक्रमीने त्यांची दखल घेतलेली नाही. 'ञ' सारखे उच्चारही मराठीत लुप्तप्राय झाले आहेत. ते 'पूर्ण' लुप्त झाले की चिन्हानुसारी वर्णक्रमीतून काढून टाकावेत. नव्याचे सावध स्वागत करणारी आणि परंपरेचा धागा तुटू न देता तो नव्याशी बेमालूम जोडणारी अशी चिन्हानुसारी सारी अनुक्रमी राहिली पाहिजे. तशी क्षमता तिच्यामध्ये आहे.

(७) काही ठिकाणी, शब्दांचे पृथक्करण मूलोच्चारांत (वर्णांत) न करता, ते अक्षरात करतात व अनुक्रमी लावतात. त्या अनुक्रमीला आपण अक्षरानुसारी अनुक्रमी म्हणू या. 'अक्षर' ही संकल्पना मराठीत धड उच्चारावर किंवा धड चिन्हावर अवलंबून नाही. त्यामुळे तशा अनुक्रमीत काही दोष उत्पन्न होतात. एक दोष असा की जसे लिहावे तशी अनुक्रमी होते आणि लेखनानुसार ती बदलल्याने शब्दाचे स्थान स्थिर राहत नाही. उदा: 'सत्पाल' या शब्दाची 'स त्पा ल' ही अक्षरे होतात, तर 'सत्पाल' असा तोच शब्द लिहिला असता त्याची 'स त् पा ल' ही अक्षरे होतात. 'संत'ची अक्षरे 'संत' ही होतात, तर 'सन्त' ची अक्षरे 'स न्त' ही होतात. अक्षरे बदलल्याने अनुक्रमीही बदलते. चिन्हानुसारी अनुक्रमीत हा दोष व अक्षरानुसारी अनुक्रमीचे इतर कित्येक दोष टाळता येतात.

(८) महामंडळाच्या शुद्धलेखनातही शिरोबिंदूसंबंधी थोडी संदिग्धता राहिलेली आहे. 'स्पष्टोच्चारित अनुनासिकाबद्दल शीर्षबिंदू द्यावा' असा महामंडळाचा पहिला नियम आहे. (शीर्षबिंदू= शिरोबिंदू) वाङ्मय शुद्ध, वांमय अशुद्ध. तन्मणी शुद्ध, तंमणी अशुद्ध, सन्मान शुद्ध, संमान अशुद्ध, ही शुद्धाशुद्धता महामंडळाच्या पहिल्या नियमाला अपवाद ठरते. 'इन्किलाब' शुद्ध, 'इंकिलाब' अशुद्ध, 'पण्यांगना' शुद्ध, 'पंयांगना' अशुद्ध, 'अम्सूल' शुद्ध, 'अंसूल' अशुद्ध- ही शुद्धाशुद्धताही महामंडळाच्या पहिल्या नियमाला अपवाद ठरवते. अर्थभेद व उच्चारभेद स्पष्ट करण्यासाठी 'वेदांत' (= अनेक वेदग्रंथांमध्ये) शुद्ध नि वेदान्त (= तत्त्वज्ञान) शुद्ध, शालांत (= अनेक शालांमध्ये) शुद्ध नि शालान्त (= शाळेच्या शेवटची) शुद्ध;- हे लेखन सुद्धा महामंडळाच्या पहिल्या नियमाला अपवाद ठरते. तेव्हा महामंडळाच्या पहिल्या नियमाचे काही परिष्करण करून त्याला जोड देणे आवश्यक आहे. ('शुद्धलेखनविवेक' या पुस्तकात, पृष्ठ ६३-६४-६५ वर मी असे परिष्करण करून महामंडळाच्या पहिल्या नियमाला जोड दिली आहे.) हे परिष्करण केले नाही, तर लेखनात घोटाळे होतील आणि परिणामी वर्णक्रमीही सदोष होईल. पण हा दोष चिन्हानुसारी वर्णक्रमीला अंगभूत नसून तो लेखनाचा तीमध्ये उतरलेला परावर्तित दोष आहे. कोणत्याही वर्णक्रमात तसा दोष राहणारच.

महामंडळाने नामांच्या अनेकवचनी सामान्यरूपांवर जो शिरोबिंदू देण्यास सांगितला



अनुक्रमणिका

आहे तेवढाच नव्या शुद्धलेखनातील व्याकरणमूलक शिरोबिंदू म्हणता येईल. तो उच्चारित की अनुच्चारित ते सरसकट सांगता येणार नाही. तो शिरोबिंदू, स्वरादी नासोच्चार दाखविणारा ('मूं मूं' 'वें वें') शिरोबिंदू, आणि 'अ' चे दीर्घत्व दाखविणारा शिरोबिंदू हे विशिष्ट संदर्भांनी बद्ध नाहीत, परस्परभिन्न क्षेत्रे व्यापणारे नाहीत. म्हणून त्यांचा एकमेकांत व अन्य शिरोबिंदूत घोटाळा होण्याचा 'संभव' आहे. पण तो 'संभव' चिन्हानुसारी वर्णक्रमीचा असण्यापेक्षा मूळ लेखनपद्धतीचा आहे, हे लक्षात घेतले पाहिजे. कोणत्याही वर्णक्रमीत तसा दोष राहणारच.

१०

मला स्वतःला लेखनचिन्हानुसारी वर्णक्रमी बरीच शास्त्रशुद्ध व सुलभ वाटते. भावी कोशकारांनी व सूचिकारांनी तिचा स्वीकार करून प्रत्यक्ष उपयोग केला, तर ती प्रसार पावेल, असा मला भरवसा आहे. 'शुद्धलेखन विवेका'त सुमारे सहा हजार शब्द मी या वर्णक्रमीप्रमाणे लावून दाखविले आहेत. वर्णक्रमीपूर्वी (१) मूलभूत लेखनचिन्हे व त्यांचा क्रम, (२) शब्दांच्या पृथक्करणाची पद्धती, नि (३) त्यावरून शब्दक्रम ठरविण्याची पद्धती या गोष्टी दिल्या म्हणजे पुरे होते.

प्रस्तुत लेखात दिलेल्या वर्णक्रमीवर कोणी खाजगी किंवा जाहीर टीका-टिपणी केली तर ती मला स्वागतार्ह वाटेल.

('रमा-मंगल', २९ सहवास, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२)

---

## श्री. ज. जोशी स्मृत्यर्थ कथा-पुरस्कार

सुप्रसिद्ध साहित्यिक कै. श्री. ज. जोशी यांच्या स्मृत्यर्थ पुणे नगर वाचन मंदिरातर्फे दरवर्षी १३ जानेवारीला ग्रंथपुरस्कार (रु. एक हजार एकचा) दिला जातो. १३ जानेवारी १९९४ रोजी हा पुरस्कार उत्कृष्ट कथासंग्रहाला (लेखकाला) देण्यात येणार आहे. पुरस्कारासाठी ज्या लेखकांना वा प्रकाशकांना १९९३ मधील कथासंग्रह पाठवावयाचा असेल त्यांनी संग्रहाच्या दोन प्रती पुणे नगर वाचन मंदिर, १८१ बुधवार, बेलबागेसमोर, पुणे २ या पत्त्यावर आणून द्याव्यात.



अनुक्रमणिका






डॉ. मंदा खांडगे

# बालकवींच्या गावी

*हे अमर विहंगम, गगनाचा रहिवासी*
*त्या नील सागरावरचा, चतुर खलाशी*
*प्रिय सखा फुलांचा, ओढ्यांचा सांगाती*
*त्यांच्यास्तव धुंडुनि ताराकण आकाशी*
*आणली धरेवर अक्षर या धनराशी ॥*

कविवर्य कुसुमाग्रजांनी बालकवींबद्दल रचलेल्या या ओळी खरोखर बालकवींच्या वृत्तीचं मर्म आणि त्यांच्या निसर्गकाव्याचं नेमकेपण सांगणाऱ्या.

त्र्यंबक बापूजी ठोंबरे--बालकवी. आधुनिक मराठी कवितेच्या वाटचालीतील महत्त्वाचा टप्पा. आधुनिक मराठी कवितेचं जनकत्वाचं पद कवी केशवसुतांना बहाल केलं. "त्या बड्या वंडवाल्यांत- केशवसुत पहिला ठरला." त्यानंतर महत्त्वाचं नाव ठळकपणे पुढे येतं बालकवी. तसंच बालकवी आणि गोविंदाग्रज या जोडीचं. निसर्गाला शब्दरूपानं बांधणाऱ्या बालकवींना समकालीन कवींनीही गौरविलं.

*सौंदर्याची द्वाही फिरविण्या वा तव अवतार ।*
*नवकवितेच्या जरिपटक्याचा तुलाच अधिकार ॥*

अशा सार्थ शब्दांत गोविंदाग्रजांनी आपल्या मित्राच्या कवितेचा गौरव केला. बरोबरीच्या कवीश्वरांवर टीका करणाऱ्या गोविंदाग्रजांनी बालकवींना जरीपटक्याचा मान बहाल केला. "पण प्रतिभाधर्माने खरा नवीन कवी फक्त एकच पहिला आणि शेवटचाही : तिशीच्या आत दिवंगत झालेले बालकवी ठोमरे," कवी मर्ढेकरांनी बालकवींबद्दल काढलेले उद्गार; तर या बालकवींना 'सृष्टीचा शाहीर' म्हणून गौरविणाऱ्या कवी माधवांनी

*हा कविरत्नातील हीर*
*रसगंगा तरुच्या सुमनी*
*रसगंगा याच्या कवनी"*

म्हणत सार्थ गौरव केला. पण या कवीचा खरा गौरव याआधीच झाला होता. १९०७ साली जळगावी कविसम्मेलन भरलं होतं तेव्हा. अध्यक्ष होते इंदिरा काव्याचे कर्ते डॉ. कान्होबा रणछोडदास कीर्तीकर. वि. मो. महाजनी, अनंततनय, चंद्रशेखर, माधवानुज, लोंढे असे तत्कालीन नामवंत कवी जळगावी या सम्मेलनासाठी उपस्थित राहिले होते. याच सम्मेलनात खानदेशातल्या या १६-१७ वर्षांच्या ठोमरेंनी आपली कविता वाचली—



अनुक्रमणिका







*"अल्पमती मी बालक नेणे काव्यशास्त्रव्युत्पत्ती*
*कविवर्यांनो मदिय बोबडे बोल धरा परी चित्ती*

या चौदा ओळींच्या फटक्याला रसिकांनी टाळ्यांच्या कडकडाटात दाद दिली. या अल्पवयीन मुलाची काव्यप्रतिभा पाहून समुदाय अवाक झाला. अध्यक्ष कीर्तिकरांनी त्याला जरीकाठी उपरणं देऊन त्याचा गौरव केला 'बालकवी' म्हणून. आणि तीच ही उपाधी आपल्या अवघ्या अठ्ठावीस वर्षांच्या आयुष्यात वागवणारा हा बालकवी. त्यांची नुकतीच जन्मशताब्दी साजरी झालीय. तोपर्यंतच या कवीचं ७५ वं स्मृतिवर्षही आलं. काळ भराभरा लोटला, पण बालकवींची कविता रसिकांनी अत्यंत प्रेमानं मनात जपलीय. बालकवींच्या कवितेसारखी निसर्गकविता होणे नाही, हेच खरं. अशी अभिजात प्रतिभासंपन्न लावण्यमयी झळाळलेली सृष्टीची कवनं, तिच्यातला आशय, नादमाधुर्य मराठी रसिकांच्या मनात सतत झिरपत राहिलाय. श्रावण मासामधला दुथडी भरून वाहणारा उल्हास, 'फुलराणी'तला निर्व्याज मनोहर गोडवा, 'तू तर चाफेकळी'मधील प्रेमाची आर्त माधुरी, औदुंबरातील शब्दशिल्प – – बालपणापासून या कवितांनी मनाला रिझवलं. जसजशी काव्याची जाण येत गेली तसतसं त्या कवितेतलं अंतर्गत सौंदर्य मनामध्ये जास्त गहिरं होत गेलं. आपल्या कलाचक्षूंनी पाहून आपल्या कवितांमधून बालकवींनी अवघा निसर्ग सचेतन केला. "सृष्टीचं सौंदर्य उकलून दाखविण्यासाठीच माझा जन्म आहे. तारकांचे संगीत मला नेहमी ऐकू येते. आकाशाची शोभा आणि जलाशयाची गति-स्थिती यांतून मला सारखे संदेश येतात" असे बालकवी सांगत. त्यांच्या प्रतिभेने सृष्टीला सहज प्रतिबिंबित करण्याचा धर्म कधीच सोडला नाही. अगदी सहजातवृत्तीने निसर्गाची गुजं, निसर्गाची विलसितं लडिवाळपणे शब्दांमध्ये गुंफणाऱ्या बालकवींच्या– या सृष्टीच्या शाहिराच्या कविता पुनःपुन्हा वाचल्या, आस्वादल्या. बालवयात त्या कवितांशी जमलेली गट्टी आणखी दृढ झाली. 'पाय टाकून जळात बसलेल्या' औदुंबरानं भारून टाकलं होतं, 'कुणी नाही ग कुणी नाही ! पाहत आम्हाला बाई' तारकांच्या गाण्यातील शब्दांचं लाघव आणि 'गर्द सभोंती रान साजणी तू तर चाफेकळी' या गीतातली फिरकी चालीसह सतत मनात रुंजी घालत राहिली. या कवितांची, त्यांतल्या सौंदर्याची मोहिनी सुटेना. चल त्या निसर्गाकडे. डोळे भरून पाहा तो निसर्ग. या सृष्टीच्या शाहिराचं गाव पाहून ये. मनाला अशी ओढ लागून राहिली. खरंच या कवीचा गाव पाहावा, त्याचं घर हिंडून पाहावं असं फार वाटू लागलं. कवीच्या गावी जाऊन त्याच्या स्मृतीला आदरांजली वाहावी, आणि मग खानदेशी प्रस्थान ठेवावं. बालकवींच्या गावी.

नभ ओथंबून आलेलं होतं. मृगाच्या सुरुवातीला पावसानं ताल चांगला धरला होता. पेरण्या झाल्या होत्या. वीतभर उंचीची रोपं डुलू लागली आणि पावसानं दडी मारली. पार महिन्यापेक्षाही जास्त आणि आता हे आभाळ असं भरून आलेलं, केव्हाही कोसळेल असं. पुण्याहून चोपड्याची रातराणी पकडून अगदी पहाटेच चोपड्याला उतरले. आभाळ भरलेलं










पण कोसळत नव्हतं. त्यामुळे हवा पडलेली होती. सकाळी थांवून चोपड्यावरून धरणगावला जायचा बेत आखलेला. ज्या स्नेह्यांकडे थांवले होते त्यांनी सांगितलं की, बालकवींच्या पत्नी पार्वतीबाई अखेरच्या काही दिवसांत चोपड्यातच होत्या. तिथल्या कृष्णमंदिरात त्यांचं वास्तव्य असायचं. ते स्थान मी उतरले होते तेथून पायी चालत जाण्याइतकं जवळ होतं. म्हणून धरणगावची एस.टी. पकडण्याआधी कृष्णमंदिरात जायचा बेत त्वरित आखला. चोपडा नगर वाचनालयाच्या रस्त्यावरच हे मंदिर आहे. शेजारीच के. डी. पोतदार नावाचे गृहस्थ राहतात. ते ओळखीचे निघाले. त्यांनी अगत्यानं आपल्या घरी नेलं. पाहुणचार केला. खानदेशी अगत्यशील पाहुणचाराची ती सुरुवात होती. खानदेशच्या मातीत बहिणाबाई आणि बालकवींसारखी दोन तेजःपुंज कविरत्नं निपजली, याचा सार्थ अभिमान त्या गृहस्थांच्या बोलण्यातून जाणवत होता. केवळ बालकवींचं गाव पाहण्यासाठी आलेय हे त्यांना समजल्यावर तर फारच आनंद झाला. त्यांनी पार्वतीबाई ठोमरेंच्या वृद्धापकाळातील कितीतरी आठवणी सांगितल्या. ज्या मंदिरात त्यांचं वास्तव्य असायचं ते कृष्णमंदिर पाहण्यास ते मला आवर्जून घेऊन गेले. मंदिरात सुधामाई दांडेकर राहत. त्यांनी पार्वतीबाईंची खूप देखभाल केली. चोपड्यात त्यांचे काही नातेवाईक होते. त्यांची काही मदत होईल म्हणून त्या इथे येऊन राहिल्या होत्या. जवळजवळ पंचवीस-तीस वर्षं त्या इथे राहिल्या, पण वृद्धावस्थेत शेवटी त्या नागपुरास गेल्या. शेवटी शेवटी त्या अगदी अबोल झाल्या होत्या. लिहीत चांगल्या. दिवसभर मंदिरात असत. पोतदार पार्वतीबाईंच्या आठवणी सांगत होते. मंदिरातून निघताना त्यांनी समोरचं एक घर दाखवलं. ते इंजिनिअर टिल्लूंचं. त्याच्यापलीकडेच एक नुसता दगडांचा चौथरा शिल्लक दिसत होता. बाकी तिथे रानटी झुडपं वाढलेली. जवळच मातीचा ढीग अशा अवस्थेतील ती पडिक जागा. काही काळाचं ते पार्वतीबाईंचं निवासस्थान होतं. त्या जागेची अशी अवस्था पाहून वाईट वाटलं. कुठल्यातरी ऋणानुबंधानं त्या इथं वास्तव्याला आल्या होत्या. संसारी जीवन अगदी अल्पसं त्यांच्या वाट्याला आलं होतं. तारुण्यात वैधव्याची झळ सोसावी लागली आणि अखेरचे दिवस तर विपन्नावस्थेत गेले. बालकवींच्या पत्नीचीं अखेरच्या दिवसांतली ती हकीगत ऐकून फार दुःख झालं. गुजराती-मारवाडी वस्ती जास्त प्रमाणात असलेल्या चोपड्याला बालकवींचे ठुसे नावाचे कोणी नातेवाईक होते. त्यामुळे त्याचं इथे येणं होत असे. बोलण्यातून माहिती मिळत होती. धरणगावच्या एस.टी.त बसेपर्यंत धरणगावाविषयी बरीच माहिती हाती आली होती. आता चोपड्यावरून धरणगावचा प्रवास सुरू झाला होता. अवघा दीड तासाचा रस्ता होता. हवा ढगाळ असल्याने हवेत गारवा होता. काळेभोर शेताचे तुकडे आणि त्यात पेरून उगवलेलं असल्याने मधूनच दिसणारे हिरवे तुकडे. दाट झाडी. गाडीत काही शेतकरी मंडळी होती. आता पाऊस पडला नाही तर रोपं करपतील, पिकाचं नुकसान होईल. त्यांच्या टिपीकल खानदेशी भाषेत त्यांची एकमेकांत चाललेली चर्चा. एकूण पाऊस न पडल्याने

इथलेही शेतकरी हताश झालेले होते. दीड तासात धरणगाव आलं. अग्निहोत्री गल्लीतील पाटील यांच्या घराचा पत्ता जवळ होता. स्टँडवरून डाव्या हाताला सरळ रस्त्यावर बाजार भरलेला दिसत होता. बाजार करून परतणारी मंडळी स्टँडवर बरीच दिसत होती. एरंडोल तालुक्यातलं हे धरणगाव जळगावच्या पश्चिमेला ३५ किलोमीटर अंतरावर असलेलं तीस-चाळीस हजार वस्तीचं गाव. भुसावळ-सुरत रेल्वे मार्गावरचं स्थानक. गाव म्हटल्यावर जे दृष्य डोळ्यांसमोर येतं त्याप्रमाणे स्टँडवरून चालायला सुरुवात केल्यावर कोपऱ्यावर हॉटेल, रसाचं गुऱ्हाळ, पानाचं दुकान. त्या कोपऱ्यावर मंडळींकडे चौकशी करून स्टँडवर रिक्षा केली. गल्लीबोळ पार करताना ठिकठिकाणी जमिनीत खोदलेले खड्डे दिसत होते. पावसानं दडी मारल्याने अजूनही पाण्याचे हाल दिसत होते. बायका जमिनीतल्या त्या खड्ड्यातून (छोट्या चरव्या दोरीला बांधून) पाणी काढत होत्या. सगळ्या गल्ल्या सारख्याच दिसत होत्या. त्यांतली एक अग्निहोत्री गल्ली म्हणून दिलेल्या पत्त्यावर रिक्षेवाल्यानं सोडलं.

पाटील मंडळींना त्यांच्या दारी उतरल्याने आनंद झाला. गेल्या एक-दीड वर्षात काही मंडळी धरणगावी येऊन गेली. त्यांतली बरीचशी पत्रकार मंडळी होती. पाटलांच्या बोलण्यावरून समजलं, बालकवींची जन्मशताब्दी इथं उत्साहानं साजरी झाली होती. उत्साहाची ती लाट अजूनही तिथल्या ग्रामस्थांच्या बोलण्यातून जाणवत होती. चहापाणी होईपर्यंत श्री. पाटील यांनी तिथले युवक कार्यकर्ते श्री. दिलीप पाटील यांना बोलावून घेतलं. धरणगाव पत्रकार संघाच्या अध्यक्षपदी त्यांची निवड नुकतीच झाली होती. त्यांना मी 'दोन दिवसांत इथला सारा परिसर, बालकवींचं घर, दत्ताची टेकडी, डोह सारं पहायचंय, जमलं तर एरंडोललाही जायचंय आणि तेथून जळगावी जाऊन पुढं आतोंडं भादली वगैरे गावी जायचंय' असा सारा आराखडा सांगितला. बरोबर श्री. पाटील होतेच. पण इथला सारा परिसर व्यवस्थित फिरून दाखवतील असे आणि बालकवींच्या काव्यावर मनापासून प्रेम करणारे श्री. मोहन जैन यांची गाठ घालून देतो, असं त्यांनी सांगितलं. त्याप्रमाणे श्री. जैन यांना बरोबर घेऊन प्रथम गावाबाहेरील फेरफटका करायचा होता. श्री. जैन एरंडोल ग्रामपंचायतीत काम करतात. बालकवींच्या काव्यावर मनापासून प्रेम करणारे. स्थानिक कवी कै. गो.गं. वाजपेयी (गोविंदानुज) यांचे शिष्य. धरणगावातील टेकड्या, आसपासचा परिसर, सारा त्यांना तोंडपाठ. धरणगावी पोहोचल्यावर तासाभरातच गावाबाहेर फेरफटका करायला सर्वजण निघालो. श्री. जैन यांनी धरणगाव हे जसं बालकवींचं तसंच संग्रामगीतं लिहिणाऱ्या कवी तिवारींचं आणि देशभक्तीपर कवनं लिहिणाऱ्या कवी विनायकांचंही असल्यानं आम्हाला आमच्या गावाचा सार्थ अभिमान आहे हे सांगितलं. जैन यांनी बालकवी जन्मशताब्दी समारंभात सक्रिय भाग घेतला होता. त्या आठवणी त्यांच्याजवळ ताज्या होत्या. बोलता बोलता आम्ही गावाबाहेरील आत्ता जिथं कॉटन मार्केट झालंय त्या रस्त्यापर्यंत येऊन पोहोचलोही. हवा अजूनही ढगाळ होती, पण आता छान वारा वाहत होता.

गाव थोडं दूर राहिलं होतं आणि शेतांची शिवारं दिसू लागली. उजव्या हाताला वळल्यावर दाट झाडी. आम्ही आता मुख्य रस्ता सोडून पायवाटेने कॉटन मार्केटवरून सरळ पुढे आलो. हिरवाई डोळ्यांना शांतवत होती. फक्त जलधारा बरसाव्यात असं सारखं मनात येत होतं. पुढे आणखी दाट झाडी होती. दत्त टेकडीकडून धरणी नाल्यामधून इथं पाणी वाहत येतं. आम्ही पुढे चालत होतो तो त्या नाल्याच्या– निर्झराच्या काठावरून. पण पाऊस अजूनही न पडल्याने तो कोरडा पडला होता. दोहो बाजूला इथं पूर्वी सीताफळाची झाडे होती. या परिसराला 'पाटलाची खेड' म्हणतात.' जैन सांगत होते, 'आता हा समोर दिसतोय तोच औदुंबर. बालकवींचा 'पाय सोडून जळात बसलेला औदुंबर'.' दुरूनच त्याच्या बुंध्याचा अतिशय सुंदर असा विस्तार दिसत होता. कवेत मावणार नाही असं खोड असलेला वृक्ष. बालकवींनी आपल्या कवितेतून अजरामर केलेला. ज्या औदुंबराने मंत्रमुग्ध केलं होतं तो पुढ्यात होता. एखाद्या स्थितप्रज्ञासारखा भासत होता. निर्झराच्या काठावरचा तो वृक्ष आता उगाचच गूढ वाटू लागला. संध्याकाळच्या सावल्या पसरू लागल्या होत्या. तिथून पलीकडे पायवाटेने पुढे निघालो. बालकवींच्या अनेक कवितांतील ओळी, मनात रुंजी घालू लागल्याः

*'सुंदर झाडी पाणंद मोठी, शीतल छाया तीत पडे*
*वाढुनी वेली फुगडी झाली त्यातुनी ओढा वाहतसे'*

आसमंत न्याहाळताना जाणवत होतं– बालकवींच्या किती एक कविता आपण वाचल्या. त्या कवितांचा पट आपण मनावर कोरला, पण आज मात्र आपण तो निसर्ग साक्षात अनुभवतोय. बालकवींनी शब्दांच्या कुंचल्यांनी प्रतिबिंबित केलेला निसर्ग. कुसुमाग्रजांच्या म्हणण्यानुसार 'बालकवींनी एखाद्या विशिष्ट स्थळावर, नदीवर वा पर्वतावर कविता लिहिली नाही. शिवसुंदराच्या आधाराने त्यांनी एक खास स्वतःची वेगळी अशी निसर्गसृष्टी निर्माण केली.' पण बालपणी काय किंवा तरुण वयात काय ज्या निसर्गातून ते हिंडले, ज्या निसर्गावर त्यांनी मनापासून प्रेम केलं, त्या निसर्ग-दृष्यांचा तपशील तर त्यांनी डोळ्यांत साठवून निश्चितपणे आपल्या प्रतिभाशक्तीने शब्दरूप केला असणार खास. कदाचित, ते निश्चित दाखवता येईल असं एखाद्या विशिष्ट स्थळाचं निसर्गरूप नसेलही. पण ते काल्पनिकही नाही असं मला वाटतं. मनातल्या मनात हे विचार चालू होते. औदुंबराला वळसा घालून पायवाटेनं पुढे गेल्यावर गर्द झाडीत भेटला तो 'डोह'. पाण्यात झाडांच्या सावल्या उतरल्या होत्या. संपूर्ण डोहाच्या कडेकडेनं मोठमोठे दगड एकावर एक रचून तो मुद्दाम बांधल्यासारखा वाटत होता. पायवाट तशीच पुढे जाऊन गर्द झाडीत वळलेली होती. हा डोह तीन एकशे वर्षांपूर्वी उत्तर हिंदुस्तानातून आलेल्या दोन कनोजी ब्राम्हणांनी बांधला म्हणे. हे ब्राम्हण धरणगावी आले, पण त्यांना प्यायला पाणी मिळालं नाही. पाण्याचं एवढं दुर्भिक्ष पाहून त्यांनी हा डोह बांधला अशी कथा सांगतात. पश्चिमेकडून नाला येतो त्याच्या पाण्याने पावसाळयात हा डोह संपूर्ण भरतो. आत्ताही त्यात बऱ्यापैकी पाणी होतं. स्थानिक

मंडळी या डोहाला 'ब्राम्हण तलाव' म्हणून ओळखतात. वाटेत चढावर एक छोट मंदिर दिसलं, पण ते मंदिर नसून ती जैन साधूंची समाधी आहे. त्याला निःसही म्हणतात, अशी माहिती श्री. जैन यांनी दिली. आम्ही सर्वजण त्या डोहाच्या काठाकाठाने असलेल्या दगडांवर बसलो. 'औदुंबर'मधलं ते निसर्गचित्र मी अनुभवत होते. आठ ओळींच्या कवितेतलं ते निसर्गाचं दृष्य पाहिलं मात्र आणि जाणवलं श्रावणमास किंवा औदुंबर, निर्झर या कविता डोळयांसमोर आणल्या, तर एखाद्या प्रतिभाशाली चित्रकाराने रंगरेखांचा उपयोग न करता त्याऐवजी शब्द योजून ते दृष्य चित्रित केलंय. खरीखुरी सृष्टिकविता ती हीच, हा साक्षात्कार होत होता. बालकवींना निसर्गाची ओढ बालपणापासूनच होती. नदीनाल्यांच्या काठाकाठाने हिरवळीवरून दूरदूर फिरणे पाण्यात पाय सोडून प्रवाह पाहत तास न् तास बसणे, आकाशातील मेघमालेच्या आकृतीत रमणे, चंद्रसूर्यांचे उदयास्त पाहणे. सर्वसामान्य माणसाला ही अशी ओढ नसते. बालकवी संसारापेक्षा कवितेत जास्त रमले, हे खरंच. आणि म्हणूनच त्यांच्या एकूण कवितांत निसर्गकवितांची संख्या जास्त आहे. 'औदुंबरा'ने तर रसिकांना वेडं केलंच, पण मराठीतल्या यच्चयावत समीक्षकांनी 'औदुंबरा'ची विविध प्रकारे चिकित्सा केली, इतकी की त्या मूळ आकृतिबंधातलं सौंदर्यच नष्ट व्हावं. म्हणूनच मला, ना या 'औदुंबरा'वर भाष्य करायचं होतं, ना या निसर्गचित्राला समीक्षेच्या फूटपट्टीनं मोजायचं होतं. त्यातलं निखळ सौंदर्य, रंगरूप फक्त अनुभवायचं होतं. 'औदुंबरा'तलं ते दृष्यचित्र, त्याचा विस्तीर्णपट आता साक्षात पुढ्यात होता.

*"ऐल तटावर पैल तटावर हिरवाळी घेऊन*
*निळासावळा झरा वाहतो बेटाबेटातून,*
*चार घरांचे गाव चिमुकले पैल टेकडीकडे,*
*शेतमळ्याची दाट लागली हिरवी गरदी पुढे*
*पायवाट पांढरी तयातुनि आडवी तिडवी पडे,*
*हिरव्या कुरणामधुन चालली काळया डोहाकडे.*
*झाकळुनी जळ गोड काळिमा पसरी लाटांवर,*
*पाय टाकुनी जळात बसला असला औदुंबर."*

निसर्गदृष्यातील या रंगाची उधळण सूक्ष्म तपशिलासह डोळयांनी टिपता येत होती. आठ ओळींच्या कवितेतील पहिल्या चार ओळींतूनच गाव, शेतमळा, झरा यांनी व्यापलेलं विहंगम दृष्य मी साक्षात पाहत होते. निळासावळा झरा, शेतमळयांची गर्दी, पांढरी पायवाट आणि काळा डोह एवढं मोजक्या रंगाचं ते दृष्य चित्र कवितेतल्या शब्दांच्या चौकटीत बांधलेलं होतं. शेतमळयांच्या गर्दीतून वाहणाऱ्या निळयासावळया झऱ्यावरून नजर मागे जात जात चार घरांचं चिमुकलं गाव ओलांडून पैल टेकडीकडे पोहोचली. केवढा विस्तीर्ण



अनुक्रमणिका







पट कवीने पार्श्वभूमीसाठी घेतला होता. हिरव्या कुरणामधून आलेली पांढरी पायवाट. कुणा समीक्षकाने ही पांढरी पायवाट म्हणजे विधवा स्त्री वाटली व ती आपल्या प्रियकराला भेटायला (किंवा जीव द्यायला) काळया डोहाकडे चालली आहे, अशी कल्पना केली आहे. खरोखर एखाद्या अर्थसंपन्न प्रतिभेची अशी विचित्र चिरफाड हे समीक्षक का करतात हेच समजत नाही. या आठ ओळींच्या कवितेतील अनेक अर्थक्षमता मनाला निश्चितपणे भुरळ घालतात आणि हेच या कलाकृतीच्या श्रेष्ठतेचं गमक आहे. प्रत्येकाला या कवितेतून नवा अर्थ जाणवेल, अशी अर्थाची अनेक वलयं निर्माण होतील. शब्दमाधुर्य आणि पदलालित्य यांनी ओथंबलेल्या या कवितेतील आठ ओळीत अशी काही गूढरम्यता भरून राहिली आहे की समीक्षकांनी जळात पाय टाकून बसलेल्या 'असल्या' औदुंबराचा छडा लावण्याचा प्रयत्न केला, त्यातच बालकवींच्या अलौकिक प्रतिभेचं मर्म सामावलंय हे खरं.

'औदुंबरा'चं ते संपन्न निसर्गचित्र, तो परिसर हे सारं दृष्य मनात परत एकदा साठवून घेतलं. कारण आता लवकर निघायला हवं होतं. एका स्वच्छ, नितळ, पारदर्शक कवितेचं ते चित्रमय वर्णन पाहत पाहत आम्ही निघालो. 'औदुंबर'सारख्या शुद्ध शब्दशिल्पातून संशोधकांनी गूढार्थ, भलभलते अर्थ का शोधावेत, या प्रश्नाचंही उत्तर नेमकं नव्हतं. आलो त्याच वाटेने परत निघालो. पायवाटेने परत औदुंबराकडे दृष्टिक्षेप टाकला. डोह, पाण्यात पाय सोडून बसलेला औदुंबर आता परतीच्या वाटेवर हे सारं मागे पडलं. परत थोडा शांतपणे मनात विचार आला. शंभर वर्षांपूर्वी हे गाव अगदी अल्प लोकवस्तीचं असणार, म्हणूनच 'चार घराचं गाव चिमुकलं' आणि 'पैल टेकडीकडे' असं वसलेलं असणार. आणि पांढरी पायवाट म्हणजे 'पांढर' म्हणजे ज्या जमिनीवर राहण्यासाठी वस्ती केली जाते अशी जागा. अशी पांढरीतील पायवाट आडवी तिडवी म्हणजे वळणावळणाने या शेतशिवारापर्यंत येऊन पोहोचलेली. इथे गर्द झाडी होती. त्यातून वाट काढत ही पाचवार पांढरी काळ्या डोहापर्यंत पोचलेली. बस, यात गूढार्थ वगैरे काही नाही. बालकवींसारख्या सुकुमार शैलीच्या कवीच्या स्पर्शाने सचेतन झालेला हा निसर्ग. त्यात भेटतात पाचूची हिरवी रानं, पिवळी शेतं, निळी लव्हाळी, वनमालांचा हिरवा शेला, लुसलुशीत बहरणारी हिरवळ.

परतीच्या वाटेवरच ठरवलं, असंच थेट आता बालकवी ज्या घरात जन्मले ते घर पाहायला जाऊ या. संध्याकाळ झालेली होती. शेतकरी मंडळी घराकडे परतत होती. तीळ पेरून परतणाऱ्या एका शेतकऱ्याच्या बैलगाडीतून थोडा प्रवास केला. बैलांच्या गळ्यातील घुंगुरमाळांचा नाद आसमंतात किणकिणत होता. शहरी जीवनात वावरणाऱ्यांना बैलगाडीतील प्रवासाची काय कल्पना ! तीही हौस भागली. पायवाट संपली आणि मुख्य रस्त्याला लागल्यावर आम्ही गाडीवानाला धन्यवाद देऊन पायउतार होऊन गावाकडे चालू लागलो. वाटेत धरणगावातील शाळा लागली. बालकवी जन्मशताब्दी निमित्ताने या शाळेचं नामकरण 'कै. बालकवी ठोमरे प्राथमिक शाळा' असे करण्यात आल्याचे समजले. जैन

गल्लीत पोहोचेपर्यंत मोहन जैन हे आम्हाला बालकवी ज्या घरात जन्मले ते घर कसं शोधून काढलं ते सांगत होते. मुळात बालकवी धरणगावी जन्मले की एरंडोल येथे हाही थोडा वादाचाच विषय होता त्या वर्षी. मी तर मागे म्हणजे दहा एक वर्षापूर्वी कै. सोपानदेव चौधरी यांच्या एका लेखात बालकवींचा जन्म आसोद्यापासून दीड मैलावर असलेल्या नरसोंदा (तृषोदक) या गावी झाल्याचे त्यांनी नमूद केल्याचं वाचलं होतं. त्यामुळे मलाही थोडा संभ्रम पडला होता, की, खरंच बालकवींचं जन्मगाव कोणतं ? ठोमऱ्यांचं मूळ गाव तरसोंदे. पण काही पुस्तकांतून नगर जिल्ह्यातील पारनेर असं नमूद केलं आहे. काही असो, पण नोकरी-व्यवसाय निमित्ताने बालकवींचे वडील बापूराव देवराम ठोमरे धरणगावी स्थायिक झाले होते. पोलिस खात्यात नोकरीला असल्याने जळगाव-धुळे जिल्ह्यातील नोकरीच्या त्या त्या गावी त्यांची फिरती झाली. सेवानिवृत्तीनंतर मात्र बालकवींचे वडील एरंडोलला स्थिर झाले. अवघं नऊ वर्ष पितृछत्र लाभलेल्या बालकवींचं जन्मगाव मात्र धरणगाव हे निश्चित. कारण बालकवींचं मातुलघर आणि मातुलगाव हे धरणगाव. आजही त्यांचे धरणगावी दूरचे काही नातेवाईक आहेत.

जैन गल्लीतील थोड्या उंचवट्यावर असलेल्या घरापाशी येऊन आम्ही थांबलो. हेच ते बालकवींचं जन्मघर. श्री. जैन यांनी जैन गल्लीतील कोपऱ्यावरील घर दाखवलं. घरावरचं पत्र्याचं छत लक्ष वेधून घेत होतं. त्यावरून त्या घराची नव्याने डागडुजी केलीय हे लक्षात येत होतं. बाकी जुन्या खुणा न पुसलेलं हे बालकवींचं जन्मघर कवी ना. धो. महानोरांनी स्थानिक कार्यकर्त्यांच्या मदतीने शोधून काढलं आणि बालकवींच्या जन्मशताब्दीचा समारंभही या घरात घडवून आणला. बालकवींचं हे घर शोधून काढलं त्यावद्दल महानोरांना धन्यवादच द्यायला हवेत. एरवी बालकवींचं जन्मघर गुलदस्त्यातच राहिलं असतं. कारण बालकवींच्या जन्मशताब्दीची कुणकुण लागेपर्यंत 'बालकवी' नावाचा आधुनिक मराठी काव्यातील महत्त्वाचा कवी, सृष्टीची गीतं गाणारा 'निसर्गकवी' या गावात जन्मला हे बऱ्याचशा ग्रामस्थांना माहीतही नव्हतं. आता हे घर सुधीर देवीदास डहाळे यांच्या मालकीचं आहे. त्यांच्या आजोबांनी सत्तर वर्षांपूर्वी हे घर श्री. कमलाकर शुक्ल यांच्याकडून विकत घेतलं. शुक्ल हे बालकवींचं मातुलघर. बालकवींचे मामा वैद्य होते आणि ते घरातच वैद्यकीचा व्यवसाय करीत. सध्या या घराचा निम्मा भाग तसाच ठेवून निम्म्या भागात बऱ्याच सुधारणा केलेल्या आहेत. जुन्या भागात कोरीवकाम केलेला दरवाजा, मध्यावरचे खांब, ह्या जुन्या मातीतल्या भिंती घर किती जुनं आहे ते सांगायला पुरेशा वाटल्या. जिथं बालकवींच्या मामांचा वैद्यकीय व्यावसाय चाले त्या खोलीतील काचेची कपाटं, बैठकीची इतर मांडणी यावरून खात्री पटली हेच ते घर. ती मांडणी अजूनही डहाळे यांनी तशीच ठेवलीय. आम्ही सर्व घर हिंडून पाहिलं. ज्या भागाची दुरुस्ती केलीय त्यातील पुढील मोकळ्या भागात बालकवींची जन्मशताब्दी साजरी झाली. त्या वेळी तिथं शतदीप प्रज्वलित

केले होते. समारंभाचे फोटोही पाहायला मिळाले. छोट्या गावात त्या वेळी हाही एक आगळा उत्सव साजरा झाला. गावकऱ्यांनी मोठ्या उत्साहाने त्यात भाग घेतला होता. शुक्लांकडील पाहुणचार घेऊन आम्ही घराच्या बाहेरच्या बाजूने चक्कर मारली. बाहेरच्या बाजूला खिडकीजवळील भिंतीवर वीतभर उंचीचं उंबराचं झाड डुलत होतं. माझं त्या उंबरानं लक्ष वेधलं. ज्या औदुंबराच्या ओढीने मी धरणगावी आले होते त्याचं बालरूप बालकवींच्या जन्मघराच्या भिंतीवर दृष्टीला पडलं मात्र, खूप मजा वाटली.

धरणगाव वस्तीनं लहान असलं तरी हातमाग उद्योगाचं केंद्र असून कपाशीवरील प्रक्रिया आणि तेलबियांसाठी प्रसिद्ध असलेलं गाव. सतराव्या शतकातील दोन गाव-दोरोन गाव– द्रोणगाव यांसारख्या नावांनी एक महत्त्वाचं व्यापारी केंद्र म्हणून या गावाचा उल्लेख आढळतो. श्री. जैन यांनी सांगितलं की १९७२ साली महाकवी बेंद्रे जळगावी आले असता धरणगाव नावाबद्दल ऊहापोह केला. पार्श्वनाथाचे यक्ष धरणेंद्र आणि यक्षिणी पद्मावती. या धरणेंद्र नावावरून 'धरणगाव' हे नाव पडले असावे. धरणगावात पार्श्वनाथाचे सुंदर मंदिर आहे.

सकाळी सकाळी आम्ही या मंदिराला भेट दिली. बरोबर श्री. पाटील, जैन, त्यांची कन्या व इतर मंडळी होती. सिटी सर्व्हेमध्ये या मंदिराचा उल्लेख 'पारसनाथ टेंपल' असा आहे, पण अलीकडे या मंदिराचा जीर्णोद्धार करण्यात आला व मंदिराला 'आदिनाथ मंदिर' असे नाव देण्यात आले आहे. हे मंदिर प्राचीन आहे. सभामंडप अत्यंत प्रशस्त व सुंदर आहे. मंडपात गायक-वादकांच्या मूर्ती लक्ष वेधून घेतात. पार्श्वनाथांची मूर्ती काळ्या सच्छिद्र पाषाणातील असून ती दोन हजार वर्षांपूर्वीची असावी. हा काळा पाषाणही याच भागातील आहे. मूर्तीच्या मस्तकावर फणाधारी नाग आहे. याव्यतिरिक्त मंदिरात इतर अनेक लहान-मोठ्या काळ्या पाषाणातील व संगमरवरी पार्श्वनाथाच्या मूर्ती आहेत. मूळ प्राचीन मूर्ती एरंडोलहून आणून इथे स्थापन केली असावी असे म्हणतात. एरंडोलला जैन कुटुंबे खूप आहेत. अंजनी नदीच्या काठावरील एरंडोल येथे पूर्वी ५२ जैन मंदिरे होती. मुसलमानांच्या आक्रमणात त्यांतील बरीचशी नष्ट झाली. श्री. जैन यांच्याकडे स्वतः जमवलेल्या २०० पेक्षाही जास्त अशा दुर्मिळ पोथ्या आहेत. त्यात जैन धर्मीय वाङ्मय आहे. तसेच दगडी, धातूच्या, पितळी अशा अनेक दुर्मिळ मूर्तीही आहेत. या सर्वांचं एक छोटं संग्रहालय जळगावी करण्याचा त्यांचा मनोदय आहे. धरणगावात येऊन एक अत्यंत सुंदर मंदिर अनपेक्षितपणे पाहायला मिळाल्याचा आनंद झाला. यानंतर मुख्य राहिली होती ती दत्ताची टेकडी. सकाळी सकाळीच हवाही छान होती. आम्ही दत्तटेकडीकडे जायला निघालो. दत्तटेकडी तशी गावापासून दूर असल्याने जरा लवकर जायला हवं होतं. कारण संध्याकाळपर्यंत एरंडोललाही जायचं होतं. बाजारच्या रस्त्यानं न जाता गावातील दुसऱ्या रस्त्याने श्री. जैन आम्हाला दत्त टेकडीकडे घेऊन गेले. ही दत्त टेकडी बालकवींचं स्फूर्तिस्थान होतं असं म्हणतात. स्थानिक लोक या टेकडीला 'डोंगरेपीर' म्हणूनही

संबोधतात. दत्त टेकडीच्या ह्या भागात इथंही दाट झाडी. अजूनही इथं मोर येतात. त्या भागाला 'वनबाग' असे म्हणतात. पावसाचे दिवस असूनही सकाळी कोवळं ऊन पडलेलं होतं. आम्ही दत्ताची टेकडी चढायला सुरुवात केली. एखादा मोरांचा थवा यावा असं फार वाटत होतं, पण त्यालाही भाग्य लागतं, थव्यानं आलेले मोर पहायला, आमच्यातील एकजण म्हणाले. मी मागे दत्तटेकडीचा तो हिरवागार परिसर डोळ्यात साठवत होते. टेकडीच्या पायथ्याशी पीर आहे. त्यावरूनच याला डोंगरेपीर म्हणत असावेत. इथे जवळच दत्ताचं देऊळ आहे, म्हणून दत्त टेकडी म्हणूनही ही टेकडी ओळखली जात असावी. टेकडी चढायला फार अवघड नाही. टेकडीचा सपाट भाग दूरवर पसरलेला. ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत हिरवीगार हिरवळ पसरलेली. जणू काही कुणी मुद्दाम लावलीय. एकही झाड नाही. वर निळंभोर आकाश. सूर्याची कोवळी किरणं, खाली दृष्टी टाकली तर दूरवर दाट झाडी. वरून भुसावळ- सुरत रेल्वे लाईनचा रस्ता. त्यावरून आगगाडी जाताना दिसत होती. खरोखर विहंगम असं दृष्य होतं. हिरव्यागार गवतावर चिमुकली जांभळया रंगाची फुलं सर्वत्र दिसत होती.

*"इवलाली गवतावरती । रानफुले फुलती, हसती"*
*झुलवीत अपुले तुरे तुरे । निळी लव्हाळी दाट भरे"*

बालकवींच्या 'निर्झरा'तील काव्यपंक्ती डोळ्यांसमोर आल्या. धरणी नाल्याचा उगम जिथून होतो ती जागाही पाहायला मिळाली. हळूहळू आम्ही टेकडीच्या दुसऱ्या बाजूने थोडं खाली उतरलो आणि खालचं दृश्य पाहून तर मन वेडावूनच गेलं. दाड झाडी आणि विहंगम अशी हिरवाई आणि निळाई. वर्णन करायला शब्द अपुरे पडावेत असं ते विलोभनीय दृश्य. टेकडीच्या त्या खालच्या भागात प्रचंड अशा मोठमोठ्या शिळा होत्या. त्या शिळांमुळे तिथे घळी निर्माण झालेल्या. आम्ही तिथून उतरून त्या शिळांवर येऊन बसलो. त्यांवर आघात केला तर एखाद्या धातुवर दगडाने आघात केल्यावर जसा आवाज येईल तसा आवाज येत होता. हे त्या शिळाचं वैशिष्ट्य आहे. वातावरण निःशब्द. त्यात तो वेगळा असा नाद आम्ही त्या शिळांवर लहान दगडाने ठोकल्यावर येत होता. तो प्रतिध्वनित होत होता. त्या शिळांवर पाय सोडून तिथला विलोभनीय आसमंत डोळे भरून मी पाहत होते. पाहत होते तो निसर्गाचा साक्षात्कार. बालकवींना झालेला, त्यांनी आपल्या काव्यपंक्तीत अजरामर केलेला. खरंच, संसाराचे व्यापताप सारं विसरून त्या निसर्गाला सामोरं जावं. भव्य दिव्य असा हा निसर्गच केवळ भोगावा. यापरतं काही नको असं वाटावं असा हा निसर्ग.

*सोडुनि स्वार्था तो जातो*
*द्वेष संपला... मत्सर गेला*
*आता उरला*
*इकडे तिकडे चोहिकडे आनंदी आनंदी गडे*

त्या निसर्गाच्या सान्निध्यात खरोखर अशी अवस्था झाली होती. "आनंदी आनंद गडे..



अनुक्रमणिका







. वरती खाली मोद भरे" त्या शिळांवरून परत वर चढून मी त्या सपाट टेकडीच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत फेरफटका मारला. पायातली चप्पल काढून ठेवली होती. ती मऊ लुसलुशीत हिरवळ, तिचा मखमली स्पर्श सारं अननुभूत होतं. टेकडीच्या चारी बाजूला दृष्टी पोहचेपर्यंत सगळीकडे दाट झाडी. खरंच या सृष्टीशी खरं सुंदरतेचं नातं जोडून बालकवींनी आपली अशी काव्यसृष्टी निर्माण केली. या निसर्गानं तर त्यांचं खरं शिक्षण केलं. अवघ्या २८ वर्षांच्या आयुष्यात त्यांनी भ्रमंतीही किती केली. लहानपणी वनवासींबरोबर थेट काश्मीरपर्यंत. तिथून जळगाव. मग महाबळेश्वर, नगर, नाशिक, बडोदे, पुणे, परत जळगाव. ही भटकंती पोटासाठी होती, तशी कवितेच्या छंदापायी होती. ह्या भ्रमंतीत निसर्गाने त्यांना भरभरून काव्यस्फूर्ती दिली.

*सुंदरतेच्या सुमनावरचे दव चुंबून घ्यावे*
*चैतन्याच्या गोड कोवळ्या उन्हात हिंडावे*

'बालविहगा'तल्या या काव्यपंक्ती काय किंवा

*'गाण्याने भरली राने । वरखाली गाणे गाणे'*

त्याप्रमाणे 'माझे दिव्य' मधील

*'त्या सह जी क्रीडा प्रेमच माझे खरे*
*ही क्रीडा म्हणजे जीवित माझे बरे..."*

ह्या बालकवींच्या कवितांतील काव्यपंक्तींची उजळणी मनात होताना एक काव्यरसिक या नात्याने त्यांच्या कवितेतला अर्थाशय मनात झिरपून या कवितांतले वेगवेगळे कंगोरे स्पष्ट होऊ लागले. त्यांच्या कलाकृतीचं सौंदर्य वस्तुरूप दर्शन भावायला लागलं. कलात्मक सौंदर्याबरोबर एकापाठोपाठ एक अशी सलग दृश्यचित्रं नजरेसमोर दिसू लागली, जी मी माझ्या कलाचक्षूंनी अनुभवत होते. बालकवींच्या कवितांची शब्दशिल्पं मी माझ्या मनावर कोरून घेत होते. भव्यदिव्य निसर्ग– बालकवींची कलाकृती– त्या कलाकृतीतील निसर्गाचं साक्षात दर्शन-निसर्गाचं ते विराटरूप असं मनीमानसी साठवत टेकडीवरच्या त्या शिळांवरून चढून परत सर्वजण टेकडीच्या माथ्यावर आलो. आता परत ऊन-सावलीचा खेळ सुरू झाला. उन्हानं दडी मारली आणि परत आभाळ भरून आलं. आम्ही टेकडी उतरायला सुरुवात केली. श्री. जैन यांनीही पाठ असलेल्या बालकवींच्या कितीतरी काव्यपंक्ती एकापाठोपाठ म्हणून दाखवल्या. त्याचं मला कौतुक वाटलं. जैन गुजराती माणसाचं बालकवींच्या काव्यावरचं प्रेम खरोखर कौतुकास्पद होतं. टेकडी उतरून, परतीच्या रस्त्यावर लागलं महादेवाचं देऊळ. जैन यांनी 'श्रावणमासी' कवितेतलं वर्णन करत करत आम्हाला त्या परिसराचं दर्शन घडवलं. तो सारा आसमंत सोडून परतूच नये असं वाटत होतं. पण दुपारपर्यंत एरंडोल गाठायचं होतं. धरणगावातील आणखीही काही स्थळं श्री. जैन दाखवू इच्छित होते. गावात एक मोठा दर्गा आहे, जो औरंगजेबाने बांधलाय असं म्हणतात. एक पाताळेश्वराचं मंदिरही आहे. ते सारं आम्ही दुरूनच पाहिलं.

परतीच्या वाटेवर आऊट्रमचा बंगला लागला. दुरूनच या बंगल्याच्या कमानी दृष्टीस पडल्या. इंग्रजांनी धरणगावात वखारी स्थापन केल्या त्या वेळी हा इंग्रज अधिकारी होता. इंग्रजांची इथं छावणी होती. त्यात पाचशे सैनिक असत. या आऊट्रमच्या बंगल्याचे भग्नावशेष आता तेवढे शिल्लक आहेत. शंभर कमानी असलेला हा बंगला केवढा भव्य असावा ते जवळ गेल्यावर दिसलं. ब्रिटिश स्थापत्याचं वैशिष्ट्य असलेला तो बंगला आता भग्न स्थितीत असला तरी एकेकाळी कसा दिमाखात उभा असेल! आऊट्रमचं हे निवासस्थान आता वटवाघुळं आणि कोळीष्टकं, दगडमातीचे ढीग, नाकात शिरणारा उग्र दर्प असं उद्‌ध्वस्त झालेलं. पण एकेकाळी धरणगावात दबदबा असलेल्या या आऊट्रमच्या बंगल्याबद्दल आजही लोक आस्थापूर्वक बोलतात. मला मात्र तो भग्न स्थितीतील बंगला पाहून बालकवींच्या

*भिंत खचली कुलथून खांब गेला।*
*जुनी पडकी उद्‌ध्वस्त धर्मशाळा*

ह्या पंक्ती आठवल्या. तिथून निघून आम्ही गावाकडे आलो. इंग्रजांच्या एकेकाळच्या छावणीची दहा-पंधरा फुटांची जाड भिंत अजूनही शिल्लक आहे. या छावणीच्या जागेत आता शाळा भरते.

आता वेध लागले होते एरंडोलचे. एरंडोलला बालकवींचं शालेय शिक्षण झालं. इथं निवृत्तीनंतर त्यांचे वडील स्थायिक झाले होते. दुपार व्हायला आली होती. श्री. पाटील यांचा निरोप घेतला. दीड दिवसांचं ते धरणगावातलं त्यांचं आदरातिथ्य मी कधीही विसरणार नव्हते. फक्त धरणगावातील लांबच्या नातेवाईक बाईंची भेट घ्यायची उत्सुकता होती. त्या भेटल्या नाहीत. त्या कुठे गावी गेल्याचं समजलं. निघताना श्री. जैन यांच्याकडे भोजन केलं. एरंडोलला ते बरोबर आले. खरोखरच या लोकांशी परिचय नसतानाही त्यांनी जी अगत्याची वागणूक दिली त्याने मी अगदी भारावून गेले. धरणगाव सोडताना मी इतर मंडळींजवळ माझी खंत बोलून दाखवली. 'तुम्ही बालकवींची शताब्दी केलीत ही खूप चांगली गोष्ट झाली. पण या गावात त्यांचं स्मारक त्या वेळी व्हायला हवं होतं. जळगावात झालं हे ठीक पण त्यांच्या जन्मगावी व्हायला हवंय. नाहीतर काही दिवसांनी परत लोकांना विस्मरण होईल.' 'आम्ही प्रयत्नशील आहोत,' असं ती मंडळी म्हणाली. असो. निघताना मी त्या सृष्टीच्या गायकाच्या जन्मभूमीला हात जोडून एरंडोलकडे प्रयाण केलं. एरंडोल धरणगावाहून अगदी जवळ म्हणजे अर्ध्या तासाच्या अंतरावर. स्थानकावर उतरून आम्ही तेथील माजी नगराध्यक्ष श्री. जोशी यांच्या घरी गेलो. ते आम्हाला घेऊन काळकर गल्लीतील बालकवींच्या भावाच्या म्हणजे अमृतरावांच्या घरी घेऊन गेले. आता हे घर लंबोदर वैद्य यांच्या मालकीचं आहे. हे अमृतरावांचे जावई होते. त्यांनी हे घर विकत घेतलं. अमृतरावांची नात घरी होती. तिने आम्हाला सारं घर हिंडून दाखवलं. बालकवी बरेचदा इथे



अनुक्रमणिका




येत. ते जो पलंग वापरत तो पलंग या मंडळींनी जतन करून ठेवलाय. बालकवींची वस्तुरूपाने अशी ती एक आठवण. बालकवींचं शालेय शिक्षण इथं याच गावी झालं. त्यांचा शाळेतला एक दाखलाही धरणगावी नेरपगार यांनी मला दाखवला. श्री. नेरपगार यांना स्वाक्षरी जमवण्याचा नाद आहे. त्यांनी मला ती वही दाखवली. त्यात त्यांनी माझीही स्वाक्षरी घेतली. एरंडोलचं हे घर पाहून आम्ही जवळच असलेल्या पद्माळ्यावर गेलो. या पद्माळ्यावर बालकवी अनेकदा हिंडायला येत. एरंडोलमधलं हे त्यांचं स्फूर्तिस्थान. इथल्या निसर्गातही ते तासन्तास रमत. अर्थात या सगळ्या ऐकीव गोष्टी. पद्माळ्याच्या रम्य परिसरात बालकवी राष्ट्रीय शाळेच्या विद्यार्थ्यांना घेऊन जात. त्यांना नैतिक धडे देत असत. पद्माळ्याच्या देवळाचे पुजारीपण वैद्य मंडळींकडे आहे. पद्माळ्याच्या त्या रम्य परिसरातून आम्ही फेरफटका मारला. श्री. जोशी यांचा निरोप घेऊन एरंडोलहून मी जळगावी निघाले. श्री. जैन यांचे आभार मानले असते तर त्यांना आवडलं नसतं. पण दोन दिवस त्यांनी जे सहकार्य दिलं त्यामुळे मी हा सारा परिसर बिनधास्तपणे हिंडू शकले. जळगावात एकच दिवसाचा मुक्काम करायचा होता. जळगावात पोहोचायला संध्याकाळचे सात वाजले. श्री. गाजरे म्हणून आमचे परिचित. त्यांना येणार असल्याचं आधीच कळविलं होतं. त्यांच्याकडे उतरून त्याच दिवशी सुशीला पगारिया यांच्याकडे जाऊन आले. दुसऱ्या दिवशी सकाळीच आसोद्याला जायचं ठरवलं. आसोद्याला जाताना बरोबर धुळ्याचे श्री. व्ही. एच. पाटील होते. आसोदं हे बहिणाबाईंचं गाव. जळगावपासून अवघं तीन मैलांवर. हे गाव बालकवींच्या पत्नीचंही गाव. इथल्या विनायकराव जोशींच्या त्या कन्या. गाव अगदी लहानसं. इथून तरसोंद दीड मैलावर. हे बालकवींचं म्हणजे ठोमऱ्यांचं मूळ गाव. निसर्गकन्या आणि निसर्गकवी म्हणून ज्यांना ओळखलं जातं अशा दोन कवी-कवयित्रींची गावं इतक्या शेजारीशेजारी आहेत. आसोद्याला निघण्यापूर्वी सकाळीच आम्ही आधी जळगावात बालकवींचं जिथं स्मारक केलंय तो परिसर पाहिला. बालकवीजन्मशताब्दीच्या दिवशी कविवर्य कुसुमाग्रजांच्या हस्ते इथं बालकवींच्या स्मारकाचं उद्घाटन झालं होतं. बालकवींची 'औदुंबर' ही कविता कोरलेला शिलालेख तिथं बसवलेला आहे. एक आगळंवेगळं स्मारक. मूळ कल्पना कवी महानोरांची. खानदेशी जन्मलेल्या या कवीचं हे स्मारक सदैव बालकवींची आठवण देत राहील. त्या स्मारकाचं दर्शन घेऊन आसोद्याला गेलो. आसोद्याहून जायचं होतं भादलीला. भादली तिथून अवघं तीन मैलांवर. दोन लाईन्सचा प्लॅटफॉर्म असणारं स्टेशन. याच स्टेशनवर अपघाती मृत्यूने २८ वर्षांच्या कवीला– ज्याची कविता उमलत होती, ज्याचं हृदय कोमल फुलासारखं होतं अशा कवीला– बळी घेतलं. त्या भादली गावी जायचं ठरवलं होतं. पण मी अचानक बेत बदलला. दोन दिवस बालकवींची निसर्गाची स्फूर्तिस्थानं, त्यांचं जन्मगाव, घर, एरंडोलचं घर, पद्माळची शोभा अशी सारी सौंदर्यस्थळं पाहिली. आता जिथं त्यांचा असा अपघाती



अनुक्रमणिका

मृत्यू झाला ते स्थळ नको पाहायला असं वाटलं आणि बेत बदलला, मात्र डोळ्यांसमोर ७५ वर्षांपूर्वी घडलेलं दृश्य जे वाचलं होतं ते आलं. ५ मे १९१८. घरगुती थोडी कुरबूर होऊन (म्हणजे अमृतरावांशी-बंधूंशी) बालकवी घराबाहेर पडले. जळगावाहून त्यांना सोनाळकर या त्यांच्या मित्राची तार आली होती म्हणून जळगावी जायचं होतं. भादली स्टेशनवर लेव्हल क्रॉसिंगवर रूळ ओलांडताना पायातला जोडा रुळात अडकला तो काढण्यासाठी ते वाकले तेवढ्यात मालगाडीचं इंजिन त्यांच्या अंगावरून गेलं. त्यांच्या शरीराचे तुकडेतुकडे झाले. अपघाती मृत्यू होईल, असं त्यांना ज्योतिषाने सांगितलं होतं. त्या वेळी नाही, तरी ते पुढे खरं झालं.

*"स्वप्नीही स्वप्ने बघत स्वप्नातच व्हावा अंत*
*मरण्याचे स्वप्नही गोड– जगण्याचे स्वप्नही गोड"*

असे निश्चित उद्‌गार काढणाऱ्या कवीच्या ओळी वाचल्या की जाणवेल, भास आणि वास्तव या द्वंद्वात अडकण्याचीही या कवीची इच्छा नाही. 'मरण्याचे स्वप्नही गोड' म्हणणाऱ्या या कवीच्या कवितेतलं अम्लान सौंदर्य टिपताना जिथं त्याचा अंत झाला ते ठिकाण पाहण्याचं मी टाळलं. खानदेशाच्या त्या अवघ्या दोन-तीन दिवसांच्या वास्तव्यातला निसर्ग फक्त बरोबर घेऊन मी आता परतणार होते. बालकवींचं ७५वं पुण्यस्मरण. त्यांच्या स्मृतीला लाखलाख प्रणाम.

'आकाशसांगावा पंखावर घेऊन उतरलेला हा राजहंस– बालकवींच्या स्वप्नातील मनाला सत्याने केलेल्या जखमा सहन झाल्या नाहीत. अशा जखमी अवस्थेतच हे सुंदर स्वप्न मालगाडीखाली चिरडले गेले' कुसुमाग्रजींनी बालकवींच्या या अखेरच्या पर्वाबद्दल म्हटलंय ते खरंच. मनात म्हटलं, बालकवी, तुम्हाला अजूनही थोडं आयुष्य परमेश्वराने का नाही दिलं ?

(२४, ऋणानुबंध, डी. पी. रस्ता, औंध, पुणे ४११००७)

---

## राजेंद्र मंत्री यांना यशवंतराव काळे पुरस्कार

१९९२-९३ चा. कै. यशवंतराव काळे उत्कृष्ट प्रवासवर्णन पुरस्कार श्री. राजेंद्र मंत्री यांच्या '**अमेरिका ! अमेरिका ! !**' या पुस्तकास मिळाला आहे. रुपये १,००१ रोख आणि स्मृतिचिन्ह असे या पुस्तकाचे स्वरूप आहे.

'अमेरिका ! अमेरिका ! !' या पुस्तकात संपन्न अमेरिकेतील दारिद्र्य, व्यभिचार आणि क्रौर्य श्री. राजेंद्र मंत्री यांनी टिपले आहे.

अहमदनगर येथील सुप्रसिद्ध लेखिका प्रा. मेधा काळे यांनी आपल्या पतीच्या स्मरणार्थ हा पुरस्कार ठेवला आहे.

सुलभा सबनीस

# युजीन ओनील : 'द हेअरी एप' (केसाळ वानर/गोरिला)

अमेरिकन वाङ्मय इ. स. १८०० च्या नंतर निर्माण झालं. कथा, कादंबऱ्या, काव्य इत्यादी. पण अमेरिकन नाट्यवाङ्मय खऱ्या अर्थानं विसाव्या शतकातलीच निर्मिती आहे. अमेरिकन रंगभूमी अस्तित्वात होती आणि नाटकंही सादर केली जात असत. पण ही नाटकं मुख्यत्वे भाषांतरित असत (मूळ फ्रेंच, जर्मन किंवा इतर युरोपियन भाषांतील नाटकांवरून) किंवा कादंबऱ्यांची नाटकीय रूपे असत. 'अंकल टॉम्स् केबिन' वरून केलेलं नाटक होत असे. पण स्वतंत्र अमेरिकन नाट्यकृती फार थोड्या होत्या आणि त्यांचा दर्जा सामान्य होता.

ओनीलच्या नाटकांनी अमेरिकन रंगभूमी आणि नाटक दोन्हींना महत्त्व आलं. त्यांना युरोपियन रंगभूमीचा आणि नाटकाचा दर्जा प्राप्त झाला. म्हणूनच ओनीलला अमेरिकन नाट्यवाङ्मयाचा जनक म्हटलं जातं. ओनीलच्या नाटकातल्या विषयांवर एक खास अमेरिकन छाप आहे. पण हे विषय युरोपियन नाटकात किंबहुना जगातल्या वाङ्मयातही वापरलेले दिसतात. 'हेअरी एप' या नाटकात आधुनिक जगातील एका सार्वत्रिक अनुभवाचं प्रतिबिंब दिसतं.

ओनीलला स्वतःला या अनुभवाची थोडी प्रचीती आली असावी असं वाटतं. त्याचे वडील जेम्स ओनील एक प्रतिथयश नट होते. त्यांची स्वतःची नाटककंपनी होती आणि नाटकाच्या प्रयोगासाठी साहजिकच त्यांना गावोगाव हिंडावं लागत असे. आयुष्यभर त्यांनी एकच नाटक सादर केलं. कारण प्रेक्षक त्यांना इतर कुठल्याही भूमिकेत पाहणं पसंत करत नव्हते. Count of Mont Cristo ह्या अलेक्झांडर ड्यूमा या फ्रेंच लेखकाच्या कादंबरीचं रूपांतर इंग्लिश नाटकात केलेलं होतं आणि प्रेक्षकांना ह्या नाटकाच्या नायकाच्या 'काउंट'च्या भूमिकेतले जेम्स ओनील मनापासून आवडले होते. ह्या एका नाटकानं जेम्स ओनीलना प्रसिद्धी आणि वैभव दोन्ही मिळालं. पण नट म्हणून रंगभूमीवर प्रसिद्ध होण्यापूर्वी जेम्स ओनीलचं आयुष्य फार हालअपेष्टांचं होतं. जेम्स ओनीलचे वडील बायको आणि सहा मुलांसकट अमेरिकेत स्थायिक होण्यासाठी आलेले होते. एक दिवस कुटुंबाला सोडून ते अचानक निघून गेले. दहा वर्षांचा जेम्स ओनील कुटुंबातला कर्ता 'पुरुष' बनला. आईनं घरकाम सुरू केलं आणि जेम्स ओनील आठवड्याला मिळणाऱ्या दहा पेन्ससाठी

रोज बारा-चौदा तास रूक्ष यांत्रिक काम करायला लागला. या सगळ्याचा परिणाम म्हणून जेम्स ओनीलनं पैशाला जपावं किंवा नंतर कवडीचुंबक बनावं हे स्वाभाविक वाटतं.

यूजीन ओनीलचा जन्म १८८८ साली ब्रॉडवे (अमेरिका-न्यूयॉर्क नाट्य पंढरी) वरच्या एका अतिशय स्वस्त हॉटेलमधे झाला. पाचसहा वर्षांचा होईपर्यंत युजीन आईवडिलांबरोबर नाटकाच्या प्रयोगासाठी गावोगाव हिंडत असे. लहानपणापासूनच यूजीनला रंगभूमीचा अगदी जवळून परिचय झाला. शिक्षण संपल्यावर ओनीलनं काही महिने वार्ताहर म्हणून काम केलं. नंतर सोन्याच्या खाणीचा शोध घेणाऱ्या मोहिमेत तो सामील झाला, दक्षिण अमेरिकेच्या किनारपट्टीवरच्या कामगारांच्याबरोबर काही काळ राहिला. नॉर्वे या देशाच्या एका बोटीवर त्यानं खलाशाचं काम केलं आणि दोन वर्षांनी त्याला बोटीवर अधिकाऱ्याच्या कामासाठी आवश्यक असलेलं प्रमाणपत्र मिळालं. त्याच्या या धाडसी पण कष्टमय जीवनाचा परिणाम त्याच्या प्रकृतीवर झाला. त्याला वयाच्या चोविसाव्या वर्षी क्षयरोगानं ग्रासलं. त्याला हॉस्पिटलमधे राहावं लागलं, पण काही महिन्यांनंतर तो पूर्ण बरा झाला. हॉस्पिटलच्या ग्रंथालयातली उपलब्ध असलेली सर्व नाटकं ओनीलनं वाचली. हार्वर्ड विद्यापीठात एक वर्षभर नाटकांवरची व्याख्यानं त्यानं ऐकली आणि त्यानंतर नाटककार होण्याचा निर्णय त्यानं घेतला.

ओनीलनं काही एकांकिका लिहिल्या आणि त्यांचा लगेच रंगभूमीवर प्रयोगही झाला. त्याच्या पहिल्याच नाटकाला– Beyond the Horizon– अमेरिकेतला सर्वश्रेष्ठ वाङ्मयीन पुरस्कार– Pulitzer Prize– मिळाला. त्यानं हा पुरस्कार तीन वेळा मिळवला. Annul Christie ला दुसऱ्यांदा आणि त्याच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झालेल्या Long Days Journey into Night ला तिसऱ्या वेळेला. १९३६ मधे जागतिक कीर्तीचा मान ओनीलला मिळाला. त्याला Nobel Prize मिळालं. स्वतंत्र आणि दर्जेदार अमेरिकन नाटकांची सुरुवात ओनीलनं केली आणि १९३६ पर्यंत अमेरिकन नाटकांना आणि रंगभूमीला युरोपियन-इंग्रजी नाटकांचा दर्जा मिळाला.

ओनीलनं जी अनेक नाटकं लिहिली त्यांत त्याची प्रयोगशीलता जाणवते. त्यात विविध विषय आहेत त्याचप्रमाणे नवीन नाट्यतंत्राचा वापरही आहे. All God's Children got Wings या नाटकात गोरे अमेरिकन आणि निग्रो संबंध हा विषय आहे. तर Ah! Wilderness सारख्या नाटकात मुलं आणि त्यांचे आईवडील यांचं नातं या विषयाचं खेळकर दर्शन सापडतं. Strange Interlude हे एक प्रदीर्घ नाटक आहे आणि तंत्रदृष्ट्या वेगळं. Mourning Becomes Electra ह्या नाटकात ग्रीक पौराणिक कथांना आधुनिक- फ्रॉइडच्या मानसशास्त्रीय-दृष्टिकोनातून नाट्यरूप दिलेलं आहे. असाच काहीसा प्रयोग Desire under the Elms ह्या नाटकात आहे. Long Day's Journey into Night हे ओनीलच्या स्वतःच्या जीवनावरचं (त्याचे आईवडील, मोठा भाऊ आणि यूजिन

ओनील) मनोविश्लेषणात्मक, त्यांच्या परस्परांसंबंधीच्या गैरसमजुती, पूर्वग्रहांचा शोध घेणारं नाटक आहे.

आपापल्या परीनं ही सगळीच नाटकं लक्षवेधी आहेत, परंतु 'हेअरी एप' त्याच्या विषयामुळे मला खास महत्त्वाचं वाटतं. १९२१ मधे हे नाटक रंगभूमीवर आलं. विसाव्या शतकाच्या पहिल्या दोन दशकांतल्या विशिष्ट परिस्थितीमुळे त्या नाटकाचा विषय अमेरिका, इंग्लंड, युरोप आणि भारत- सर्व जगातल्या प्रेक्षकाला, वाचकाला स्वानुभवाचा वाटण्याजोगा होता. सत्तर वर्षानंतरही परिस्थितीत फारसा फरक पडलेला आहे असं नाही. विषयातला ताजेपणा आणि बोच अजूनही तीच आहे.

विसाव्या शतकाच्या सुरुवातीपासून एक भावना प्रबळ झालेली दिसते. समाजापासून आपण तुटलेले आहोत, आपण परके आहोत, आपल्याला समाजात निश्चित असं स्थान नाही, आपण नेमके कुठे आहोत हे माहीत नाही. कारणं वेगवेगळी- आर्थिक किंवा व्यावसायिक, सामाजिक, राजकीय, शैक्षणिक. नोकरी-धंद्यानिमित्त, उपजीविकेच्या शोधात मूळ गावापासून किंवा देशापासून दुरावलेली व्यक्ती. पिढ्या न् पिढ्या आफ्रिकेत किंवा सिलोनमधे राहिलेल्या अन् नंतर तिथून हुसकावून लावलेल्या व्यक्ती. गरीब वर्गातून स्वतःच्या श्रमाने काही मिळवलेल्या व्यक्ती, ज्यांना त्यांच्या स्वतःच्या वर्गात स्थान नाही अन् वरच्या वर्गात- श्रीमंतांमधे- मोकळा प्रवेश नाही, विभावरी शिरूरकरांच्या "वळी"मधला आदिवासी सुशिक्षित होतो तेव्हा तो आदिवासी जमातीला परका होतो आणि सुशिक्षित समाजात मनापासून मिसळू शकत नाही. ॲलन पेटनच्या Cry the Beloved Country मधे, चिनावीच्या Things Fall Apart मधे गोऱ्यांच्या राजकीय वर्चस्वामुळे आणि सामाजिक, नैतिक मूल्ये ढवळून निघाल्यामुळे मूळ संस्कृतीपासून तुटल्याचा अनुभव व्यक्त झालेला आहे. मूळच्या आयरिश असलेल्या पण फ्रान्समधे स्थायिक झालेल्या सॅम्युएल बेकेटच्या Waiting for Godot या नाटकात ही परकेपणाची, आपण outsider, alien असल्याची बोचरी जाणीव किंचित वेगळ्या प्रकाराने मांडलेली आहे. वरवर विनोदाची झालर असलेली पण मुळातल्या वेदनेची कल्पना देणारी. Albert Camus या फ्रेंच लेखकाच्या प्रख्यात कादंबरीचं नावच Stranger हे आहे.

विसाव्या शतकातल्या बदललेल्या परिस्थितीमुळे ह्या अनुभवाचा तीव्र प्रत्यय यायला लागला. औद्योगीकरण, यंत्रयुग, झोपडपट्टी आणि शहरी संस्कृती, जीवनामधलं यांत्रिकीकरण ही एक बाजू- भोगवाद, भौतिकवाद यांच्याकडे झुकणारी आणि त्यात बुडवून टाकणारी. दुसरीकडे शास्त्रांच्या झपाट्याने होणाऱ्या प्रगतीतून आणि अभ्यासातून नवीन निर्माण होणारी मूल्ये आणि प्रश्नचिन्हे. भूगर्भशास्त्र आणि जीवशास्त्र (Biology) ह्यांच्या अभ्यासातून जगाची-पृथ्वीची निर्मिती, निर्माणकर्ता, बायबल इत्यादींवर विचार सुरू झाला आणि माणसाच्या परंपरागत विश्वासाला तडा जायला लागला. किंबहुना

Nietzsche चं the Gods are Dead हे जीवनाचं मुख्य सूत्र बनलं. या शतकाच्या आधीच्या काळात असलेल्या सगळ्या श्रद्धा मोडीत निघायला लागल्या. विशेषतः देवावरची श्रद्धा आणि त्याच्या अनुषंगाने माणसानं निष्ठेनं जोपासलेली मूल्ये ठिसूळ बनली. परंपरा आणि मूल्ये यांबद्दल प्रश्न निर्माण झाले आणि दोन्ही टाकून देण्याजोगी आहेत अशी खात्री पटायला लागली. वडील माणसांबद्दल आणि गुरुजनांबद्दल आदर, पाप-पुण्याविषयीच्या असलेल्या धार्मिक कल्पना, नीतितत्त्वांवरचा विश्वास, आत्मा आणि देहाच्या मृत्यूनंतर आत्म्याचं समाधान किंवा ईश्वराचं सान्निध्य या सगळ्या भाकडकथा वाटायला लागल्या. अश्रद्धपणा, असुरक्षितता, ध्येयशून्यता (disillusionment), जीवन उद्देशशून्य आणि अर्थशून्य असल्याची तीव्र जाणीव, जीवनातल्या कंटाळवाणेपणाचा, तोचतोचपणाचा बधिर करणारा प्रत्यय, चांगलं-वाईट याबद्दलची उदासीनता या शब्दांत विसाव्या शतकातल्या माणसाचं वर्णन करता येतं. W. B. Yeats च्या अत्यंत प्रख्यात अशा Second Coming या कवितेत आधुनिक जगाचं अगदी मोजक्या शब्दांत असं चित्र मांडलेलं आहे. अशा स्थितीत जुनी मूल्ये भंग पावल्यामुळे गतेतिहासापासून माणूस दूर जातो आणि भविष्य अंधारमय वाटतं. भूतकालात राहता येत नाही आणि भविष्याबद्दल कसलीच खात्री नाही त्यामुळे माणूस त्रिशंकूसारखा लोंबकळत राहतो. फ्रॉइडचं मानसशास्त्र आणि नंतरची दोन जागतिक युद्धं यामुळे माणसाची ही वृत्ती दृढमूल व्हायला मदत झाली. ह्या वृत्तीतून निर्माण होणारा पुढचा प्रश्न– मी कोण ? या अर्थशून्य जगात माझं स्थान कोणतं ? या स्थानाचा, स्वतःच्या 'ओळखी'चा Quest for Identify आणि आपल्या परकेपणाची, तुटलेपणाची जाणीव हा आधुनिक वाङ्मयाचा एक विषय बनला आहे. Hairy Ape ह्या नाटकाचा हाच विषय आहे.

'हेअरी एप' मधे ही जाणीव होते, हा प्रश्न पडतो त्या नाटकाच्या नायकाला– Yank ला. यान्कचं खरं नाव रॉबर्ट स्मिथ (हे नावही काही खास लक्षात राहण्याजोगं नाही. कारण एखाद्या जोशी किंवा कुलकर्णी या नावाइतकं हे नेहमी सापडणारं नाव), पण त्याला सगळे यान्क म्हणत असल्यामुळे तो स्वतःचं नाव जवळजवळ विसरूनच जातो. त्याचं नाव विचारलं जातं तेव्हा त्याला काही क्षण स्वतःचं नावच आठवत नाही. तो एका प्रचंड जहाजावर स्टोकरचं काम करतो. बोट वाफेवर चालणारी असल्यामुळे बोटीच्या खालच्या भागातल्या भट्टीत दगडी कोळसा सारखा लोटत राहणं, सारखा करणं आणि आपल्या सहकाऱ्यांकडून ते करून घेणं हे काम यान्क करतो. यान्क सुदृढ, बळकट आणि शक्तिमान असल्यामुळे त्याच्या बरोबर काम करणाऱ्यांना त्याच्याबद्दल आदरयुक्त भीती वाटते. रॉबर्ट स्मिथ ऊर्फ यान्क हा सुशिक्षित नाही. तो सुसंबद्ध विचार करू शकत नाही आणि शब्दांमधे व्यक्तही करू शकत नाही. पण या सगळ्या सहकाऱ्यांचा तो खुशीनं स्वीकारलेला नेता आहे. विचार करायचा असला की तो विचार करणाऱ्या माणसाची बैठक घेतो– हातावर

हनुवटी टेकून बसतो. त्याचे सहकारी त्याची थोडीशी चेष्टा करतात, पण तो रागावणार नाही इतपत. यान्कचे आईवडील दोघंही नोकरी करणारे आणि रविवारी हमखास दारू पिऊन धुंद होणारे. ह्या धुंदीत लहान रॉबर्टला मारहाण होत असे. त्यामुळे लहानपणीच रॉबर्ट घरातून पळून जातो. त्याचं शिक्षण हे त्याला जगाच्या अनुभवातून मिळतं. घरावर, कुटुंबावर, आईवडिलांचं प्रेम ह्या सगळ्यावरचा त्याचा विश्वास उडून जातोच, पण स्त्रीबद्दलचं प्रेम किंवा तिचा प्रतिसाद, देवधर्म, कायदा, सरकार या सगळ्याच गोष्टींवर त्याचा विश्वास राहत नाही. या दृष्टीनं यान्क हा विसाव्या शतकातल्या अश्रद्ध माणसाचा प्रतिनिधी बनतो. पण अशी मोठी पोकळी असलेल्या त्याच्या आयुष्यात त्याला एकाग्र बनवणारी, त्याचं सर्व जीवन व्यापून टाकणारी आणि अर्थपूर्ण करणारी एक सखोल, त्याला किंचित उद्दाम बनवणारी अशी एक श्रद्धा आहे– त्याच्या कामावरची श्रद्धा. मनोमन त्याची दृढ खात्री आहे की तो, त्याचं काम आणि त्याची बोट या गोष्टी वेगवेगळ्या नाहीत. तो म्हणजेच ती बोट चालवायला लागणारी शक्ती, त्या बोटीची २५ समुद्रमैलाची गती. त्या बोटीवर त्याचा अधिकार आहे, त्याचा आणि बोटीचा न तुटण्याजोगा संबंध आहे, तो त्या बोटीच्या इंजिनचा भाग आहे. ती बोट हलते त्याच्यामुळे. तो नसेल तर ती बोट चालणार नाही, तो त्या बोटीचा तळ, इंजिन, धूर, ती बोट ज्याची बनलेली आहे ते स्टील आहे. बोटीच्या स्टीलमधली शक्ती तो आहे. बोटीवरच्या प्रवाशांपेक्षा खरं म्हणजे he belongs to the ship. यान्कच्या मनात याबद्दल थोडीसुद्धा शंका नाही. इतकी पूर्ण खात्री असलेल्या यान्कच्या मनात उठलेलं वादळ या नाटकात चित्रित केलेलं आहे.

या नाटकात पात्रं अगदी मोजकी आहेत. यान्कच्या हाताखाली काम करणाऱ्यांपैकी फक्त दोघांची नावं दिलेली आहेत.

Paddy हा खलाशी जीवनाचा दीर्घ अनुभव असणारा एक आयरिश माणूस आणि Long (लॉंग) नावाचा एक कॉकनी इंग्लिश बोलणारा माणूस. बाकीची माणसं नुसता 'आवाज'च राहतात. न्यूयॉर्कहून अटलांटिक महासागरातून जाणाऱ्या जहाजावर पहिल्या वर्गातली पॅसेंजर म्हणून प्रवास करणारी एक तरुणी मिल्ड्रेड डग्लस (Mildred Douglas) आणि तिच्याबरोबर तिची आत्या. बाकीच्या पात्रांचा नामोल्लेख नाही. त्या त्या प्रवेशापुरतं त्यांचं महत्व आहे. मिल्ड्रेड ही जहाजाचा मालक स्टील उद्योगपती डग्लस याची मुलगी आहे.

नाटकाचं कथानक यान्कभोवती रचलेलं असल्यामुळे इतर पात्रं यान्कच्या विरोधात त्याला मदत करण्यासाठी किंवा त्याला प्रक्षुब्ध करण्यासाठी वापरलेली आहेत. कथा उघड-उघड यान्कची आहे. विषयाची मांडणी करण्यासाठी ओनीलच्या नाट्यतंत्राकडे वळणं आवश्यक आहे. नाटक नेहमीच्या प्रथाप्रमाणे तीन अंकांत विभागलेलं नसून आठ प्रवेशांत बसवलेलं आहे. प्रवेशविभागणी जॉर्ज बर्नार्ड शॉच्या सेंट जोन या नाटकात

वापरलेली आहे, त्याचप्रमाणं टेनेसी विल्यम्स् या अमेरिकन नाटककाराच्या 'स्ट्रीट कार नेमड् डिझायर' या नाटकातही तिचा उपयोग केलेला आहे. प्रवेशविभागणीमुळे कथानकाला जलद गती मिळते. इतकी की पहिला प्रवेश आणि शेवटचा आठवा प्रवेश यांत महिना-दीडमहिन्याचा काळ गेलेला असला तरी आणि प्रवेशाची जागा-सेटिंग बदललं तरी कथानक एका दिवसात एकाच जागी घडतं आणि प्रगत होतं, असा आभास निर्माण होतो. कथानकाचा– सबंध नाटकाचा– एकसूत्री प्रभाव पडतो. प्रवेशामुळे एक घटना थोडक्यात, कुठल्याही diversion-विक्षेपाशिवाय पाल्हाळ न लावता अतिशय परिणामकारक रीतीनं मांडता येते. बोलण्यासाठी बोलणं, शब्दाला लागून येणारे शब्द, अनावश्यक आणि असंबद्ध विनोद टाळता येतो. पहिले चार प्रवेश जहाजाच्या स्टोकिंगचं काम करणाऱ्यासाठी डेकखाली जी खोली असते तिथे घडतात. त्यांतला तिसरा प्रवेश भट्टी जिथे असते तिथेच घडतो. जहाज महासागरातून जात असताना हे प्रवेश घडतात. शेवटचे चार प्रवेश जमिनीवर वेगवेगळ्या ठिकाणी घडतात.

पॅडी आणि लॉँग यांचा दृष्टिकोण यान्कच्या दृष्टिकोनापेक्षा वेगळा आहे. यंत्राच्या सहाय्यानं चालणारं जहाज पॅडीला बंदिस्त वाटतं. जहाजावरचं त्याचं काम निर्थक वाटतं. त्याच्या दृष्टीनं खलाशी म्हणून काम करण्याचा आणि प्रवास करण्याचा खरा आनंद, जिवंत अनुभव पूर्वीच्या दोन-तीन शिडांच्या बोटीवर मिळत असे. आधुनिक जहाजावर आपण त्याचे गुलाम बनलो आहोत, असं त्याला वाटतं. पूर्वीच्या बोटींवर खलाशी त्या बोटीचाच काय, महासागराचा सुद्धा मालक आहे, असं वाटत असे, समुद्रपुत्र आहे, असं वाटत असे. हे खलाशी खरे धैर्य, ताकद असलेले होते. पहाटेचा झुळझुळणारा वारा, दुपारचं प्रखर ऊन्, संध्याकाळी फिकट होत जाणारी जमिनीची रेषा हे सगळं जिवंतपणे अनुभवायला मिळत असे. नवीन जहाजावर आकाशसुद्धा बघायला मिळत नाही. कारण आपण खालच्या भागात कोंडलेलो राहतो. त्या बोटींवर काम करणंही आनंदाचं वाटायचं आणि तुफानांना सामोरं जाणंसुद्धा. नव्या जहाजावर धुराड्यातून बाहेर पडणारा काळा धूर, डेकवर त्यामुळे येणारा चिकटपणा आणि एन्जिनची धडधड यामुळे सूर्य दृष्टीला पडत नाही, की मोकळा श्वास घेता येत नाही. पॅडीला वाटतं, नव्या जहाजावरचे त्याचे खलाशी म्हणजे झूमधली वानरं आहेत. पॅडी भूतकाळात रमणारा, त्याची स्वप्नं पाहणारा आहे. त्याच्या म्हणण्यातलं तथ्य नंतर यान्कला थोडंसं पटतं, पण भूतकाळापासून तो आधीच तुटल्यासारखा झालेला आहे.

लॉँग हा यान्कचा दुसरा सहकारी. तो कम्युनिझमनं प्रभावित झालेला आहे. मार्क्सच्या या तत्त्वप्रणालीचा परिणाम १८४०-४५ पासूनच जाणवायला लागला होता. १९१७-मधल्या रशियन क्रांतीनंतर कामगारवर्गावर त्याचा चांगलाच प्रभाव पडला. लॉँगला आकर्षण आहे ते भौतिक सुखाचं, दैनंदिन जीवनातल्या प्रगतीचं. त्याचा दृष्टिकोण नाटकातल्या संघर्षाच्या प्रवेशाच्या नंतर चौथ्या प्रवेशात आपल्याला दिसतो.

नाटकाच्या दुसऱ्या लहानशा प्रवेशात मिल्ड्रेड आणि तिची आत्या आपल्या समोर येतात. मिल्ड्रेड श्रीमंत बापाची मुलगी आहे हे खरंच, पण श्रीमंत वर्गाच्या माणसांत त्यांच्या आजोबा-पणजोबांचं सामर्थ्य उरलेलं नाही, ते जुन्या पिढीतला प्रामाणिकपणा, कामाचा जोश, निग्रह, चिवटपणा, न थकता काम करण्याची इच्छा हरवून बसलेले आहेत, याची तिला जाणीव आहे. थोडक्यात आपण T.S. Eliot नं वर्णन कलेल्या Hollow Men सारखे आहोत, पेंढा भरलेल्या मृत जनावरासारखे आहोत, हे तिला माहीत आहे. तिला कामगारवर्गातल्या झोपडपट्टीत राहणाऱ्या गरीब माणसांबद्दल सहानुभूती वाटते. त्यांच्या वस्तीत काम करून तिनं समाजशास्त्र विषयातली पदवी मिळवलेली आहे. तिला जहाजावरच्या खलाशांची स्थिती त्यांच्या कामाच्या जागी जाऊन बघायची आहे. तिच्या हट्टीपणाला जहाजाच्या कप्तानाला विरोध करता येत नाही. तिनं तो हट्ट सोडून द्यावा, निदान जहाजाच्या भट्टी असलेल्या खालच्या भागातल्या खोलीत पांढऱ्या शुभ्र पोषाखात तिनं जाऊ नये म्हणून तिची विनवणी केली जाते, पण तिच्या शब्दांत सांगायचं तर तो शुभ्र पोषाख खराब झाला तर तो फेकून देऊन तसले शंभर पोषाख विकत घेण्याइतकी ती श्रीमंत आहे.

तिसरा प्रवेश नाटकाचा पहिला उत्कर्षबिंदू आहे. नाटक वाचतानाही त्याचा परिणाम आपल्याला तीव्रतेनं जाणवतो. प्रत्यक्ष संघर्षाचा क्षण येण्यापूर्वी, ठिणगी पडण्यापूर्वी यान्क आपल्या सहकाऱ्यांना त्यांनी वेगानं आणि सतत काम करावं म्हणून त्यांना उत्तेजित करीत असतो. यान्कसकट सगळेच भट्टीच्या प्रखर उष्णतेमुळे आणि जाणवणाऱ्या झळांमुळे शर्टशिवाय उघडेच, कोळसा उचलणं आणि भट्टीत फेकणं हे काम करीत असतात. त्या कामाचा आवाज खूप मोठा, पण काम एका लयीत चाललेलं असतं. मधूनमधून ऐकू येणाऱ्या शिटीमुळे यान्क संतापतो. काम आणखी जलद करा असा त्या शिटीचा अर्थ घेतल्यामुळे एन्जिनियरला बऱ्याच शिव्या हासडतो. या सगळ्या पार्श्वभूमीवर मिल्ड्रेड दोन एन्जियरस्च्या मधे शिडी उतरून खाली येते. शिडीजवळून हे दृष्य ती पाहते. कामगारांची तोंडं तिच्या दिशेला असल्यामुळे ते दबकून काम करायचं थांबतात. मिल्ड्रेडकडे पाठ असलेला यान्क काम का थांबलं म्हणून मागे वळून पाहतो. पांढरट, धूसर, भुतासारखं काहीतरी दिसल्यामुळे तो चमकतो; पण त्याला बघून मिल्ड्रेड घाबरते. तिला धक्का बसतो आणि 'Take me away! Oh, the filthy beast' असे शब्द तिच्या तोंडून बाहेर पडतात. ती बेशुद्ध पडते आणि पडत असतानाच तिला उचलून तिच्या बरोबर आलेले एन्जिनियर शिडी चढून जातात. आपला काहीतरी यामुळे अपमान झालेला आहे, याची किंचित उशिरा जाणीव झालेला यान्क हातातलं फावडं तिच्या दिशेनं फेकतो. पण ती आधीच शिडीवरून गेलेली असते.

प्रत्यक्ष संघर्षाच्या क्षणात शब्द वापरायची जरूरच पडत नाही. मिल्ड्रेडचं तिथलं

अस्तित्व आणि तिचे थोडेसे भीती आणि तिरस्कार दाखवणारे शब्द यान्कच्या मनाला जबरदस्त धक्का देतात, त्याचं मन दुभंगून जातात आणि काही काळ मिल्ड्रेडवर सूड घ्यायच्या इच्छेनं तो पेटून निघतो. ओनीलनं तावडतोब झालेला आणि यान्कमध्ये वदल घडवून आणणारा, त्याच्या जीवनात वादळ उठवणारा परिणाम दोन्ही सूचित केलेले आहेत.

चौथ्या प्रवेशात यान्क, पॅडी, लाँग सगळेच या प्रसंगावर त्वेषानं बोलतात. मिल्ड्रेड कोण आहे, ते यान्कला कळतं. यान्कची चेष्टा करण्यासाठी पॅडी त्या प्रसंगाचं वर्णन प्रथमदर्शनी प्रेम असं करतो आणि यान्क जास्तच भडकतो. मिल्ड्रेड ही मालकाची मुलगी असेल, पण जहाजावर तिच्या सामानासारखी ती उपरी आहे, तो जहाजाशी जोडलेला आहे, तो जहाजाची शक्ती, वेग, स्टील आहे. तेव्हा तिच्यासारख्या जहाजावरच्या उपऱ्या मुलीला तिची जागा दाखवून दिली पाहिजे, त्याच्या जहाजावरच्या स्थानाची तिला कल्पना देण्यासाठी तिच्यावर सूड घेतला पाहिजे, तिनं केलेल्या अपमानाची परतफेड केली पाहिजे, असं यान्क परत परत म्हणत राहतो. लाँग त्याला हे पटवण्याचा प्रयत्न करतो की, कायदा, सरकार, लोकशाही सरकारचा यान्कनं फायदा करून घ्यावा. यान्कचा या कशावरही कार्डीचाही विश्वास नाही. काही टाळ्या मिळणारी वाक्यं तो उच्चारतो. 'ह्या बाईला आपला अपमान करण्याचा हक्क कोणी दिला ? आपण जहाजावर नोकरी करतो म्हणजे आपण त्यांचे गुलाम आहोत का ? एखाद्या प्राणिसंग्रहालयातील माकडं आहोत का ? हा असा अपमान ती करू शकली, कारण, ती ज्याची मुलगी आहे तो भांडवलदार आहे.' पॅडी थोडंसं चिडवण्यासाठी आणि किंचित कडवटपणानं म्हणतो की, यान्क म्हणजे झूमधून पळालेला केसाळ वानर किंवा गोरिला आहे, असंच ती समजली.

पाचव्या प्रवेशात या प्रसंगानंतर तीन आठवड्यांनी न्यूयॉर्कमधल्या बाजारपेठेतल्या एका अतिशय स्वच्छ रस्त्यावर लाँगसमवेत यान्क उभा असतो. रविवार सकाळची वेळ असते. मिल्ड्रेडवर सूड उगवण्याची संधी मिळावी म्हणून लाँगनं यान्कला तिथे आणलेलं आहे. फार वेळ वाट पाहावी लागल्यानं यान्क अस्वस्थ होतो. चर्चमधून बाहेर पडणाऱ्यांच्यात मिल्ड्रेड असणार असं यान्कला लाँग सांगतो. कम्युनिझमच्या तत्त्वांपैकी जे समजलेलं असतं ते लाँग यान्कच्या गळी उतरवण्याचा प्रयत्न करतो. यान्क घडलेल्या प्रसंगाकडे चुकीच्या दृष्टीनं बघतो. मिल्ड्रेडनं केलेला त्याचा अपमान हा त्याचा वैयक्तिक अवमान नव्हता, नाही. ती खरं म्हणजे त्यांच्या दोघांतल्या संघर्षाची बाब नाहीच. खरं म्हणजे ते वर्णद्वेषाचं उदाहरण आहे. ती श्रीमंत, भांडवलदार वर्गातली आणि तो कामगार, मजूर वर्गातला. "आपली मागणी आपण शांतपणानं त्यांच्यापुढे ठेवली पाहिजे. जगातल्या कामगार वर्गाचं मत म्हणून." आक्रमक वृत्तीच्या आणि दोन हात करण्याच्या इच्छेनं आलेल्या यान्कला हे बोलणं कंटाळवाणं वाटतं. काय घडणार आहे, याची कल्पना आल्यानं लाँग त्याला एकटा सोडून निघून जातो. थोड्या वेळानं चर्चमधून माणसं बाहेर येऊ

लागतात. चांगल्या कपड्यात नटलेली, बाहुल्यांसारखी. त्यांच्या आपसातल्या बोलण्यावरून चर्चमधल्या वक्तव्याचा त्यांच्यावर किती परिणाम झालेला आहे, त्याचा आपल्याला अंदाज येतो. कोणी अर्धवट झोपलेलं असतं. कोणाला भाषण मनापासून केलेलं होतं, असं वाटतं, कोणी चर्चच्या दुरुस्तीसाठी पैसे मिळवावेत म्हणून मनोरंजनाचा प्रोग्रॅम करायचं ठरवत असतं. यान्कला राहवत नाही. ती माणसं त्याला प्रेतासारखी वाटतात. तो स्वतः आकाशचुंबी इमारतीसाठी वापरल्या जाणाऱ्या स्टीलसारखा- स्टीलच आहे, त्याचा जहाजाशी संबंध आहे, तो जहाजाचा आहे, ती माणसं सगळी उपरी बाहेरची आहेत- कचऱ्याच्या पेटीसारखी. त्यांनी आपल्याबरोबर लढावं म्हणून तो त्यांना मुद्दाम अपमान वाटेल असं बोलतो. तो मधे आडवा येतो तेव्हा यांत्रिकपणे माफ करा, असं म्हणून ते बाजूला होतात. यंत्रयुगातली माणसं त्याला दुबळी, नेभळट, पुळचट वाटतात. दिव्याच्या खांबाजवळ बस येत असताना तो खांब उचकटण्याचा प्रयत्न करतो, एक माणूस बस पकडण्यासाठी धावताना त्याला धडक देतो. यान्कला वाटतं, आता त्याची चांगलीच जुंपणार. पण तो माणूस शांतपणे निघून जातो आणि शांततेचा भंग करणाऱ्या यान्कला पोलीस पकडतो आणि तुरुंगात टाकतो.

सहाव्या प्रवेशात तुरुंगातल्या कैद्यांकडून यान्कला थोडीशी दिशा मिळते. मिल्ड्रेडनं अपमान केला असेल, तर यान्कनं तिच्या वडिलांवर किंवा त्याहीपेक्षा त्यांच्या स्टील उद्योगावर सूड उगवावा. स्टीलउद्योग नाहीसा करण्यासाठी अलीकडेच सुरू झालेली I.W.W. म्हणजे जगातल्या औद्योगिक कामगारांची संघटना त्याला मदत करू शकेल. तुरुंगातल्या कैद्यांमधे त्याच्या वृत्तीचा कोणीही नसतो. त्यांच्यामधे आणि तुरुंगातल्या पिंजऱ्यातसुद्धा यान्कला एकाकी, परकं वाटतं.

तुरुंगातून मुटका झाल्याबरोबर यान्क एका I.W.W. च्या समुद्रकिनारी असलेल्या कचेरीत प्रवेश करतो. हा सातवा प्रवेश म्हणजे यान्कच्या आत्मशोधाचा पुढचा टप्पा. विचारलेल्या प्रश्नांची उत्तरं यान्कला समाधानकारकपणे देता येत नाहीत. त्याचं स्वतःचं नाव सांगताना सुद्धा तो थोडा घोटाळतो. जे काम I.W.W.ची माणसं करतात, ते तो उत्तम प्रकारे करू शकेल. (बॉम्ब टाकून उद्ध्वस्त करण्याचं काम). त्याचं बोलणं तिथल्या सेक्रेटरीला अतिशय विचित्र वाटतं. हा दुसऱ्या कुठल्यातरी संस्थेनं हेरगिरी करायला पाठवलेला आहे, असं त्याला वाटतं. आपल्या माणसांना यान्कला मारहाण करून बाहेर फेकून द्यायला तो सांगतो आणि अक्षरशः यान्कला फेकून देण्यात येतं. या प्रवेशाच्या शेवटी यान्कनं आत्मशोधात किती प्रवास केलेला आहे हे आपल्या लक्षात येतं. इमारती, जहाज यांना स्टील लागतं, पण तुरुंग, कुलपं, पिंजरे यांच्यासाठी सुद्धा स्टीलच वापरतात. मिल्ड्रेडचा बाप जे स्टील तयार करतो त्यातूनच बंधन घालणारे, अडकवून ठेवणारे बोल्ट, तुरुंग, पिंजरे बनवले जातात. जहाजाचं स्टील आपण आहोत हे त्याचं म्हणणं बरोबर नव्हतं. आता ते स्टील वितळवण्यासाठी, त्याचा विध्वंस करण्यासाठी त्याला आग बनावं लागेल. मिल्ड्रेडऐवजी

तिच्या बापाचा स्टील उद्योग नष्ट करायला पाहिजे. तुरुंगात इतर कैद्यांबद्दल वाटलेलं असतं ते त्याला I.W.W. बद्दल वाटतं. या कामगारांच्या संस्थेलाही यान्क आपला, आपल्यातला आहे, असं वाटत नाही. त्यांच्या प्रयत्नांनी तरी काय साध्य होणार? तीन वेळचं जेवण, बायकामुलं, पुढे थोडीशी मोकळी जागा असलेलं घर, दिवसाला एखादा डॉलर जास्त पगार, कामाच्या तासात एखाद्या तासाची कपात. कदाचित समान हक्क. यान्कला आता तीव्रतेनं वाटतं की, ज्याचं समाधान त्याला हवं आहे, ते त्याचं पोट नाही, ते त्याच्या कुठेतरी खोल मनात आहे. तो कुणाचाच नाही. त्याचंही कुणी नाही. कबीराच्या दोह्यात म्हटल्याप्रमाणे आई-वडील, भाऊ-बहीण, मुलं, मित्र, समाज कोणीही कुणाचं नाही. 'मी एखाद्या स्प्रिंग तुटलेल्या मोडलेल्या घड्याळासारखा आहे. माझं स्थान कोणतं? कोऽहम्? हे माझं नाही, ते माझं नाही. इदम् न मम, इदम् न मम. मग माझं काय आहे? मी कुठला आहे?' तिथे आलेला पोलीस त्याला ठाण्यावर नेण्याची भाषा करतो. त्याला विचारतो, 'तू कुठला गुन्हा केलेला आहेस?' यान्कचं उत्तर, 'मला काळ्या पाण्याची शिक्षा देण्यासारखा गुन्हा मी केलेला आहे. मी जन्माला आलो हाच माझा मोठा गुन्हा आहे.' तो दारू प्यायलेला आहे, असं पोलिसाला वाटतं, त्याला उठवून तो उभा करतो आणि नंतर निघून जातो.

आठव्या प्रवेशात केसाळ वानराला, गोरिलाला बघण्यासाठी यान्क प्राणिसंग्रहालयात येतो. गर्दी ओसरल्यावर तो गोरिलाच्या पिंजऱ्याजवळ येतो. आणि टक लावून बघत राहतो. हा सबंध प्रवेश म्हणजे स्वतःची ओळख पटवून घेण्याचा प्रयत्न करणाऱ्या यान्कचं एक प्रदीर्घ स्वगत आहे. विचार करणं आणि तो व्यक्त करणं दोन्ही यान्कला थोडंसं त्रासदायक आहे. स्वगतातलं अडखळणं, पुनरावृत्ती, अर्धवट सोडून दिलेली वाक्यं आणि गोरिलाशी सरळ बोलण्याचा प्रयत्न हे सगळं यान्कच्या व्यक्तिमत्त्वाला शोभेलसं आहे. जिव्हारी घाव बसल्यासारखं, पोटात पीळ पडल्यासारखं हे थबकत थबकत बोलणं फार प्रभावी वाटतं. यान्कला जाणवतं की, तो जहाजाचा अतूट भाग नाहीच. तिथेही तो उपरा, परका आहे. पॅडीसारखा तो भूतकाळात जगू शकत नाही. लाँगसारखा दैनंदिन जीवनातल्या गरजा भागल्या आणि काही सुविधा मिळाल्या तरी त्याच्या मनातल्या प्रश्नाचं उत्तर मिळणारच नाही. त्याची कैद्यांशी जवळीक नाही. तशी I.W.W. च्या सभासदांशीही नाही. मिल्ड्रेडनं त्याला filthy beast म्हटलं होतं. गोरिलाशी— केसाळ वानराशी त्याचं काय साम्य होतं? गोरिलाची शारीरिक ताकद त्याच्यात आहे, पण बाकी?

यान्क आता याच्याही पलीकडे जातो. गोरिला ताकदवान आहे. पिंजऱ्यात आहे, पण गोरिलाचं नातं दाट जंगलाशी आहे, निसर्गाशी आहे. पिंजऱ्यात अडकलेला असला तरी गोरिला निसर्गाचा एक भाग आहे आणि त्यापासून तो दुरावलेला नाही. यान्क मात्र भूतकाळाशी निसर्गाशी असलेलं आपलं नातं पार हरवून बसलेला आहे. आणि भविष्य? भविष्याबद्दल तो साशंक आहे. खरं म्हणजे अनाकलनीय अशा या जगात भविष्याचा

पुसटसाही आधार उरलेला नाही. गोरिलाला त्याचं जग आहे. त्या जगाचा तो आहे. यान्क माणूस आहे, पण माणसांच्या जगातला नाही, तिथेही त्याला परकेपणा जाणवतो. यान्कला भूतकाळ उरलेलाच नाही आणि भविष्यकाळही नाही. कारण स्वर्ग, ईश्वर, आत्मा, ईश्वराचं सान्निध्य, परमात्म्याशी मीलन या सगळ्या मोडून पडलेल्या श्रद्धा आहेत. दुसरा एक विचार त्याच्या मनात येतो, 'मी या जगातलाही नाही, स्वर्गातलाही नाही, लौकिक आणि पारलौकिक, स्वर्ग आणि पृथ्वी यांच्या कुठेतरी मधे मी आहे. त्यांना एकमेकांपासून दूर ठेवण्याचा प्रयत्न करतो आहे आणि दोन्हींकडून मिळणारे प्रहार सहन करतो आहे.' हॅम्लेटच्या शब्दांची आठवण करून देणारं हे वाक्य 'what should such fellows as I do crawling between heaven and earth?"

आत्मशोधाच्या प्रयत्नात, स्वतःचीच ओळख पटवून घेण्याच्या प्रयत्नात यान्क गोरिलाशी संवाद साधताना काहीसा बेभान वाटायला लागतो. सामाजिक, राजकीय, तात्त्विक विचाराकडे वाटचाल करण्याच्या धडपडीत त्याची जगण्याची इच्छा कोमेजल्यासारखी होते. गोरिलाला पिंजऱ्यातून बाहेर काढत असताना यान्क मरणाची वाट पाहतो आहे, हे लक्षात येतं. गोरिलाच्या घट्ट विळख्यानं यान्क गुदमरतो. गोरिला त्याला पिंजऱ्यात टाकून पिंजऱ्याचं दार बंद करतो आणि निघून जातो. शेवटच्या श्वासावरोबर यान्क इतर गोरिलांना म्हणतो, "माझ्याकडे निरखून पाहा. (संस्कृतीच्या) जंगलामधून आलेला एकमेव आणि मूळचा गोरिला." तो मरतो आणि नाटककाराला वाटतं की कदाचित इथं यान्कचं स्थान आहे, इथं तो परका नाही.

प्रवेशानुक्रमाने ओनीलनं कथानकाची– नाट्यविषयाची कुठेही लोंबणारे धागे न सोडता अशी मांडणी केली आहे. यातल्या बहुतेक प्रवेशात continuity (आधीच्या प्रवेशाचाच पुढील भाग नंतरच्या प्रवेशात दाखवणं) असल्यामुळे कथानक एकसंध, सुगठित, जलदगतीनं प्रगत होणारं, पुढे जाणारं असं वाटतं.

ओनीलचं नाट्यतंत्र हे realistic वास्तववादी आहे. ही वास्तवता setting पेक्षाही संवादांमधे जास्त दिसते. जहाजावरचे खलाशी इंग्लिश बोलतात, पण त्याचं मूळचं पोलिश, जर्मन, आयरिश, कॉकनी रूप तसंच राहतं. खलाशाच्या भाषेतल्या शिव्या ओनीलनं सौम्य स्वरूपात वापरलेल्या आहेत. मिल्ड्रेड, तिची आत्या, खलाशी पॅडी आणि लाँग या पात्रांचं चित्रण यामधेही वास्तवदर्शन घडतं. यान्क हे पात्र ओनीलला परिचित असलेल्या स्टोकरवर आधारलेलं आहे. लिव्हरपूलचा आयरिश बॉबी डिस्कॉल हा न्यूयॉर्क नावाच्या जहाजावर (ज्यावर ओनील खलाशी म्हणून काम करीत होता) स्टोकरचं काम करत होता आणि जहाजावर असताना पाण्यात उडी मारून त्यानं आत्महत्या केली. अर्थात यान्क हा फक्त ड्रिस्कॉलच असेल असं म्हणता येत नाही.

वास्तववादी तंत्राबरोबरच ओनीलनं थोडं सोपं करून expressionism हे तंत्रही

वापरलेलं आहे. १९२० ते १९४० ह्या काळात मुख्यत्वे जर्मन नाटककारांनी हे नाट्यतंत्र वापरलं. स्वीडिश नाटककार Strindberg आणि जर्मन नाटककार Karl Capek, Kaiser Toller, Hauptmann इत्यादींनी ह्या नाट्यतंत्राचा विशेष उपयोग केला. हे तंत्र मूळ चित्रकलेच्या तंत्रावर आधारलेलं होतं. ह्या प्रकारच्या नाटकात माणसाच्या अंतर्मनाचा वेध हा मुख्य भाग असल्यानं कथानक, नाटकातली पात्रं या गोष्टींना गौण स्थान मिळतं, नाटकातलं कथानक आणि कालावधी या दोन्हीमधे सुसूत्रता नसल्यानं दुर्बोधता निर्माण होते. ह्या नाटकात रंगमंचावर उपलब्ध झालेल्या नव्या गोष्टींचा– उदा. सरकता रंगमंच, प्रकाशयोजना, संगीत– उपयोग केला गेला. उदा. ओनीलच्या Emperor Jones या नाटकात घाबरलेल्या निग्रो जोनस्च्या नाडीचा आवाज प्रेक्षकांपर्यंत पोचू शकला कारण tom tom ह्या वाद्याचा आवाज.

ह्या नाट्यतंत्राचा भाग 'हेअरी एप' मधल्या काही गोष्टीत दिसतो. चर्चमधून बाहेर येणाऱ्यांचे बाहुल्यांचे मुखवटे, गोरिलाचा मुखवटा, यान्कच्या सहकाऱ्यांचं हसण्याचं वर्णन (फोनोग्राफच्या कर्ण्यातल्या आवाजासारखं), खलाशांच्या गोरिलासदृश हालचाली, प्रत्येक पात्रानं बोलताना गोरिला या प्रतिमेचा केलेला वापर, इत्यादी. यान्कचं Rodin या फ्रेंच शिल्पकाराच्या 'The Thinker' या पुतळ्यासारखं, विचार करणाऱ्या माणसाच्या सारखं बसणं, इत्यादी. जहाजावरच्या खलाशांच्या अरुंद जागेचं वर्णन करताना एकमेकांवर असलेल्या बंकस् (Bunks) मुळे त्यांची झोपण्याची जागा पिंजऱ्यासारखी दिसते असं म्हटलेलं आहे. प्रत्येक प्रवेशात पिंजरा ह्या प्रतीकाला वेगवेगळे अर्थ प्राप्त होतात. उदा. उच्च वर्गाची खास निर्माण झालेली संस्कृती, स्टोकरशेल किंवा भट्टी यंत्रयुगाची संस्कृती, प्रत्यक्ष तुरुंग, भौतिकवादाची झापड, माणसाचं शरीर आणि सबंध जीवन– हे अर्थ तुरुंग किंवा पिंजरा या विस्तारित होत जाणाऱ्या प्रतिमेमधून (Image) सूचित होतात.

पाश्चात्य जीवनातून निर्माण झालेला आणि 'हेअरी एप' मधून ओनीलनं व्यक्त केलेला हा अनुभव आपल्याही परिचयाचा झालेला आहे. कित्येकांना त्याचा अगदी जवळून प्रत्यय आलेला आहे. प्रथम सुचवल्याप्रमाणे हा अनुभव सार्वत्रिक असा आधुनिक वाङ्मयातला एक मुख्य विषय बनलेला आहे.

(१०६/५, एरंडवणे, पुणे ४११००४.)

---

**साभार स्वीकार**

१. **कन्नड कथा सौगंध**– प्रा. वि. पां. देऊळगावकर, अध्यक्ष, माजी विद्यार्थी संघ, नूतन विद्यालय संस्था, (गुलबर्गा), पृष्ठे १३१, मूल्य ५०/- रुपये.

२. **दिंडी**– प्रा. वि. पां. देऊळगांवकर, मराठी साहित्य मंडळ प्रकाशन, पृष्ठे १८३, मूल्य १००/- रुपये.



अनुक्रमणिका






गो. म. कुलकर्णी

# रंगनाथ पठारे यांच्या कादंबऱ्यांच्या निमित्ताने

गेल्या आठ-दहा वर्षांत मराठी कादंबरीविश्वात जे काही थोडे महत्त्वाचे लेखक उदयास आले आहेत, त्यांत रंगनाथ पठारे यांचा आवर्जून अंतर्भाव करावयास हवा. श्री. पठारे यांच्या वाङ्मयकारकीर्दीचा प्रारंभ काव्यलेखनाने झाला, पण त्यांचा भर कथा-कादंबरीलेखनावरच राहिल्याचे आढळते. त्यातही पुन्हा ते अलीकडील काळात कथेपेक्षा कादंबरीलेखनाकडे अधिक प्रमाणात वळलेले दिसतात. कारण लेखकाची मूळ प्रवृत्तीच आत्मशोधाची व आजच्या जीवनातील विविधांगी गुंतागुंत उलगडण्यात सर्वाधिक प्रमाणात रस घेणारी आहे. आजच्या जीवन व्यवहारातील विसंगती, मूल्यभ्रंश या लेखकाला प्रकर्षाने जाणवतो, व्यथित करतो, चिंतनाभिमुख बनवितो, तो विस्ताराने व्यक्त करण्याच्या संदर्भात कादंबरी हे वाहन अधिक युक्त ठरते. यामुळेच बहुधा पठारे या वाङ्मयप्रकाराकडे अधिकाधिक आकृष्ट होत चालले असावेत.

श्री. पठारे यांची प्रकृती प्राधान्याने वर्तमाननिष्ठ आहे. यामुळे स्वातंत्र्योत्तर काळात महाराष्ट्रात जी नवी राजकीय- सामाजिक- सांस्कृतिक परिवर्तने घडून येत आहेत या साऱ्यांचे भान पठारे बाळगतात, ते शब्दबद्ध करू पाहतात. त्यांचा दृष्टिकोण एकांगी नाही. यामुळे त्यांच्या कादंबरीविश्वात भारतीय जीवनाचे शहरी आणि ग्रामीण असे दोन्ही स्तर स्वाभाविक स्वरूपात अवतरतात. प्रा. पठारे आधुनिक ज्ञानविज्ञानाशी, शिक्षणव्यवस्थेशी जवळून परिचित आहेत. भारतीय परंपरेचेही त्यांना योग्य ते भान आहे. [१] त्यांच्या लेखनशैलीत उपरोध- उपहासाइतकीच जीवनातील काव्यात्मता टिपून घेण्याची क्षमता आहे. यामुळे इतर कोणत्याही वाङ्मय प्रकारापेक्षा 'कादंबरी' या लेखनप्रकाराकडे ते अधिकाधिक आकृष्ट होत चालले असावेत.

एकाच लेखकाजवळ एवढी गुणसंपदा एकत्र होणे, हा एक आजच्या मराठी साहित्याच्या संदर्भात तरी एक दुर्मिळ सुयोगच म्हणावा लागेल. इतर समकालीन मराठी लेखकांच्या तुलनेने श्री. पठारे यांचे कादंबरीलेखन उठून दिसते, ते यामुळेच. मराठी साहित्यप्रवाहात दीर्घकाल जे साचलेपण निर्माण झाले आहे, त्यातून बाहेर पडण्याचा प्रयत्न पठारे यांच्या अगदी पहिल्यावहिल्या कादंबरीतूनही प्रत्ययास येतो. 'दिवे गेलेले दिवस'

१. उदाहरणार्थ त्यांची 'वैकुंठाची माती' सारखी कथा किंवा त्यांनी महानुभाव पंथाचे संस्थापक श्री. चक्रधर यांच्या जीवनावर कादंबरी लिहिण्याचा सोडलेला संकल्प.



अनुक्रमणिका

(१९८२) हे या कादंबरीचे नावही तसे खूपच बोलके आहे. आणीबाणीचा कालखंड हे या कादंबरीचे लक्ष्य आहे. यावरून प्रस्तुत नाव किती बोलके आहे, हे सांगण्याची आवश्यकता नाही. विषयाच्या निवडीवरूनच पठारे यांची, वर्तमानसंबद्ध समाजाभिमुखता स्पष्ट होते.

हीच वर्तमानसंबद्ध समाजमनस्कता, त्यांच्या 'रथ' (१९८४) या कादंबरीतून प्रकट झाली आहे. तिचे लक्ष्य ते आजच्या साहित्यसंस्कृतीतील गुंतागुंत, तिचे फसवेपण, लेखकाच्या मूळ सद्हेतूचे कालांतराने कळत-नकळत आत्मवंचनेत किंवा परवंचनेत होणारे रूपांतर, मूळ, शुद्ध हेतूचे समाजातील सत्ताभिलाषी व्यक्तींकडून केले जाणारे भ्रष्टीकरण. पठारे यांच्या 'चक्रव्यूह' (१९८९) या तिसऱ्या कादंबरीतही आजच्या विद्यापीठीय संस्कृतीतील भ्रष्टीकरणाचे विदारक दर्शन घडते. शुद्ध ज्ञानोपासनेच्या उद्दिष्टांनी अस्तित्वात आलेली 'विश्वविद्यालय' नामक संस्था आजच्या राजकीय, सामाजिक, जातीय तणावांनी आतून कशी डळमळत चालली आहे, त्याचे प्रत्ययपूर्ण दर्शन ही कादंबरी घडविते. श्री. पठारे यांच्या आजवरच्या कादंबरीलेखनात सर्वाधिक प्रमाणात यशस्वी ठरलेली ही कादंबरी.

कालक्रमदृष्ट्या 'हारण' ही पठारे यांची चौथी कादंबरी (१९९०). पठारे यांच्या आजवरच्या कादंबऱ्यांत ही कादंबरी आकाराने मोठी आहे. तीत 'हारण' नावाच्या, दारिद्र्यावस्थेतील एका ग्रामीण कुटुंबात जन्माला आलेल्या, स्त्रीच्या जीवनाची परवड लेखकाने निरनिराळ्या अंगांनी चित्रित केलेली आहे. या निमित्ताने श्री. पठारे यांनी सर्वसामान्यांच्या जीवनातील विविधांगी दुःखभोगांचे, अगतिकतेचे दर्शन घडविले आहे. भारतीय स्त्रीच्या वाट्याला येणारे विविध दुःखभोग, व्यथावेदना, स्त्रीपुरुष नात्यातील विविधांगी ताणतणाव, गूढता हा पठारे यांच्या कथा-कादंबरीतून वारंवार डोकावणारा विषय. तो याही कादंबरीत आढळतो. आजचे आणि कालचे, स्वप्न आणि सत्य, क्षुद्रमनस्कता आणि उदात्तत्व, गद्य आणि काव्य, यांची द्वंद्वपूर्ण दर्शने श्री. पठारे यांच्या सर्वच कादंबऱ्यांतून आढळतात. त्यांच्या 'टोकदार सावलीचे वर्तमान' या काहीशा चमत्कृतीपूर्ण नावाने प्रसिद्ध झालेल्या (१९९१) कादंबरीच्या प्रास्ताविकाचा काही भाग पाहिल्यास पठारे यांना कोणत्या प्रकारचे जीवनदर्शन अभिप्रेत आहे, याची कल्पना येते. या कादंबरीच्या प्रास्ताविकात आलेला हा पुढील काही भाग पाहा :

'वर्तमान वगैरे सुटं असं काही नसतंच. आजच्या भूतकाळाची सावली त्याच्यावर असते. शिवाय वर्तमानाचा प्रत्येक क्षण पुढच्याच घडीला भूतकाळाच्या विशाल उदराचा एक नगण्य भाग होऊन जातो. एखाद्या कृष्णविवरासारखा हा भूतकाळ प्रत्येक वर्तमानाला सारखा आपला गिळतच असतो. मान्य आहे की, हे सारं स्थळकाळाच्या चौकटीत घडत असतं. तरीही भूतकाळाच्या या सर्वभक्षी गाठोड्याची– म्हणजे त्याच्या असण्याची जाण, ही फारच त्रासदायक गोष्ट आहे, आणि भविष्यालाही हे गाठोडं सुविहितपणे नियत्र करतं म्हणे. ढोबळपणे म्हणायचं तर भूत, वर्तमान, भविष्य ही काही कणखर अशा सूत्रांनी बांधलेली

असतात. भविष्याची खिडकी प्रत्येक क्षणी समोर दिसत असली तरी ती उघडून पल्याड पाहता येत नाही, ही माणूस म्हणून आपली मर्यादा, त्यामुळे आपण उरतो अस्सल वर्तमानापुरते. भूतकाळ असतो. त्याची टोकदार सावली याच्यावर असते, वगैरे ठीक, पण त्याच्यासारखा विचार करणार कोण ? सारखं वाढत जाणारं ते ओझं– त्याच्याखाली सतत चिणत जायचं का ? आणि वर्तमानच मुळी पुष्कळदा आपल्याला इतकं गुरफटून टाकतं, इतकं जड होतं, तिथं मागे कोण पाहणार ?

सामान्यतः हे खरंच आहे. डोक्याला झगझग असणं बरं नाही, सुखानं जगायचं असेल, तर नाहीच नाही. अर्थात यात एक घोटाळा आहे. -तो सत्तेचा. वर्तमानावर आपली सत्ता असते, असं आपल्याला पुष्कळदा वाटत असतं. सुखानं जगण्यासाठी जे काही भ्रम आवश्यक असतात, त्यांतला हा एक...'

वरील प्रास्ताविकावरून पठारे यांच्या जीवनचिंतनाचा व्यापक आवाका, झेप लक्षात येते, पण प्रत्यक्षात मात्र, पठारे यांचे कादंबरीलेखन अपेक्षित उंची गाठत नाही. पठारे यांचे कादंबरीलेखन आता कुठे क्षितिजावर उमटून येत असतानाच या लेखकाकडून माध्यान्हीची तेजस्विता अपेक्षिणे, कुणाला चुकीचे वाटेल, कलावंताची कुंडली कुणी मांडू नये, असा (सु) विचारही कुणाच्या मनात येईल; परंतु पठारे यांच्यासारख्या अव्वल दर्जाची गुणवत्ता असलेल्या कादंबरीकाराने आपल्या कादंबरीविश्वात, अगदी प्राथमिक स्वरूपाचे काही कच्चे दुवे का राहू द्यावेत असा प्रश्न मनात येतो. (उदाहरणार्थ, 'दिवे गेलेले दिवस'चा उत्तरार्ध, वृत्तपत्रीय पातळीवर सरपटत राहणे, 'हारण'च्या उत्तरार्धात अनेक अपघाती घटनांची माळ गुंफली जाणे, 'चक्रव्यूह'सारख्या एरव्ही गुणवान असलेल्या कादंबरीचा शेवट अपघाती घटनेने केला जाणे, त्यांच्या प्रत्येक कादंबरीत या ना त्या स्वरूपात, व्याजरम्यता डोकावत राहणे, इ.) पठारे ही व्यक्ती मूळची तशी चिकित्सक, चोखंदळ, विश्लेषणाभिमुख, तत्त्वचिंतक वृत्तीची. आपल्या कादंबरी लेखनाकडे तटस्थ, चिकित्सक वृत्तीने पाहणारी अशी असूनही हे असे का घडत राहते ? पठारे यांची अभिव्यक्ती पूर्णतया सावयवी का बनत नाही, असे प्रश्न मनात उभे राहतात. आणि याचे उत्तर साकल्याने शोधू जाता, सर्वच मराठी कादंबरीविश्वाला, या ना त्या प्रकारचे थिटेपण असल्याची जाणीव तीव्र होते. इतर प्रांतांतील कादंबरीलेखनाची गती लक्षात घेता, आधुनिक मराठीचे हे दालन तसे समृद्ध नाही, हा भाव प्रबल होतो. [१] हरिभाऊ आपटे यांच्यासारख्या मराठीतील नामवंत कादंबरीकारावर इतिहासाचार्य राजवाडे यांनी आपल्या 'कादंबरी'वरील लेखात घेतलेले आक्षेप समोर येतात.

---

१. खुद्द पठारे यांनी आपला आवडता कादंबरीकार म्हणून मराठीतील कोणत्याही कादंबरीकाराचा निर्देश न करता, शरदबाबूंचा उल्लेख केला आहे, हे या संदर्भात लक्षणीय आहे ('अनुष्टुभ' मे-जून १९९१ मधील पठारे यांची मुलाखत).

हरिभाऊंचा कालखंड हा आधुनिक मराठी कादंबरीचा तसा प्रारंभकाल असल्यामुळे, मराठीत कादंबरीलेखनाची तशी परंपरा नसल्यामुळे आणि हरिभाऊकालीन सांस्कृतिक पर्यावरण 'सदाशिव पेठी' राहणे अटळ असल्यामुळे हरिभाऊंच्या कादंबरीलेखनात, आजच्या संदर्भात काही त्रुटी जाणवत राहिल्यास, एक ऐतिहासिक अपरिहार्यता म्हणून त्यांचा स्वीकार करणे शक्य होते, पण हरिभाऊंइतकेही यश पुढील काळातील कादंबरीकारांना शतकभराच्या कालानंतरही संपादन करता आलेले नाही, असे साकल्याने जाणवते. नियमाला काही अपवाद असतात, असे याही बाबतीत म्हणता येईल, पण अपवादामुळे नियमाला बाधा येत नाही. एरव्ही 'रणांगण'सारखी जागतिक महायुद्धाची पार्श्वभूमी लाभलेल्या कादंबरीचे पर्यवसान एका मामुली प्रेमकथेत का व्हावे ? गंगाधर गाडगीळांसारखा अग्रगण्य नवकथाकाराची लो. टिळकांच्या जीवनावर आधारलेली 'दुर्दम्य' कादंबरी प्रत्ययपूर्ण का होऊ नये ? किंवा भालचंद्र नेमाडेंसारख्या मराठी कादंबरीविश्वाला नव्या दिशा दाखविणाऱ्या कादंबरीकाराचे कादंबरीलेखन दीर्घकाल कुंठित का व्हावे ? जीवनवास्तवाचे प्रखर भान घेऊन साहित्यक्षेत्रात नव्याने पदार्पण केलेल्या दलित वा ग्रामीण लेखकांचे-लेखिकांचे कादंबरीलेखन काही अपवाद वगळता ठिसूळच का राहावे ? 'मुक्तिवादी' साहित्यात आवर्तात्मकता का प्रविष्ट व्हावी ? समकालीन हिंदी, बंगाली वा कन्नड भाषांतील कादंबऱ्यांच्या तुलनेने तर मराठी कादंबरीचे हे थिटेपण अधिकच अधोरेखित होते.

या वस्तुस्थितीची कारणमीमांसा हा तसा फार गुंतागुंतीचा विषय आहे. स्थूलपणे बोलावयाचे तर या दुरवस्थेचा उगम महाराष्ट्रातील व्यक्तिकेंद्री, पांढरपेशाप्रवण आधुनिक संस्कृतीत आढळेल. या संस्कृतीतून जी काही लक्षणीय साहित्यनिर्मिती झाली, ती मुख्यतः भावकवितेच्या आणि 'त्रुटित जीवनातील सुट्या कल्पनात' रमणाऱ्या लघुकथेच्या अंगाने. कादंबरीलेखनाला आवश्यक असलेले जीवनवास्तवाचे व्यापक भान सांभाळणे मराठी लेखकाला नको वाटते. [१] परिणामतः लहान चणीचे वाङ्मयप्रकार ते निवडतात. मराठी माणूस हा 'नाट्यप्रेमी,' 'नाट्यवेडा' मानला जातो. ज्या काळात लघुकथा फोफावली, त्या काळात संगीत नाटकांसारखा वाङ्मयप्रकारही प्रचलित होता. पण बहुसंख्य मराठी नाटके, व्याजरम्य भूतकाळात रमणारी पौराणिक- ऐतिहासिक थाटाची असत– असतात. प्रखर

---

१. लघुकथेची अव्यभिचारी निष्ठेने उपासना करणाऱ्या श्री. अरविंद गोखले यांचे कादंबरीबाबतचे पुढील उद्गार पाहा : "काही लेखकांना कादंबरीलेखनात जीवनदर्शनाचा व्यापक आलोक आढळतो. जीवनपटातील जटिलता ओढ लावते, असेलही. पण एक कादंबरी लिहावयाची म्हणजे त्यातील व्यक्तींत व विषयात फार गुंतून पडावं लागतं. सतरा अवधानं सांभाळावी लागतात," ('अग्निहोत्र,' पृ. २२) ही अवधाने सांभाळण्याइतका 'पेशन्स' मराठी लेखकात कमी आहे, असाच याचा अर्थ नाही काय ?

जीवनवास्तवाला सहसा ती सामोरी जात नाहीत, ही वस्तुस्थिती आहे. आजची लोकप्रिय मराठी कादंबरी याच प्रकृतीची आहे, हे वेगळे नमूद करण्याची आवश्यकता नाही. यातूनही नवी वाट काढणारे जीवनवास्तवाचे भेदक भान देणारे काही कादंबरीकार आहेत, पण त्यांची संख्या तशी अल्प आहे, तीतून एक नवी धडपड मात्र जाणवते. ती वाढीस लागावयाची असल्यास लेखकाप्रमाणे वाचकावरही काही नवे संस्कार घडवून आणण्याची, त्यांची अभिरुची प्रगल्भ करण्याची आवश्यकता आहे, कारण कोणत्याही काळातील साहित्यसंस्कृतीची लेखक आणि वाचक, निर्माता आणि आस्वादक ही परस्परसापेक्ष अंगे असतात. एकाच्या विकासावर दुसऱ्याचाही विकास अवलंबून असतो.

आज आपण लोकशाहीच्या जमान्यात वावरतो खरे, पण ही लोकशाही सांस्कृतिक-संभरणदृष्ट्या तशी अप्रगल्भच राहिली आहे. अशा लोकशाहीची जडणघडण प्रभावी होण्याच्या दृष्टीने लोकशाहीला पायाभूत असलेल्या व्यक्तीला, व्यक्तिसमूहाला संस्कारित करण्याची जबाबदारी स्वतःला प्रगल्भ मानणाऱ्या गटावर आहे. वस्तुतः शिक्षणसंस्थांचे किंवा विद्यापीठांचे हे कार्य. पण प्रादेशिक विद्यापीठांच्या संख्येत सातत्याने भर पडत असूनही वाङ्मयसंस्कृती वा विचारसंस्कृती विकसित करण्याचे कार्य ही विद्यापीठे अपेक्षित प्रमाणात पार पाडीत नाहीत, ही उद्वेगजनक वस्तुस्थिती आहे. इतर सांस्कृतिक संस्थाही या बाबतीत निष्क्रियच राहिल्या आहेत. त्या सक्रिय झाल्याखेरीज मराठी कादंबरीचाच काय, पण मराठी साहित्याचाही रथ गतिपूर्ण होणार नाही. तसा तो करण्याची जबाबदारी आपणा सर्वांचीच आहे.

(कलानगर, धनकवडी, पुणे ४११ ०४३)

---

## नवे आजीव सदस्य (जानेवारी ते मार्च १९९३)

### (पुणे)

सौ. लेले हेमा सुभाष, गोगावले सुनील रामराव, श्रीमती वैद्य शीला साईनाथ, धुपकर वसंत शिवराम, कु. रनाळकर माधुरी रमेशचंद्र, बेहेरे रवींद्र गणपती, प्रा. घाणेकर प्र. के., डॉ. मुजुमदार शांताराम बळवंत, सौ. उपाध्ये साधना ज., चितळे श्रीकृष्ण प्रभाकर, ताम्हनकर विश्वनाथ आत्माराम.

### (अन्य ठिकाणचे)

मुठाणे राजन आण्णासाहेब (इचलकरंजी), कोल्हटकर म. वि. (सातारा), करमाळकर ज. प्र. (सातारा), मदने शांताराम शिवाजी (सासवड), भट अशोक सदाशिव (वाई), प्रा. देवरे शिवाजी सीताराम (धुळे), कु. शिंदे साधना वसंतराव (कोपरगाव), बिनीवाले गजानन विष्णू (कल्याण), श्री. वायळ हो. पां. (कवी बन्सीलाल) (टाकळीभाग जि. अहमदनगर), महाजन ईश्वर म. (सांगली), आचार्य विश्वनाथ लक्ष्मण (सातारा).



अनुक्रमणिका

अरुण जतकर

# मुळाक्षरांची महासभा

सरस्वतीच्या वेदमंडपात लालित्य-वैभवाने लखलखणारा 'ल' आज विशेष अस्वस्थ होता. आपल्या लोभस, लाघवी लीलेने सर्वांना लुब्ध करून टाकणारा 'ल' नेहमीच ललकारत असे, 'वर्णमालेतील माझे स्थान ध्रुवाप्रमाणे दृढ आणि निश्चल आहे.' पण एक कुवार्ता आज त्याच्या कानावर आली, 'मराठी सारस्वतात 'ल' ला एका दाक्षिणात्याने आव्हान दिले आहे, इतकेच नव्हे, तर तो मराठीच्या मुळापर्यंत जाऊन भिडला आहे !'

प्रथम या नवख्याचे नावसुद्धा 'ल'ला म्हणता येईना. 'ल'ने आपली जिव्हा नाना प्रकारे मुडपून पाहिली. तोंड वेडावून तो शेवटी म्हणाला, 'ळ' ? शीः ! हा काय उच्चार आहे ?'

वार्ताहरांना 'ल' म्हणाला, "माझ्या नावाची बाराखडी म्हणून बघा- ल, ला, लि, ली, लु, लू, ले, लै, लो, लौ, लं, लः ! पुन्हापुन्हा म्हणायची जिभेला लालसा होते की नाही ? आणि हा कोण अश्लील, असभ्य, ग्राम्य, वन्यपशुवत्, लांच्छनास्पद 'ळ' मला आव्हान देतो आहे ? वेदवाणीच्या संस्कारांनी पवित्र व मंगल झालेल्या महाराष्ट्र-सरस्वतीला ळ, ळा, ळि, ळी, ळु, ळू, ळे, ळै, ळो, ळौ, ळं, ळः म्हणताना यत्किंचितही लज्जा वाटली नाही ?"

बोलता बोलता 'ल'चे गाल रागाने लाल झाले. आसनावर नेहमी डौलाने छाती पुढे काढून व पाय ऐसपैस पसरून बसणाऱ्या 'ल'ची अस्वस्थ व काहीशी हवालदिल अवस्था पाहून वार्ताहर खळखळून हसले. या लाडावलेल्या महाशयांची 'ळ' ने चांगलीच धांदल उडवून दिलेली पाहून सर्वांनी मुलाखत आटोपती घेतली.

काही हालचाल करण्यापूर्वी 'ल' ने पुन्हा एकदा आपल्या स्थानाचे अवलोकन केले. 'य, र, ल, व, श, ष, स, ह' या वसाहतीबाहेर 'ळ'ची झोपडी आहे, ही गोष्ट 'ल' ला समाधानकारक वाटली. 'क' पासून 'म'पर्यंतची स्नेहमालिका आणि 'य' पासून 'व' पर्यंतचे जिवलगांचे मित्रवलय आपल्याला अंतर देऊन पलायन करणार नाहीत हे निश्चितच. 'श' शीलवान व 'ह' हलाधर आपल्याच दानाने झालेले, म्हणजे अंकितच. 'ष'ने श्लेषांपासून आश्लेषापर्यंत आपली साथ सोडली नाही, कधी क्लेष झाले तर त्यात तोही समदुःखी झाला. 'क्ष'ला लक्षाधीश आपणच तर बनवले. राहता राहिला तो 'ज्ञ'. पण तो शरीराने एवढा बोजड आहे की 'त' आणि 'न' च्या आधाराशिवाय त्याला काही हिरिरीने बोलता येत नाही. राजकारणात तो अनभिज्ञ आहे. युद्धप्रसंगापासून दूर राहण्याइतका तो सुज्ञही आहे. वर स्वरमालेकडे पाहावे, तर शेवटच्या तिघांचा लोप केव्हाच झालेला आहे. त्यातल्या त्यात

'ऋ'च काय तो ऋषींच्या आशीर्वादाने अजून ऋग्-वेदांतील ऋचा म्हणत, ऋत्विजांशी ऋणानुबंध जोडून बसलेला आहे. बाकीचे सर्वजण त्याला आपला दास बनवून त्याची अस्मिता झाकून टाकतात. तेव्हा 'ऋ'चे भय नाही हे गृहितच. 'अ'पासून विसर्गापर्यंतचे स्वर म्हणजे व्यंजनांचे केवळ चाकर, सेवक ! कधीकधी शब्दांच्या मिरवणुकीत त्यांना अग्रहक्क मिळतो, पण त्यांची भीती कशाला ?

अशा सर्वंकष विचाराअंती आपला पक्ष निर्भय, बलवान व सुसज्ज आहे या अनुमानाने 'ल' मनोमन सुखावला. मराठी वर्णमालेतून या 'ळ' ची हकालपट्टी केलीच पाहिजे, अशा आपल्या ठरावाला कोणी विरोध करणार नाही हे जाणून त्याने लेखणी सरसावली.

मुळाक्षरांच्या अध्यक्षांनी लखोटा उघडून वाचताच त्यांचा चेहरा काळजीने काळवंडला. त्यांच्या कपाळावरील आठ्या आणि खोल गेलेले डोळे पाहून मराठी माऊलीला कळवळा आला. किंचितशी हसून ती म्हणाली, "या 'ल' ला 'ग'ची बाधा झालेली आहे. त्याचा नक्षा उतरवल्याखेरीज त्याचे लक्षण ठीक होणार नाही. आपण सर्वच मुळाक्षरांची सभा भरवून प्रत्येकाला बोलायची संधी देऊ. तेच या 'ल'चा समाचार घेतील पहा !"

'अ'पासून 'ज्ञ'पर्यंतचे सर्वजण ओळीने महासभेत आले. अध्यक्षपदावर 'आ' बसला. ठरावाचा परिचय करून देताना तो म्हणाला, "आज आपल्यापुढे मोठी गंभीर समस्या उभी आहे. आजपर्यंत आपण प्रत्येक नवागताचे स्वागत केलेले आहे. एखाद्याला हाकलून देण्याची सूचना आज प्रथमच मांडली जात आहे. हा प्रकार इतका अपूर्व आहे की आपण सर्वांनी यावर चर्चा केली पाहिजे. तटस्थ राहण्याची ही वेळ नाही. 'ळ' वर आळ तरी कसला आहे, तर गावंढळपणाचा, खेडवळपणाचा ! माझ्या मते आरोप हलका असला तरी कोणाला वाळीत टाकण्यापूर्वी पुरती शहानिशा झालीच पाहिजे."

अध्यक्षांच्याच भाषणात 'ळ'चा उच्चार इतक्या सुलभपणे झालेला ऐकून 'ल'च्या मनात पाल चुकचुकली. चटकन उठून तो 'क'पाशी गेला आणि त्याच्या कानात काहीतरी कुजबुजला. अध्यक्षांनी काही गलबलाट माजण्यापूर्वीच घंटा वाजवून सर्वांचे लक्ष वेधले आणि 'क' ला व्यासपीठावर येण्याची विनंती केली.

कलाबुतीचे नक्षीकाम केलेल्या कपड्यांची घडी सारखी करीत, पादत्राणे करकर वाजवीत 'क' व्यासपीठावर चढला व आपल्या कणखर आवाजात म्हणाला, "मित्रहो, माझी व 'ल'ची मैत्री किती जुनी आहे ते सांगायला नको. 'क' आणि 'ल' शिवाय कालिदास झाला नसता, एवढेच नव्हे, तर महाकालेश्वरालासुद्धा दुसरे नाव धारण करावे लागले असते. पण म्हणून या कालपरवाच आलेल्या 'ळ'ला हाकलून द्यायला मी तयार नाही. 'ल' मोठा कलाकार आहे, कुलदीपक आहे, पण मराठीचा कुळाचार या 'ळ'मध्ये भरलेला आहे. उलट

'ल'ने माझ्या कानात कुजबुजून आणि तेसुद्धा या 'ळ'च्या संगतीने 'काळा कुळकुळीत बनशील' असे कुजकट काहीतरी बोलून असभ्यतेचा कलंक या महासभेच्या कपाळावर लावला आहे. 'ळ' ला केवळ कोळीष्टकात जमा करू नका. आपल्या मराठी आचारात लग्नाची वेळ आली की केळीच्या पानाखेरीज केळवण होत नाही, आणि 'ळ' ची बोळवण करणारा हा 'ल' कोण ? माझा तरी कौल असा आहे की 'ल' ने हा ठराव मागे घेऊन 'कलह' माजण्यापूर्वीच त्याला आळा घालावा !"

'क' ची कंटाळवाणी कैफियत ऐकून 'ल' च्या काळजात कोलाहल माजला. आता 'ख' काय म्हणतो तिकडे 'ल' चे लक्ष लागले. खणखणीत आवाजात 'ख' म्हणाला, "मंडळी, 'ळ' तर माझा खेळगडी आहे. त्याच्यासारखा खेळकर कोणी नाही. आणि इतका गमत्या आहे की कधीकधी हसून हसून माझी हाडे खिळखिळी होतात. त्याच्या प्रेमाने लहान बाळांच्या हातातला मी खुळखुळा झालो. या 'ल' ची मात्र चाल मला वेगळीच वाटते. तिकडे संस्कृतच्या दालनात याच्या संगतीने 'खल', म्हणजे दुष्ट असल्याचा माझ्यावर आळ आला. या 'ळ' बरोबर मला कोणी खाच-खळग्यात फेकून देवो, खलबत्त्यात घालून कुटो, नाहीतर लाखेच्या घरात माझी कोणी राख करो, 'ळ' ला मी सोडणार नाही."

'ख' ची मैत्री लाखमोलाची आहे असा 'ल' चा अंदाज असा खट्टदिशी खोटा ठरलेला पाहून 'ल' गलबलला. एवढ्यात गोंडस, गोजिरवाणा 'ग' व्यासपीठावर जाऊन पोहोचलेला होता. आपल्या गोड आवाजात तो म्हणाला, "मित्रहो, 'ळ' नुकताच इथे आला, तेव्हा त्याच्या गळ्यात गळा घालून मी फिरलो, आणि गाळात गेलो ! गुळाचे आमिष दाखवून माझी गडगंज संपत्ती गिळायचा या 'ळ' चा बेत होता, हे मला 'ल' ने पटवून दिले. तेव्हाच मी ठरवले की 'ळ' च्या हालचालींना लगाम घातला पाहिजे. गुलाबी गालांच्या या 'ल' ची गुलामी मला चालेल, पण 'ळ' ची गोळी औषधासाठीसुद्धा मी नाकारेन !"

'ग' च्या भाषणाने 'ख' च्या खरडपट्टीला चांगलीच खीळ घातली आणि चर्चेचे वातावरण पुन्हा सखल झालेले पाहून 'ल' च्या मनाला मोठ्या गुदगुल्या झाल्या, पण आता 'घ' घातकी निघतो की काय या विचाराने त्याला घोरही पडला.

'घ' ने आपला घसा खाकरून बोलायला सुरुवात केली, "आपण सगळे एकाच घरचे. घरोब्याचे संबंध घरमालकीबद्दलच्या घासाघिशीने बिघडले तर आपण सगळेच बेघर होऊन जाऊ. मला स्वतःला 'ग' लाघवी वाटतो, पण कधीकधी मला 'ल' मुळे लघुत्व येते. 'ळ' चा अघळपघळपणा मला लोभावतो. त्याच्या वागण्यात मला नेहमी घळघळीत खरेपणा दिसलेला आहे. एकाला ठेवावे आणि दुसऱ्याला हाकलावे या ठरावाने माझ्या मनात विलक्षण घालमेल चालली आहे. मला इतकेच समजते की कलहाचे हे कडू कारले, 'ग' च्या गोडव्यात कितीही घोळवले तरी त्याला गुळाची चव येणे शक्य नाही. तेव्हा प्रसंग हातघाईवर येण्यापूर्वीच ही चर्चा थांबवावी !"

आता 'च' काय चतुराई करतो याकडे 'ल' चे चित्त ओढले गेले. "वंद्यचरण अध्यक्षमहोदय," अशी आदरणीय सुरुवात करून 'च' म्हणाला, "कालगती अगाध आहे. वाणीचे चरित्र अनाकलनीय आहे. माझेच पहा, संस्कृतात चंचल चारुगात्रींशी माझा स्नेह कधीच निकटचा नव्हता. 'क' च्या कोशात मी स्वतःला लपवले तरच कंचुकीच्या वेषात त्यांचे अवलोकन करणे शक्य होते, नाहीतर चिरकाल मला चरणांगुलींची लक्ष्मणरेखा! उलट प्राकृतात या 'ळ' च्या संगतीने माझा नाद-परिचय असा काही बदलला की, चोळीच्या रूपाने मला आलिंगन देताना कोणत्याही चारुशीलेला संकोच वाटला नाही."

"मुद्द्याला धरून बोला!"– अध्यक्षांनी चवताळून गर्जना केली, तेव्हा 'च' चांगलाच चपापला. "माझ्या वाचाळपणाबद्दल क्षमा असावी" असे म्हणून त्याने सर्वांची माफी मागितली. "आता 'ल' बद्दल सांगतो. 'ल' च्या संगतीने मी संस्कृतात चालना दिली, तर प्राकृतात चवचाल समजला गेलो. कधी चेला म्हणून गौरव, कधी लेचापेचा म्हणून नाचक्की! 'ळ' मुळे मी कधी चळवळ्या, कधी चुळबुळ्या आणि कधी माझा चोळामोळा. 'ल' मुळे कधी चूल म्हणून स्वयंपाकघरात, 'ळ' मुळे कधी चूळ म्हणून घराबाहेर! आता कोणाची बाजू घ्यावी आणि कोणाला डावलावे ते मला समजत नाही."

"मग खाली बसा!"– 'ल' आणि 'ग' दोघेही न राहवून मोठ्यानेच किंचाळले. अध्यक्षांनी लाकडी हातोडीच्या आवाजाने सर्वांना शांत केले. इतका वेळ मान खाली घालून आळी-मिळी गुपचूप बसलेल्या 'ळ' ला थोडेसे हसू आले, पण ते लागलीच दडपून टाकून तो पुन्हा गप्प झाला.

"आम्ही संस्कृतातून प्राकृतात आलो, तरी आमच्यात नाही बदल झाला हो!" 'छ' ने छाती पुढे काढून सांगितले, "तिकडे छत्र असो की इकडे छत्री किंवा छत असो, आमचा उच्चार नाही पालटला."

"मुद्द्याला धरून बोला!" अध्यक्षमहाराज पुन्हा गरजले.

"आमचा तिकडेही छल या 'ल' ने केला. इकडे 'ल' च्या नादाने छिनालपणाचे लांच्छनही अंगाला चिकटले. बरे 'ळ' चा विचार करावा, तर त्यानेही आम्हाला काही कमी छळलेले नाही. त्यामुळे आमचीही मनःस्थिती आमच्या बंधूंसारखीच आहे."

पुढे काहीच आठवेनासे होऊन 'छ' ने आपले तोंड मिटवले आणि निमूटपणे आपल्या जागेवर जाऊन तो बसला.

'ज' आणि 'झ' या दोघांनीही सारखाच सूर लावला. दोघांनीही मराठीत आल्यावर झालेले उच्चारांतील बदल सांगून 'ल' आणि 'ळ' दोन्ही आमचे मित्र आहेत असे म्हटले. 'ल' मुळे 'ज' ला स्त्रीसुलभ लज्जा, ज्वालेसारखे जहालपण आणि उज्ज्वलता प्राप्त झाली; 'ळ' मुळे तो चुलीतले जळण व जाळ बनला आणि उजेडाने उजळून निघाला. 'झ' लेझीम बनून मिरवणुकीत नाचला, तसाच झुळझुळ वाहणारा झरा झाला. "आम्हाला 'ल' आणि 'ळ'

सारखेच, इतकेच नव्हे, तर ते आम्हाला जुळया भावांसारखे वाटतात" असे त्यांचे मत पडले.

'ङ्' आणि 'ञ्' या दोघांना नेहमीच सपाटून सर्दी. त्यातून अपवातात पायाला जबरदस्त इजा झाल्याने दोघांच्या वतीने अनुस्वार बोलायला उठला. पण त्याने स्वतःचेच गाऱ्हाणे गायला सुरुवात केली. "एकेकाळी आम्हांला मराठीमध्ये केवढा मान होता. आता अनुच्चारित अनुस्वार लिहिला जात नाही याचे आम्हास दुःख नाही, पण भाषेची व्याकरणशुद्धी धोक्यात आलेली आहे, याचा विचार केला जावा. . ." असे म्हणत त्याने चांदीच्या डबीतून एक चिमूटभर तपकीर नाकात सरकवली.

"तुम्ही वेगळा ठराव मांडून त्यावर चर्चेची विनंती करा. आजचा ठराव तुमच्याबद्दल नाही!"— असे अध्यक्षांनी सुनावले तेव्हा सात्त्विक संतापाने जळफळत अनुस्वार व्यासपीठावरून खाली उतरला.

'ट', 'ठ', 'ड', 'ढ' आणि 'ण' यांच्यापैकी 'ण' चे भाषण फार छोटे होते. 'ळ' प्रमाणेच 'ण' लाही कोणत्याच शब्दांत अग्रहक्क नसल्याने 'ळ' चे दुःख त्याला समजत होते. परंतु 'ल' च्या अधिकारात राहून लोण्यासारखे मवाळ वागण्याखेरीज 'ण' ला काही तरणोपायच नव्हता. शिवाय 'ल' आणि 'व' यांच्या आधाराने लवण बनवण्यात तो भागीदार झाला नाही, तर त्याचे सगळे जीवनच अळणी होणार हेही तो जाणून होता. तेव्हा 'ळ' बद्दल सहानुभूती व्यक्त करून आपली चाळणी करून घेण्यापेक्षा 'ल' च्या ठरावास संमती देण्याचा त्याने निर्णय जाहीर केला. 'ठ' चे नाते त्याच्या रोखठोक स्वभावामुळे फार कोणाशी जुळत नाही. त्यातूनच 'ल' ने त्याची लठ्ठ म्हणून नेहमीच थट्टा केलेली असल्याने त्याने आपले मत 'ल' च्या ठरावाविरुद्ध असल्याचे अगदी ठळकपणे सांगितले.

'ट' आणि 'ड' मात्र संभ्रमात पडले. 'ल' च्या लाटेचा आनंद लुटण्यासाठी जीभ तर टाळयाला लावावीच लागते. त्यामुळे 'ळ' चा टिळा कपाळावर लावून टाळ-मृदंगांच्या नादात उर्वरित आयुष्य कंठावे की 'ल' ला ललाटी घ्यावे हे कोडे 'ट' ला सुटेना. शेवटी आपले मत जाहीर करण्याचे त्याने ठामपणे टाळले. 'ट' ने चालवलेली टाळाटाळ पाहून 'ड' सुद्धा डळमळला. 'ळ' खेरीज आपल्याला दृष्टी नाही, पण 'ल' खेरीज आपला डौल नाही की लाडूची लज्जत नाही. पुन्हा 'ळ' खेरीज आपली डाळ कोणी शिजू देणार नाही. अखेरीस त्याने 'ल' च्या मनोरथांचा डोलारा कोसळवून 'ळ' च्या बाजूला आपण डुलत असल्याचे जाहीर करून टाकले. तात्काळ 'ल' ने आपल्या लाडक्या मित्रांच्या यादींतून 'ड' ला डच्चू दिला.

'ढ' चे भाषण चांगलेच गाजले. "साऱ्या वर्णमालेत मला अडाणी समजतात, तेव्हा मी कसला कोणाचे मत वळवणार? 'ल' साठी मी लढलो आहे, 'ल' ची ढालही झालो आहे. पण माझे काही बरे-वाईट झाले तर माझ्याकरता 'ळ' शिवाय कोणी दोन थेंब ढाळणार नाही. तेव्हा अंगात यत्किंचितही ढिलाई नसलेला मी 'ढ', ढळढळीतपणे जाहीर करू इच्छितो की

'ळ' बद्दलचे माझे प्रेम अढळ आहे. त्याच्या अधिकारात मी कोणालाही ढवळाढवळ करून देणार नाही."

'ढ' सारखा लढवय्या आपल्या बाजूने लढणार नाही हे पाहून 'ल' जरासा ढासळला. ठराव मागे घ्यावा की काय हाही विचार त्याच्या मनात डोकावला. पण त्याने आणखी धीर धरण्याचे ठरवले.

सभा जास्त वेळ लांबू नये म्हणून 'थ', 'द', 'ध' आणि 'न' यांनी आपले वकीलपत्र 'त' ला दिले. 'फ', 'ब', 'भ' आणि 'म' या चौघांच्या वतीने एकट्या 'प' ने मत द्यावे असे ठरले. थुलथुलीत देहाच्या 'थ' ला 'ल' व 'ळ' मधील लाथाळीत सापडून आपल्या पाठीचे थालिपीठ करून घ्यायची मुळीच इच्छा नव्हती. 'ध' म्हणजे नुसता धसमुसळ्या आणि कमालीचा धांदलखोर. तेव्हा महासभेत उभे राहण्याचे धाडस करण्याऐवजी 'त' नेच हा प्रश्न धसास लावलेला बरा, असा 'ध' ने विचार केला. 'द' चे 'ळ' शी फारसे दळणवळण नव्हते. पण तो दमनशील, दयावंत आणि दानी असल्याने त्याची बुद्धी समतोल होती. 'त' च्या तारतम्यावर विश्वास होता त्याचा.

'त' ने आपल्या तिखट जिभेची तीक्ष्ण तलवार तरवेजपणाने वापरली. तो म्हणाला, "आम्हां सर्वांना 'ल' आणि 'ग' यांचे लागेबांधे माहीत आहेत. पण माणसाने मैत्रीची दौलत ही सदसद्‌विवेकाच्या तागडीत तोलूनमापून घ्यायला हवी. नाहीतरी अनीतिमय संगतीने अधोगती झाल्याशिवाय राहणार नाही. 'ण' ची दारुण अवस्था आम्हाला समजते. पण दाती तृण धरून 'ल' पुढे शरणागती स्वीकारायची गरज नाही. 'ल' चा गुलाम होऊन त्याच्या तालावर नाचण्याची 'ग' ची तयारी आहे म्हणे ! पण 'ळ' वर किटाळ आणून 'ग' आणि 'ळ' यांच्या मैत्रीचा गळा कापण्यात 'ल' ची काहीतरी लबाडी असणार याबद्दल आमच्या मनात तसूभरसुद्धा संशय नाही. अहो, विठोबाच्या भक्तिरसाने न्हाऊन-माखून निघालेले लोण्यासारख्या मऊसूद अंतःकरणाचे संत तुकाराम म्हणतात, 'भले तरी देऊ कासेची लंगोटी, नाठाळाचे माथी हाणू काठी !' तुळजाभवानीची शपथ घेऊन आम्हीही या 'ल' ला सांगू इच्छितो की, धुतल्या तांदळासारखे आचरण स्वच्छ ठेवलेस, कमलदलांप्रमाणे मन निर्मल ठेवलेस आणि लता-वेलींसारखा सुखद राहिलास तर तुझ्या लाल गालांवरचा तीळ होऊन आम्ही राहू, सगळ्या अमंगलतेपासून तुझे रक्षण करू. पण या भरल्या घरात आपल्या निळ्या-सावळ्या गोपाळाविरुद्ध कारवाया पुन्हा केल्यास तर आमच्या लाथेचा धनी होशील !"

'त' चे खरमरीत भाषण ऐकून 'ल' चा चेहरा पांढरा फटक पडला. पण निदान 'ग' आणि 'ण' तरी आपल्या पाठीशी आहेत, तेव्हा आणखी कोण आपली बाजू उचलून धरतो याबद्दल त्याला उत्सुकता होती. आपले मनोरथ फलद्रूप होणे शक्य नाही हे त्याने जाणले होते, पण 'प' चे पारडे कोणत्या बाजूला झुकते हे पाहीपर्यंत स्तब्ध राहणे 'ल' ने पत्करले.



अनुक्रमणिका

महासभा सुरू होईपर्यंत 'श' आणि 'ष' यांच्या पोटात एक वेगळीच मळमळ होती. संस्कृत आकडेवारीतले 'षोडष' चे स्थान मराठीत सोळाला मिळाले म्हणून त्याच्या मनात रुसवा होता. 'एकादश, द्वादश...' इत्यादींच्या जागी मराठीने 'अकरा, बारा... एकोणीस, वीस' यांची नेमणूक केल्यामुळे तक्रार गुदरावी अशी 'श' च्या मनात खुमखुमी होती. परंतु आपल्या गाऱ्हाण्यांनी वातावरण आणखी गढूळ झाले तर 'ल' वरचा राग आपल्यावर शेकेल, या शंकेने त्यांची रग एव्हाना जिरून गेली होती. 'स' ने सुद्धा 'सहस्र' चे 'हजार' झाले त्याबद्दल काही बोलण्याची सुरसुरी मनातल्या मनात मुरवून टाकली. 'ळ' च्या मनात आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या, तरी सभेचा रागरंग पाहून आधण उतू जाणार नाही व कोणाला दिसणार नाही याची खबरदारी त्याने घेतली.

डाव्या हाताचा पंजा आपल्या माकडहाडापाशी रोवून व पोट थोडेसे पुढे काढून 'प' बोलायला उभा राहिला. "अठरापगड पुराणांचे परिशीलन करून मला एकच पडताळा आलेला आहे– परोपकार हेच पुण्य आणि परपीडन म्हणजेच पाप !- 'ळ' वर हद्दपारीचा अन्याय करणे हे आम्ही तरी पापच समजतो. हातात पिनाक धनुष्य घेतलेला, कंठात फणि, म्हणजे नाग ल्यालेला, वालांमध्ये म्हणजे केसात चंद्र धारण केलेला, सर्वांगावर भस्म लावलेला व मस्तकावर मंदाकिनीला म्हणजे गंगेला झेलणारा शिवशंकर हा तर नाद-ब्रह्माचा आदिपुरुष. त्याने आम्हा 'प-वर्गीयांची' स्थापना सरस्वतीच्या प्रफुल्ल अधरांवर मोठ्या प्रेमाने केली. आम्हीच जर 'ल' च्या ठरावास पाठिंवा देऊन पापाचे वाटेकरी झालो, तर काळभैरव आपला तिसरा डोळा उघडून आमची राख-रांगोळी करील. तेव्हा मी स्वतः तर आपल्याला पोळून घेणार नाहीच नाही, शिवाय नांगराच्या फाळापासून श्रमाच्या फळापर्यंत 'ळ' शी जुळलेला 'फ' कधी 'ळ' ची फळी फोडणार नाही, 'ल' च्या लोभासाठी 'ब' कधीही 'ळ' वर बलात्कार करणार नाही, भोळ्या सांबासारखा भल्या दिलाचा 'भ' कोणी लाच देऊ केली तरी भुरळणार नाही आणि मखमलीसारखा मुलायम 'म' तर 'ळ' ची मोळी बांधणार नाही."

'प' चा प्रत्येक शब्द 'ल' च्या हृदयात भाल्यासारखा रुतला. दीनवाण्या व मलूल चेहऱ्याने 'ल' ने अध्यक्षांना विनंती केली की चर्चा किंचित्काळ स्थगित करावी. 'य', 'व'... इत्यादी आपल्या निकटच्या नातलगांशी मसलत करता यावी म्हणूनच हा 'ल' चा शेवटचा डाव होता.

'नाहीतरी याच्या महत्त्वाकांक्षा धुळीला मिळाल्यातच जमा आहेत' असा विचार करून अध्यक्षांनी चर्चासूत्रात स्वल्पविराम घेण्याची विनंती मान्य केली. परंतु सभामंडपातून बाहेर पडतानाच आपले नातलग दुराव्याने वागताहेत हे, 'ल' ने पाहिले. 'य', 'व', 'र', 'श', 'ष', 'स' आणि 'ह' यांच्याबरोबर 'क्ष' आणि 'ज्ञ' एका पिंपळाखाली जाऊन बसले. 'ळ' भोवती बाकी सर्वांचा घोळका होता. शेवटी 'ग' आणि 'ण' सुद्धा त्या घोळक्यात सामील झाले.

एकाएकी 'ल' चे पाय लटलटायला लागले. आता तोल जाऊन खाली पडतो की काय, असे वाटून तो खाली बसला. त्याच्या घशाला कोरड पडली व एकटेपणाच्या, हद्दपारीच्या भीतीने त्याची छाती धडधडायला लागली. त्याची निर्माल्यवत झालेली अवस्था पाहून मराठी माऊलीने त्याला सभामंडपात आणले, आपल्या पदराने त्याला शीतल वारा घातला व त्याच्या मुखावर अल्पसे पाणी शिंपून त्याला शांत केले.

बाहेर दोन्ही समूह एकत्र झाले. 'ल' चा प्रस्ताव अमान्य आहे अशी सर्वांनी अध्यक्षांना निखालस ग्वाही दिली. आता भाषणे नकोत, चर्चा पुरे झाली असे सगळ्यांचे मत पडले. 'ल' वर बहिष्कार टाकावा का, याही प्रश्नावर ऊहापोह झाला. पण 'ल' ची गरज तर मराठीला पावलोपावली पडते. त्यामुळे 'ल' चा विलय होऊ देणे कोणाच्याच हिताचे नव्हते. आता 'ल' ला चुचकारून तर घ्यायचे, म्हणजे तो लखलखीत राहील; पण त्याची लालसा कायमची मिटवायची, म्हणजे पुन्हा असला प्रसंग निर्माण होणार नाही; अशी कामगिरी कोण करणार ? कोणालाच हे काम जमण्यासारखे दिसत नव्हते.

अध्यक्ष शेवटी ज्ञानवृद्ध 'ज्ञ' ला म्हणाले, "आमची सगळी मदार आता तुमच्यावर आहे. तुम्हीच काय तो मार्ग काढा !"

महासभा परत भरली, तेव्हा 'ल' मराठी माऊलीच्या बाजूला मान खाली घालून, अंग चोरून बसलेला सर्वांनी पाहिला. अध्यक्षमहाराजांनी मोठ्या आदराने 'ज्ञ' ला व्यासपीठावर काळजीपूर्वक आणले व बसूनच बोला म्हटले. दूर आपापल्या आसनांवर बसणे सोडून सगळे 'ज्ञ' भोवती गोळा झाले. मराठी माऊलीसुद्धा 'ज्ञ' च्या पुढ्यात एका बाजूला 'ल' आणि दुसऱ्या बाजूला 'ळ' ला घेऊन बसली. अत्यंत क्लेपयुक्त स्वरात 'ल' म्हणाला, "माझा प्रस्ताव मागे घेण्याची मला परवानगी द्यावी. आपणा सर्वांचा मी अपराध केलेला आहे, त्यावद्दल मी आपली क्षमा मागतो."

पण एवढ्यावरच सगळे मिटले नव्हते. 'झाले, गेले, गंगेला मिळाले' असे मानायला सर्वांची तयारी नव्हती. त्यामुळे अध्यक्ष म्हणाले, "कुळाचाराच्या मर्यादेचे उल्लंघन 'ल' च्या हातून का घडले; ते जाणून घेण्याची माझी इच्छा आहे."

'ज्ञ' ने सर्वांकडे निर्मळ नजरेने न्याहाळून बोलायला सुरुवात केली, "मर्यादेचे उल्लंघन हे आपल्या विस्मृतीचे फळ आहे. एका अक्षराशी दुसऱ्या अक्षराचे नाते जुळवून अर्थाची निर्मिती करणे ही शब्दसृष्टीच्या ईश्वराची लीला आहे. त्या ईश्वराचे संकेत जाणणे व पाळणे हीच आपल्या अस्तित्वाची इतिकर्तव्यता आहे. पण आपल्याला नसलेले अधिकार आहेत असे समजून अहंकाराने अर्थ-निर्मितीचे श्रेय स्वतःकडे घेणे यालाच अज्ञान म्हणतात. 'न' ला हाताशी मी धरल्यामुळेच 'ज्ञान' निर्माण झाले असे जर मी म्हणालो, तर जगात त्याहून मोठा अडाणीपणा होणार नाही. अर्थ हा शब्दांचा प्राण आहे, आपल्या नाम-रूपांच्या सांगाड्यात नाही. 'ल' ला आज विसर पडला, उद्या दुसऱ्या कोणाला पडू शकेल. 'ज्ञान' हे 'ज्ञ' आणि 'न'

यांचे संयुग नव्हे, कारण ज्ञान म्हणजे काय ते केवळ शब्दसृष्टीच्या ईश्वरालाच माहीत आहे. जाणीवनेणीव केवळ त्याची आहे, म्हणूनच 'ग्यान' म्हटले तरी त्याचा अर्थ बदलत नाही."

"वाः !" असे म्हणून सर्वांनी माना डोलावून 'ज्ञ' ची वाहवा केली. परंतु 'ल' च्या मनातले किल्मिष यामुळे गेले की नाही हे कळणे शक्य नव्हते. शेवटी 'ळ' ने विचारले, "मी कोण आहे ते माझे मलाच समजेनासे झालेले आहे. माझी मलाच ओळख करून द्या !"

"बाळा," ज्ञ म्हणाला, "तुझे चरित्र फार आगळे आहे. विंध्य, सातपुडा व सह्याद्री पर्वतांवर शिव-पार्वती एके काळी संचार करीत होते. "आपले प्रेम चिरंतन आहे, त्याला एखादे अपूर्व नाव द्या" असे पार्वतीने एकदा म्हटले. भगवान शंकरांनी बराच विचार केला व म्हटले, "उमे, आपल्या चिरंतन प्रेमाला नवे नाव मला सुचले बरें." "मग सांगा बघू !" असे पार्वतीने म्हणताच शंकर म्हणाले, "उमाळा !"

"अपूर्व आहे खरे, पण ते म्हणायचे कसे व लिहायचे कसे ते तरी सांगा."

त्यावर शंकराने आपली एक जटा उपटली व तिला 'ल'चा आकार दिला. मग 'ल' चे दोन्ही पाय चिमटीत धरून त्यांची सुंदर वलये बनवली.

"पण हे तर अनादि-अनंत कालाचे लिंग (चिन्ह) आहे"– पार्वती म्हणाली.

"म्हणूनच मी आपल्या चिरंतन प्रेमाला 'उमाळा' म्हटले !"

त्या उत्तराने पार्वतीला विलक्षण आनंद झाला. तिने त्या लिंगाच्या अनेक प्रतिमा बनवल्या. फुलांसवे डोक्यात माळल्या, माळ बनवून 'मंगळसूत्र' गळयातही घातले. आणि शेवटी सौभाग्यलेणे म्हणून 'ळ' हे अक्षर मराठीला दिले.

पुढे ज्ञानेश्वरांनी 'ळ' चा उपयोग करून 'अमृताची अक्षरे रसिके मेळवीन' असा संकल्प सोडला व ज्ञानेश्वरीच्या रूपाने मराठीच्या प्रांतात ब्रह्मविद्येचा सुकाळ केला. रामदासांनी शंकराच्या आरतीत 'लवथवती विक्राळा, ब्रह्मांडी माळा. . .' अशी सुरुवात करूनच उमा-वेल्हाळाचे वर्णन केले त्याचेही कारण तेच."

आता मात्र 'ल' चे डोळे भरून आले. "तुला मी ओळखले नाही, ही माझी चूक पदरात घे" असे म्हणत 'ल' ने 'ळ' ला आलिंगन दिले. मुळाक्षरांची महासभा जुळया भावांच्या गाठीभेटीने सद्‌गदित झाली.

मराठी माऊलीने दोघांना उराशी घट्ट धरले व म्हटले, "तुम्ही दोघेही माझे लाडके आहात. तुम्हा दोघांना एकमेकांचा लळा लागो !"

(मन्रोव्हिल, पेनसिल्व्हेनिया, अमेरिका)

(संपर्क : द्वारा डॉ. श्रीनिवास केळकर, १५ ए/१४, एरंडवणे, कर्वे रस्ता, पुणे ४११००४)

डॉ. नीलिमा गुंडी

# आधुनिक काव्य आणि रेल्वे

भौतिक जगातील अचेतन घटकांचा कविमन कसा स्वीकार करते, हे पाहू जाता भोवतालचे वास्तव आणि कविता यांच्यातील नात्यावर प्रकाश पडत जातो. वैज्ञानिक प्रगतीमुळे जन्माला आलेला, मानवी संस्कृतीचा चेहरामोहरा बदलायला भाग पाडणारा 'यंत्र' हा एक प्रभावी अचेतन घटक होय.

## आधुनिक मराठी काव्यातील यंत्रसंवेदना

गेल्या शतकात इ. स. १८५० नंतर हिंदुस्थानात यंत्रयुगाचे आगमन झाले. त्यामुळे रेल्वे, पोस्ट, तारायंत्र या रूपांत दळणवळणांच्या साधनांत झालेली क्रांती आपल्या सांस्कृतिक जीवनातही उलथापालथ घडवून गेली.

आधुनिक मराठी काव्यातील यंत्रसंवेदनेचा आलेख काढायचा झाला, तर यंत्रयुगातील 'रेल्वे' या एका प्रमुख घटकाचे काव्यातून घडणारे दर्शन उदाहरणादाखल पाहाणे, पुरेसे ठरावे.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात रेल्वेविषयी, या 'विनवैलाच्या गाडी' विषयी पद्यामध्ये असलेल्या प्रतिक्रिया काहीशा वर्णनात्मक आहेत. त्यामागे बव्हंशी भयचकिततेची भावना आहे. भारतीय व्यापारधंद्यांच्या मुळावर घाव घालणारी ही रेल्वे– अशा भूमिकेतून पारतंत्र्यकाळात तिच्याविषयी रागही प्रगट झालेला आहे.

## विसावे शतक : काव्य आणि रेल्वे

विसाव्या शतकात समाजमन या यंत्ररूपाकडे थोड्या वेगळ्या दृष्टिकोनातून पाहू लागले. या बदलत्या सांस्कृतिक पर्यावरणाशी काव्याचा नकळत कसा आंतरिक संबंध आहे; याचे उदाहरण देता येईल. इ. स. १९२९ मधे मुंबई-पुणे रेलगाड्या विजेवर धावू लागल्या आणि १९३० मधे डेक्कनक्वीन ही पुणे-मुंबई जलद रेल्वेगाडी सुरू झाली; हे तपशील वाचताना सहज आठवते की, इ. स. १९३१ मधे कवी अनिल ऊर्फ आ. रा. देशपांडे यांनी काव्यात, 'मुक्तछंदा' ची योजना करून काव्याच्या प्रचलित असलेल्या रूपाला एक धक्काच दिला होता. (म. सा. प. तर्फे प्रसिद्ध झालेल्या 'मराठी वाङमयाचा इतिहास' खंड सहा भाग, [संपा. गो. म. कुलकर्णी, व. दि. कुलकर्णी] यात शेवटी दिलेल्या कालपटातील नोंदी वाचताना हे ठळकपणे लक्षात येते.) एकंदरीत, मुंबई-पुणे या मराठी संस्कृतीच्या महत्त्वाच्या केंद्रामध्ये होणारे

मिळालेली मुक्तछंदाची जोड; या समांतर घडामोडींचा जुळलेला योग पाहता 'काव्य बदलत्या पर्यावरणाशी स्वतःला कसे जुळवून घेत आहे', हे सूचित होते.

आधुनिक कवितेत रेल्वेशी निगडित भावानुभव कवितेत येत गेले आणि कवींच्या प्रतिमासृष्टीतही रेल्वेला स्थान मिळाले. यंत्राशी निगडित प्रतिमा सुरुवातीला काव्यामध्ये विनोदनिर्मितीसाठी वापरण्याची प्रवृत्ती साहजिकच दिसते. बा.श्री. पुरोहित यांची 'उद्ध्वस्त फलाट' ही विडंबनपर कविता ('गाजराच्या पुंग्या', शारदामंडळ प्रकाशन, पुणे, १९३५) येथे आठवते. गोविंदाग्रजांच्या 'प्रेम आणि मरण' या कवितेतील एकनिष्ठ प्रेमभावनेचे विडंबन करताना माधव जूलियनांच्या 'संगमोत्सुक डोह' च्या चालीवर बांधलेली अशी ही कविता आहे. मूळ कवितेतील आकाशस्थ विजेच्या एकटक प्रतीक्षेत धन्यता मानणाऱ्या वृक्षाच्या जागी येथे 'फलाट' येतो आणि विजेच्या जागी वेगवान गाडी येते. म्हणजे निसर्गप्रतिमांच्या जागी निसर्गाशी विरोधी मानलेल्या यंत्रसृष्टीतील निर्जीव घटक येतात आणि त्यातून विनोदनिर्मिती घडते.

कुसुमाग्रजांच्या 'आगगाडी व जमीन' ('विशाखा,' १९४२) या कवितेत घाटातील गाडी आपल्या धावत्या चालीचा ठेका पकडून कवितेत गतिमान रूपात चित्रित होते. तिच्या गतीतील उद्दामता ठसठशीत करून 'पददलितांचे शोषण करणारी सत्ता' या आशयाचा आविष्कार कवी त्यातून प्रभावीपणे ध्वनित करतो.

**कवितेचा बदलता प्रवास**

बा. सी. मर्ढेकरांच्यापूर्वी आगगाडी आधुनिक काव्यात वेगवेगळ्या रीतीने दाखल झाली असली तरी मर्ढेकरांच्या काव्यात तिला वेगळे महत्त्व प्राप्त झाले. मर्ढेकरांच्या 'काही कविता' (१९४७) या काव्यसंग्रहात 'सांस्कृतिक जीवनाची नस' या नात्याने आगगाडी अनुभवाचा घटक होऊन आली. त्यांची 'फलाटदादा' शी संवाद साधणारी कविता येथे आठवते. मराठी कवितेत फलाट हा स्वतंत्रपणे कवीच्या भावजीवनात स्थान मिळवू शकतो; ही घटनाच एक प्रकारे कवितेने सांधा बदलल्याची खूण म्हणून सांगता येईल.

इ. स. १९४७ पर्यंत रेल्वे जणू महानगराच्या रक्तवाहिन्या ठरू लागली होती. तिची स्पंदने मर्ढेकरांच्या काव्यात उमटली. 'फलाटदादा' मधील भाषा इंग्रजी-मराठी-मऱ्हाटी अशा संमिश्र शैलीतील असून मुंबईच्या गर्दीची ती 'बोलीभाषा' आहे. त्यात आगगाड्यांच्या अनेक प्रकारांचे वर्णनही येऊन जाते. इंजनवाली, विलेक्ट्रिकची, लांब पल्ल्याची, लोकल, मालगाडी इत्यादींचा निर्देश त्यात येतो. (जाता जाता येथे नोंदवावेसे वाटते की इतक्या वर्षांनंतर यांत एकाच वेगळ्या प्रकाराची भर पडली आहे, ती म्हणजे डबलडेकरची !)

मर्ढेकरांनी यात मिस्किल सुरात प्लॅटफॉर्मचे दृश्यरूपात चित्रण केले आहे. यात नाट्य

आहे, गतिमानता आहे. पथहा ती आगगाडीची वाट पाहणारा प्रियकर आहे, पददलित हा आहे ('किती बुटांच्या ठांकरटांचा फलाटदादा, गेलां पचवुन !') पण केवळ तेवढाच नाही. त्याला बोलके करताना कविमनाला त्याच्याजवळ असलेल्या अनुभवभांडाराविषयी कुतूहल आहे. निर्जीव फलाटावर गोंदले गेलेले ठसे, कवी सहानुभावाने वाचू इच्छित आहे; हे महत्त्वाचे वेगळेपण आहे.

पुढे मर्ढेकरांच्या 'आणखी काही कविता' (१९५१) मधील एका कवितेत 'दहा दहाची लोकल गाडी' पोकळ श्वास सोडत येते. तिच्याशी निगडित अशा वास्तवाचे रूप म्हणून येतो तो 'मुंग्यांचा लोंढा !' मग त्या मुंग्या नसून माणसे असल्याची कवी आठवण करून देतो आणि जगण्याचा पाढा चुकल्याची खंत नोंदवितो. माणसाचे हळूहळू यंत्रात रूपांतर होऊन जगणे निःसत्त्व झाल्याचा कडवट अनुभव मर्ढेकर येथे प्रत्ययकारी शब्दांत देतात. त्यासाठी मुंबईच्या महानगरी अस्तित्वाचा कणा ठरलेली लोकल, त्या जगण्यावर भाष्य करण्यासाठी काव्यात अवतीर्ण होते. यंत्रयुगातले 'मुंबई' हे नवे तीर्थक्षेत्र जणू रोज 'यात्रे' करूंना तेथे येणे भाग पाडते. (कशासाठी ? पोटासाठी !) अशा अटळ यांत्रिक गतीत बांधले जाऊन जगण्याची स्वयंस्फूर्त लय हरवली गेल्याची वेदना मर्ढेकरांच्या कवितेत व्यक्त होते.

मर्ढेकरांच्या प्रतिमासृष्टीतच आगगाडीशी निगडित संदर्भ खोलवर सामावले गेले आहेत. त्यांच्या काव्यातील संज्ञाप्रवाही शैलीसाठी इंजिनावीण घरंगळणाऱ्या गाडीची त्यांनी योजलेली प्रतिमा येथे आठवते.

### गतीचा सौंदर्यानुभव

रेल्वेच्या गतीशी मनाची गती जुळली तर एखादे सौंदर्यप्रेमी मन यंत्राच्या साहाय्याने आलेला अनुभवदेखील कसा सौंदर्याच्या अंगाने टिपू शकते; हे इंदिरा संतांच्या 'आगगाडीतील खिडकीपाशी' ('शेला,' १९५१) या कवितेत जाणवते. कवयित्रीचे स्वप्नाळू मन भोवतालच्या दरक्षणी बदलत्या चित्रातील सौंदर्याचा साक्षात अनुभव त्यात घेत राहते.

### 'दख्खनची राणी'

इंदिरा संतांचे कविमन खिडकीबाहेर धावते, तर वसंत बापटांची 'दख्खनची राणी' ही कविता ('बिजली', १९५२) गाडीच्या पोटातल्या वास्तवाचा छेद घेण्याचा प्रयत्न करते. ही गाडीदेखील साधीसुधी नव्हे; तर दख्खनची राणी ! त्यामुळे तिच्या साम्राज्यातील उच्च-मध्यमवर्गीय प्रवाशांच्या संस्कृतीचे दर्शन कवितेत उपरोधिक शैलीतून घडते. 'रेशमी वसने', 'तुंदिलतनु' इत्यादी तपशिलांतून या प्रवाशांचा सुखवस्तूपणा कळतो. (आज सांस्कृतिकदृष्ट्या झालेला बदल नोंदवायचा तर दख्खनच्या राणीचा त्या वेळचा 'तोरा' आता उरला नाही, कारण एकतर सुखसोयीयुक्त अतिवेगवान गाड्यांची संख्या वाढली

आणि दुसरे म्हणजे सामाजिक स्तर झपाट्याने बदलल्यामुळे कालच मध्यमवर्गीय आज उच्चमध्यमवर्गीय होऊ शकले.)

**प्रवास : भौतिकातून परलोकात**

रेल्वेशी निगडित अनुभवाचा आणखी एक पैलू म्हणजे तिच्यामुळे दिशा आणि काल यांच्या बदलाचा प्रचंड प्रमाणात येणारा अनुभव होय. सदानंद रेगे यांच्या 'स्टेशन' या कवितेत त्यांनी स्मशानासारख्या निर्विकल्प असलेल्या स्टेशनवर आलेला हा अनुभव व्यक्त केला आहे. काहीशा संज्ञाप्रवाहीशैलीत लिहिलेल्या या कवितेत प्रवास एकदम परलोकाशी जाऊन भिडतो. उदा. 'रूळ फक्त अंथरलेले, आरपार आकाशांतून...पलीकडे..., ढगांची मालगाडी, 'नॉट टू बी, लूज शंटेड..' येथे 'नॉट टू बी लूज शंटेड' ही मालगाडीच्या डब्यांवर, अनेकदा दिसणारी ओळ कवीच्या भौतिक पातळीवरच्या प्रवासातून सांधा बदलून पलीकडे जाऊ इच्छिणाऱ्या मनाला एक प्रकारे धोक्याची सूचना देते आणि त्याच वेळी कविता अर्थदृष्ट्या संघटितही करते. विशिष्ट मनःस्थितीतच जाणवावे, असे हे एक स्टेशनचे रूप होय.

**सौंदर्यजाणिवेला तडा**

गुरुनाथ धुरी यांची 'रेल्वेच्या गवताळ आकाशात' ('ग्लोरिया', १९७६) ही १९६६ साली लिहिलेली कविता यांत्रिक गतीमुळे नादसंवेदनेला जाणवणारा काच प्रत्ययकारी शब्दांत व्यक्त करते. प्रचंड वेगाने जाणाऱ्या गाडीतून दिसणाऱ्या दृश्यांचा तुटकपणा, त्यामुळे एकसंध अशा सौंदर्यजाणिवेला बसणारा तडा; हा अनुभव तेथे 'आ वासलेला बोगदा', 'चांदणीच्या गीताला टक्कर देणारी किंकाळी', 'सर्वसाक्षी नजरेने वटारून पाहणारा गाडीचा तांबडा डोळा' इत्यादी प्रतिमांतून वाचकांपर्यंत पोहोचतो.

**रेल्वेकामगारांचे अनुभव**

नारायण सुर्वे यांच्या 'माझे विद्यापीठ' (१९६६) या संग्रहातील त्याच शीर्षकाच्या कवितेत भराभर रेलच्या वाघिणी भरणारा आणि डोळ्यांत विद्रोहाचे पाणी पेटलेला आफ्रिकी चाचा थोडक्या शब्दांत नेमका उभा राहतो. सुर्व्यांच्या कवितेत कामगारांच्या चित्रणांतून रेल्वेचे अंतरंग वेगळ्या प्रकारे उकलले जाते.

त्यांची 'पोर्टरची स्वगते' ही कविताही अशीच लक्षात राहते. वेडा समजला जाणारा हा पोर्टर चिमणीचे घरटं उद्ध्वस्त होऊ नये म्हणून रुळाजवळचे वाळके गवत तिला देतो आणि क्लोकरूममध्ये कुजलेल्या माणसाची पेटीही उघडतो. जन्ममृत्यूच्या टोकांतले हे विश्वरूपदर्शन फलाटाच्या काठावर उभे राहून घेणारा हा पोर्टर कवितेत शेवटी 'आपल्यातला कबीर हसतो आपल्याला' असे उद्गार यथार्थपणे काढतो.

या कवितेत रेल्वेच्या कारभारावर-त्यातील राजकारणावर जाता जाता उपरोधिक भाष्यही येते. उदा.

*'नाइन्टीन डाऊन राईट टाईम आज.*
*असंल एखादा मिनिस्टर आत.'*

**फलाट : दुष्काळग्रस्तांचे निवासस्थान**

स्टेशनशी निगडित वास्तवाचे एक वेगळे रूप 'छावणी हलते आहे' (१९७७) या अर्जुन डांगळे यांच्या संग्रहातील 'कविता' मध्ये साकारते. यंत्रामुळे सुरू झालेल्या औद्योगीकरणाच्या प्रक्रियेमुळे शहर आणि खेडी यांच्यांत एक प्रकारची दरी निर्माण झाली. खेडी ओस पडून 'जगायसाठी' शहराकडे धावणाऱ्या माणसांचे लोंढे वाढू लागले. त्यांचे मुक्कामस्थळही स्टेशनच ! डांगळे यांच्या कवितेत फलाटाशी निगडित असलेला हा संदर्भ मुख्य ठरतो. त्यामुळे फलाटावर सांडलेला दुष्काळग्रस्तांचा प्रचंड तांडा पाहताना कवीला इंडिया आणि भारत यांच्यातील विषमतेचा अनुभव तीव्रतेने येतो.

**'लोकलमधील चणेवाला'**

रेल्वेशी निगडित अनुभवविश्वात रेल्वेतील फेरीवाल्यांचे आयुष्यही मिसळून गेले आहे. यंत्रयुगामुळे ढळलेल्या सामाजिक संतुलनाची परिणती म्हणजे बेकारी. या बेकारीमुळे वेगवेगळा माल सतत विकायला येणारे असंख्य फेरीवाले– हे रेल्वेतील एक चिरपरिचित दृश्य. वाढती महागाई आणि गरिबी यांमुळे प्रवाशांच्या गर्दीत धक्के देत आणि घेत गुजराण करणारे हे फेरीवालेही कवितेत स्थान मिळवतात. द. भा. धामणस्कर यांचे संवेदनाक्षम कविमन एखाद्या फेरीवाल्याचे जगणेही किती सहृदयतेने जाणून घेऊ शकते; याचा अनुभव 'लोकलमधील चणेवाला' या कवितेत येतो.

*'पाय अनवाणी, पोरके असले की'*

......

*'आपल्यालाच, आपल्यापुढे*
*विस्तवाचे मडके धरून*
*चणे विकत नेता येते...'* [३]

या त्यांच्या ओळी मनाचा ठाव घेतात. येथे 'विस्तव असलेले मडके' जे रिवाजानुसार मृत्यूशी निगडित असते ते एखाद्याच्या जगण्याच्या प्रवासात अखंड सोबत ठरते– या विरोधातील कारुण्य नेमकेपणे अधोरेखित होते.

**ताटातुटीचा अनुभव**

कवीच्या व्यक्तिगत अनुभवातून झालेले स्टेशनचे दर्शन वसंत आबाजी डहाके यांच्या

'शून्य स्टेशन' ('शुभवर्तमान', १९८७) या कवितेत घडते. प्रियजनांचे दुरावणे, हा स्टेशनशी निगडित असलेला संदर्भ येथे विशेषत्वाने जागा होतो. गाडीतून तिचे जाणे, हे कवीच्या लेखी लचका तोडून जाण्यासारखे असते. अशा मनःस्थितीतील उद्‌ध्वस्तता, असंबद्धता या छटा कवी संयमाने भावपूर्णरीत्या रेखाटतो. यातील 'अचल महाकाय कासवा' सारखी थांबलेली गाडी आणि हलल्यावर 'निरोपाचे शेकडो हात फुटलेली गाडी' या प्रतिमांना हृदयात्मकतेचे सामर्थ्य मोठ्या प्रमाणावर आहे.

**'रेल्वे : काही टिपणे'**

अरुण म्हात्रे यांची 'रेल्वेः काही टिपणे' ही कविताही उल्लेखनीय आहे. मर्ढेकरांच्या कवितेत 'दहा दहा' ची गाडी होती. म्हणजे एक प्रकारे मिनिटांमधील दशकाचे पूर्ण आवर्तन होते. पण त्यानंतर वाढलेली जगण्याची प्रचंड गती आणि त्यामुळे बदललेली भाषा म्हात्र्यांच्या कवितेत आहे. उदा. येथे गाडी 'नऊ तीन', 'सहा सतरा' अशीही आहे. कवीने समूहाशी मनाने समरस होऊन अनुभव सादर केला आहे. अनिश्चित भवितव्यात स्वतःला झोकून देऊन जगणाऱ्या रेल्वेउतारूंचे चित्रण 'आपण सिग्नलच्या खांबांवर आपले भविष्य लटकावून प्लॅटफॉर्मवर उभे' अशा शब्दांतून साकारले आहे. येथेही मुंबईची बोलीभाषा येते. त्यामुळे धुराला 'गुडमॉर्निंग' करणे अपरिहार्य ठरते. सकाळपासून वाट्याला येणारे विपरीत वास्तव पचवायची ताकद त्या गुडमॉर्निंगमधे आहे. गर्दीचे वास्तव चित्रण करताना कवी लिहितो.

'हा निघाला घामाचा एक थेंब
......
बहुधा चाक चालते त्याच इंधनावर. परंपरागत'

येथे वापरलेला विपरीत तर्क लक्षणीय आहे. जणू वाट्याला आलेले वास्तव खिल्ली उडवत स्वीकारण्याची वृत्ती त्यामागे आहे. या कवितेत प्रवाशांची कपाळे 'लालगर्द' अशी आहेत. कारण कोणत्याही क्षणी अपघाताची शक्यता आहे. परिस्थितीनुरूप स्वतःला वाकवत जगण्याची धडपड करणाऱ्या या परम सोशिक अशा सहप्रवाशांच्या जगण्यातील कारुण्य यातील उपहासगर्भ शैलीतूनही जाणवते. उदा.

*'चला जागा मिळाली एकदाची*
*आता हळूहळू आपले पाय शोधावे*
*ह्या पायांच्या गांडूळगर्दीत*
*नंतर शोधू आपले श्वासही'*

**यंत्र : स्वीकार, सत्कार**

मानवी संस्कृतीवर यंत्राचे आक्रमण होईल अशी भीती मनात असली, तरी मराठी कविता यंत्राचे स्वागत करतानाही दिसते. यंत्रयुगामुळे आलेल्या रूटिनतेचा विदारक

अनुभव काव्यातून देणारे मर्ढेकर अचेतनाचा कोवळा वास हुंगण्याइतके संवेदनाक्षमही होते. त्यामुळे त्यांनी हर्षभरित होऊन यंत्राचे स्वागतही केले आहे. 'काही कविता' मध्ये वेगाने फिरणाऱ्या चक्रांच्या अद्‌भुत सौंदर्याचे वर्णन करताना ते लिहितात:

*'यंत्रमुग्ध अन् होउनि लावा*
*महालात या धूप नि समया !'*

विंदा करंदीकरही आपल्या १९६९ साली लिहिलेल्या 'यंत्रावतार' ('संहिता', १९७५) या कवितेत यंत्राकडे परमेश्वराचा अकरावा अवतार म्हणून पाहतात व समूहाच्या प्रगतीची स्वप्ने त्याच्याशी जोडून त्याचा सत्कार करू इच्छितात.

आज यंत्राचा प्रवास यंत्रमानवापर्यंत जाऊन ठेपला आहे. एकविसाव्या शतकाकडे वळण्यापूर्वी विसाव्या शतकातील यांत्रिक प्रगतीचे एक महत्त्वपूर्ण अपत्य–रेल्वे–कवितेत कसे ठसा उमटवून आहे, याचा काही निवडक कवितांच्या आधारे शोध घेण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखात आहे.

एकंदरीत मराठी कवितेत रेल्वे रुळली आहे. अगदी बालगीतांमधेही तिला आवर्जून स्थान असते. प्रवासाच्या नुसत्या कल्पनेनेच खूष होणाऱ्या मुलांना त्यांच्या 'मामाच्या गावाला' नेणारी गाडी आवडणे साहजिकच आहे. वि.म. कुलकर्णी यांची 'गाडी आली, गाडी आली, झुक झुक झुक' सारखी कविता, त्यातील नादानुकारी शब्दांच्या चपखल योजनेमुळे कित्येक वर्षे लहान मुलांच्या ओठांवर खेळते आहे.

रेल्वेशी निगडित अनेक अनुभव कवितांमध्ये आले आहेत, हे खरे, तरीही तिच्याशी निगडित समूहमनाचे कित्येक कंगोरे अजूनही व्यक्त व्हायचे आहेत. समूहमनाचे कधी स्वार्थी, हिंस्र तर कधी सश्रद्ध अशा वेगवेगळ्या रूपांत घडणारे दर्शन, कंटाळवाण्या प्रवासातही खेळकरपणे आनंद शोधण्याची धडपड असे काही कंगोरे आठवतील. तसेच, प्रवासाच्या अनुभवात गर्दीमुळे होणारी सामाजिक स्तरांची घुसळण, छोट्या गतिमान बंदिस्त अवकाशात घडणारे अनंतरूपी जीवनदर्शन अशा अनुभवछटा अनेकांगांनी व्यक्त होण्यास वाव आहे.

**संदर्भसूची**


१. सदानंद रेगे, 'स्टेशन', 'देवापुढचा दिवा', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९६५, पृ. २४.
२. नारायण सुर्वे, 'पोर्टरची स्वगते', "सनद", ग्रंथाली, कुर्ला, १९८२, पृ. ८२.
३. द. भा. धामणस्कर, 'लोकलमधील चणेवाला', "प्राक्तनाचे संदर्भ", मौज प्रकाशन, १९८२, पृ. १०२.
४. अरुण म्हात्रे, 'रेल्वेः काही टिपणे', "अनुष्टुभ", जानेवारी. फेब्रुवारी. १९८९.
५. बा.सी. मर्ढेकर, "मर्ढेकरांची कविता", मौज प्रकाशन, मुंबई, पुनर्मुद्रण, १९६९, पृ. ७५.


(६/७०, लोकमान्यनगर, नवी पेठ, पुणे ४११०३०)












श्री. पु. गोखले

# सावरकरांच्या समाजकारणाची मूलगामी मीमांसा

'सावरकरांचे समाजकारण- सत्य व विपर्यास' हे प्रा. शेषराव मोरे यांचे दुसरे पुस्तक. साधारण पाच वर्षांपूर्वी 'सावरकरांचा बुद्धिवाद- एक चिकित्सक अभ्यास' हा त्यांचा अभ्यासपूर्ण ग्रंथ प्रसिद्ध झाला. वीर सावरकरांची संपूर्ण विचारसरणी अद्ययावत बुद्धिप्रामाण्यावरच आधारलेली कशी आहे, ते हिंदुत्व आणि हिंदुराष्ट्राचा आग्रह धरीत असले तरी त्यांच्या कल्पनेत धर्माला फारसे स्थानच नाही, ते विचार विज्ञानाच्या कसोटीवर घासून पाहिले पाहिजेत इत्यादी प्रमेये प्रा. मोरे यांनी सखोल अभ्यास करून सविस्तर उदाहरणे देत मांडली. सावरकरांचा कठोर बुद्धिवाद समजावून देण्याचे महत्त्वाचे कार्य प्रा. शेषराव मोरे यांनी त्यांच्या पहिल्या ग्रंथात समर्थपणे केले. आपल्याला विचारवंतांचा जो उत्तम प्रतिसाद लाभला त्या यशाच्या आणि आनंदाच्या पार्श्वभूमीवर आपण दोन ग्रंथांचा संकल्प पूर्ण करीत आहो असे त्यांनी प्रास्ताविकातच नमूद केले आहे.

सावरकरांच्या सामाजिक विचारांचा मागोवा घेण्यासाठी लिहिलेल्या या सातशे पृष्ठांच्या ग्रंथाचे त्यांनी पुढीलप्रमाणे तीन भाग केलेले आहेत : सावरकरांच्या ध्येय-सृष्टीतील समाज, सामाजिक धोरण आणि प्रत्यक्ष सामाजिक कार्य.

**अखेर मानवराज्याचे ध्येय**

सावरकर हिंदुराष्ट्राचा उद्घोष करीत असले, तरी ते मानवराज्याची भूमिका घेत. 'पृथ्वी हाच आपला देश आणि मानव्य हाच आपला धर्म' ही ध्येय म्हणून त्यांची भूमिका होती. पृथ्वी हीच आमची खरी मातृभू आहे. मानव जात आमचे राष्ट्र आहे आणि समान अधिकार, समान कर्तव्ये यांच्यावर अधिष्ठित असलेले अखिल मानवी सरकार हेच आमचे अंतिम साध्य असले पाहिजे, असे उद्गार त्यांनी आत्मार्पण करण्यापूर्वी चारच महिने एका मासिकाला दिलेल्या मुलाखतीत काढले होते. अशी उदात्त भूमिका घेणारे सावरकर, एका दृष्टीने वरवर संकुचित वाटणाऱ्या 'हिंदुराष्ट्राचा' आग्रह का धरीत याचा प्रा. मोरे यांनी शोध घेतला आहे. व्यावहारिक पातळीवरील ध्येय आणि आदर्शाच्या पातळीवरील ध्येय असे सावरकर आपल्या ध्येयाचे दोन टप्पे पाडतात. असे असले तरी सांप्रतकालीन गरज म्हणून हिंदुराष्ट्रवादाचा त्यांनी स्वीकार केला होता. सावरकरांनी आपली सारी शक्ती या राष्ट्रवादामागे उभी करून त्यासाठीच आपले जीवन वाहिले. मानवराज्याचे ध्येय

वास्तवापासून फारच दूर असल्यामुळे त्यांच्या वाणीचा, लेखणीचा आणि कृतीचा केंद्रबिंदू राष्ट्रवाद झाला. वीर सावरकर प्रत्यक्ष आचरणात राष्ट्रवादाशी एकरूप झाले. इतर पुढाऱ्यांच्या ध्येयधोरणाचा विचार केला तरी प्रत्यक्षात राष्ट्रवादाला मोडीत काढून मानवतावादाचा प्रत्यक्ष पुरस्कार कोणीही केल्याचे दृष्टोत्पत्तीस येत नाही.

हिंदुसंघटन आणि हिंदुराष्ट्र या शब्दांमुळे सावरकरांच्या विचारसरणीकडे पूर्वग्रहदूषित दृष्टीतून पाहण्यात येई. त्यांना जातीय म्हणून हिणवून अन्यपक्षीय पुढारी मोकळे होत. खोलात शिरून त्यांच्या विवेचनाचा विचार करण्याचे टाळीत. राजकीय जीवनाच्या प्रारंभापासूनच सावरकरांनी विशुद्ध 'हिंदीराज्य हे राजकीय साध्य दृष्टीपुढे ठेवलेले होते. हिंदू आणि मुसलमान असा भेदाभेद न करता सर्वांना सारखे लेखणारीच सावरकरांची राष्ट्रीयत्वाची धर्मनिरपेक्ष व्याख्या होती. ते म्हणतात की भौगोलिक राष्ट्रीयतेच्या साच्यात भारतवर्षाला ओतणे हेच त्यांच्या राजकीय पक्षाचे ध्येय आहे. आमच्या भारतीय पार्लमेंटमधे पाय ठेवताच हिंदू, मुसलमान वा पारशी अशा भेदांचा मागमूसही राहणार नाही. सारे 'भारतीय' या नावाने संबोधले जातील. दरडोई एक मत असेल आणि सार्वजनिक क्षेत्रात लायकी व योग्यतेनुसार चाकरी मिळेल. अशा प्रकाराची सर्वांना समान हक्क देणारी राष्ट्रीयत्वाची भूमिका सावरकर सातत्याने मांडीत होते. तरी त्यांच्या प्रतिपादनाकडे दुर्लक्ष करून त्यांना 'जातीय' म्हणून संबोधण्यात येत होते. इतकेच नव्हे, तर हिंदुराष्ट्रात अहिंदूंना दुय्यम नागरिकत्व मिळेल असे निराधार आरोप करण्यात येत होते. (आणि आजही तेच आरोप चालू असलेले आपण पाहतो !) सावरकरांच्या प्रतिपादनातील सत्य आणि त्याचा करण्यात येणारा विपर्यास लेखकाने ठिकठिकाणी अनेक उदाहरणे देऊन स्पष्ट केला आहे.

**समाजाचा पाया विज्ञान**

समाजाचा पाया विज्ञान; धर्मशास्त्र नव्हे या सावरकरांच्या विचारांची पहिल्या भागात चर्चा करण्यात आलेली आहे. अध्यात्म, धर्मांतर आणि बुद्धधर्माविषयीचे त्यांचे प्रतिपादन करीत त्यांनी सावरकरांची समाजसुधारणेची (किंबहुना त्यांची एकूण वैचारिक बैठक) चळवळ अनेक विचारवंत समजतात तशी केवळ हिंदुत्वाच्या चौकटीत सीमित नाही असे प्रा. मोरे यांचे मत आहे. विवेकानंदी हिंदुत्व परंपरा, अरविंदांचे हिंदुत्व, गोळवलकर गुरुजींचे हिंदुत्व, राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या प्रचारकांचे हिंदुत्व, सावरकरांच्या अनुयायांचे हिंदुत्व आणि विरोधकांनी केलेला विपर्यास यासंबंधात प्रा. मोरे यांनी केलेले मार्मिक विवेचन मुळातूनच वाचण्यासारखे आहे. थोडक्यात सांगावयाचे तर हिंदूंतील एकत्वासाठी आणि त्यांच्या न्याय्य हितरक्षणासाठी हिंदुत्व आणि आजचे सांप्रतचे प्रश्न सोडविण्यासाठी विज्ञान-निष्ठा व उपयुक्ततावाद अशी लेखकाने सावरकरांच्या विचारसरणीची विभागणी केलेली आहे.

सावरकरांविषयी जे गैरसमज आहेत त्यांत मुसलमान आणि बौद्ध धर्माविषयीच्या मतांचाही लेखकाने खोलात जाऊन परामर्श घेतलेला आहे.

हिंदुत्वावर आणि हिंदुसंघटनेवर भर देत असले, तरी सावरकरांनी मुसलमानांच्या प्रबोधनाचे जे मौलिक विचार मांडले आहेत तेही परस्परपूरकच आहेत हे फारसे ध्यानातच घेण्यात येत नाही. 'बुद्धिनिष्ठ विज्ञानवादी सुधारक' असे स्वतःला मानणारे सावरकर स्पष्टपणे लिहितात की, सर्व प्रकारचे धार्मिक भाबडेपण नि लुच्चेगिरी- मग ती वैदिक, बायबली, कुराणीय किंवा पुराणीय असो- तिच्या कचाट्यातून सोडवून मानवी बुद्धीस मुक्त करणे हेच पवित्र धर्मकृत्य होय. यातच मानव्याचे, अवघ्या मनुष्यजातीचे कल्याण आहे. ते म्हणतात की विज्ञाननिष्ठ बनण्यात मुसलमानांचेच हित आहे. हिंदू आणि मुसलमान एकाच समाजाचे घटक असल्याने प्रत्येक घटक विज्ञाननिष्ठ बनला पाहिजे. मुसलमान विज्ञाननिष्ठ बनून पोथीनिष्ठा सोडतील तर ते एकराष्ट्रीयत्वाच्या दृष्टीने अतिशय उपकारक ठरेल असा उपदेश करून परखडपणे सावरकर इशारा देतात की, एका जुनाट मागासलेल्या संस्कृतीलाच घट्ट बांधून घेऊन कालाच्या मार्गात आडवे पडाल तर विज्ञानाच्या टाचेखाली निःशंक चिरडून जाल ! हा इशारा खऱ्या बुद्धिवादी सुधारकाला शोभण्यासारखाच असून ते बिरूद धारण करण्याचा अग्रमान (डॉ. आंबेडकरांचा अपवाद वगळता) वीर सावरकरांकडे जातो, हे प्रा. मोरे यांनी व्यक्त केलेले मत मान्य होण्यासारखेच आहे.

सावरकरांनी बुद्धावर टीकास्त्र सोडले हाही गैरसमजच आहे. एखाद्या भक्तासारखा त्यांनी बुद्धाचा आणि त्यांच्या उदात्त तत्त्वांचा मुक्त कंठाने गौरव केलेला आहे. बुद्ध मुख्यतः आदर्शांचा विचार करतात आणि सावरकर मुख्यतः व्यवहाराचा विचार करतात. त्यामुळे आग्रहाचा अनुक्रम बदलणे साहजिक आहे. बुद्धाच्या अनेक तत्त्वांचा त्यांनी आग्रहाने पुरस्कार केलेला आहे. काही तत्त्वांना सहमती दाखविली आहे, तर काही तत्त्वे आदर्श म्हणून आणि काही अप्रत्यक्षपणे मान्य केली आहेत. तसेच 'धर्मांतर हेच राष्ट्रांतर' हा सिद्धांत सावरकरांनी बौद्धधर्मांतराला कधीही लावला नाही, हेही लक्षात ठवले पाहिजे. बौद्धधर्मविषयातही सत्य दूर राहून अपसमज कसा पसरलेला आहे, हेही या ग्रंथात अभ्यासपूर्ण रीतीने विवेचिलेले आहे.

तसे पाहिले तर सावरकरांची सामाजिक सुधारणांविषयक मते सर्वांना ठाऊकच आहेत. हिंदुसमाजाला सप्तश्रृंखलांनी जखडल्यामुळे आपल्या समाजाची किती अपिरिमित हानी झाली, आपली कशी पीछेहाट झाली, आपल्या धर्मभोळ्या समजुती, आचारविचारही पर्यायाने गुलामगिरीला कसे कारणीभूत झाले, गायीला माता समजणाऱ्या भावड्या कल्पनांपासून ते इतर भोळसट आचारांवर त्यांनी कसे घणाघाती प्रहार केले हे खरे पाहिले तर पुन्हा सांगण्याची गरज नाही. जन्मजात जातिभेदाचे उच्चाटन करण्यासाठी त्यांनी प्रत्यक्ष जे कार्य केले त्याबद्दल अनेकांनी प्रशंसा केली होती. तरी या कर्त्या सुधारकावर बरेच निराधार व विकृत आरोप

करण्यात आलेले आहेत. त्याची अनेक उदाहरणे व त्या त्या लेखकांचे उतारे प्रा. मोरे यांनी या ग्रंथात दिले आहेत. विरोधकांच्या विकृत, संदर्भहीन, निराधार, खोट्या आरोपांची, टीकांची उदाहरणे येथे देण्याचा मोह लेखाच्या मर्यादेमुळे आवरणे भाग आहे.

### सामाजिक व राजकीय- राष्ट्रगाड्याची दोन चाके

सावरकरांच्या सामाजिक धोरणाचा ऊहापोह लेखकाने दुसऱ्या भागात केला आहे. आधी सामाजिक सुधारणा का राजकीय सुधारणा आधी, या त्या काळी चाललेल्या वादाबद्दल सावरकरांचे मत विचारात घेतले म्हणजे त्यांच्यावर करण्यात आलेल्या अनेक आरोपांना परस्पर उत्तर मिळते. ते म्हणतात की, राजकीय आणि सामाजिक सुधारणा ही राष्ट्राच्या गाड्याची दोन चाके आहेत. यांतील कोणतीही सुधारणा मागे ठेवणे योग्य नाही. या दोन चाकांवर भारत देश पुढे न्यावयाचा आहे... कोणतेही चाक मागे राहून चालणार नाही... सामाजिक सुधारणा झाल्यावाचून स्वराज्य मिळाले, तर तीन दिवससुद्धा टिकणार नाही. पेशवाईच्या वेळी काय झाले ते पहा.

### सामाजिक धोरणाची सूत्रे

सावरकरांच्या सामाजिक धोरणाची सूत्रेही पुरेशी सूचक आणि त्यांच्या कार्यपद्धतीवर प्रकाश टाकणारी आहेत. सुधारणा म्हणजे अल्पमत आणि रूढी म्हणजे बहुमत! दुसऱ्या सूत्रात त्यांनी सुधारकांची वेगळी जात नको असे सांगितले आहे. धर्मग्रंथांना इतिहासग्रंथ आणि धर्मशास्त्रकारांना इतिहासपुरुष मानावे. ते आदरणीय, वंदनीय, पूजनीय असले तरी ते आचरणीय आणि अनुकरणीय नसल्यामुळे त्यातील व्यक्तींचा आणि त्यांच्या विचारांचा सादर निषेध करावा हे सावरकरी विशेष दर्शविणारे सूत्र आहे. आज प्रचारात आलेल्या रूढी, प्रथा, परंपरा आणि सामाजिक संस्था ज्या वेळी स्थापन झाल्या तेव्हा त्या गरज आणि सुधारणा होत्या, या प्रतिपादनामुळे त्यांच्यावर टीकेचा भडिमार झाला. सावरकरांनी सनातनी समाजाचे प्रबोधन करण्याच्या उद्दिष्टाने 'आजच्या रूढी, मुळात सुधारणा' ही भूमिका स्वीकारली. ती त्या दृष्टीने समजावून घेतली पाहिजे असे लेखकाने मांडले आहे. आपल्या समाजात असलेल्या अस्पृश्यता, जातिभेद आणि सामाजिक विषमता यांना जबाबदार कोणता एकच वर्ग जबाबदार नाही. ब्राह्मणांपासून ते अस्पृश्यांसकट सर्वच हिंदू कमीअधिक प्रमाणात जबाबदार आहेत. त्यामुळे त्यांचे पाप सर्वांच्या माथ्यावर असून त्यांचे निर्मूलन करण्याचे दायित्वही सर्वांचेच आहे. म्हणून ते सूत्रात्मक भाषेत मांडतात की, 'पाप सर्वांचे; उत्तरदायित्व सर्वांचे!' चातुर्वर्ण्य, जातिभेद, अस्पृश्यता नष्ट करण्यासाठी समाजाला कसे प्रवृत्त करावे आणि या सुधारणांची आवश्यकता पटवून त्यासाठी जनमत कसे तयार करावे यासंबंधातील धोरण सावरकरांनी व्याख्यानांतून आणि लिखाणांतून स्पष्टपणे वेळोवेळी

व्यक्त केलेले आहे. ते सूत्र आहे- सुधारणेचा हेतू : धर्म आणि आपद्धर्म ! माणुसकी किंवा सामाजिक न्यायाला सावरकर धर्म आणि त्यापासून होणाऱ्या लाभालाभाला ते 'आपद्धर्म' असे म्हणतात. या सुधारणांपासून आजच्या परिस्थितीत लाभालाभ काय आहेत हा दुय्यम प्रश्न आहे. लाभालाभाचा प्रश्न आपद्धर्म होय आणि अस्पृश्यतानिवारण हाच मुख्य आणि निरपेक्ष धर्म होय. हे आपले धोरण ते स्पष्ट करतात.

सावरकरांच्यावर याही संबंधात अनेकांनी टीका केलेली आहे. त्या सर्वांचा योग्य तो परामर्श लेखकाने चांगल्या निष्पक्षपणे घेतलेला आहे.

**प्रत्यक्ष सामाजिक कार्य**

स्वा. सावरकर कर्ते सुधारकच नव्हे, तर राजकारणाप्रमाणे सामाजिक विषयातही क्रांतिकारकच होते. त्यामुळे त्यांनी प्रत्यक्ष सामाजिक कार्य कसे केले याचा आढावा लेखकाने तिसऱ्या विभागात सविस्तर रीतीने घेतलेला आहे.

सामाजिक सुधारणा करण्यासाठी सावरकरांना मनःपरिवर्तन, कायदा आणि संघर्ष हे तीन मार्ग पसंत होते. त्यांनी या विषयाचे दोन भाग पाडलेले आहेत : (१) नागरी हक्कांचे विषय, आणि (२) धार्मिक आणि वैयक्तिक गोष्टी.

नागरी हक्कांच्या (मूलभूत हक्क) बाबतीत निर्बंध करून त्यांची कडक अंमलबजावणी केली पाहिजे असे त्यांचे मत होते.

सुधारणांची तात्त्विक चर्चा करीत बसण्यापेक्षा प्रत्यक्ष सुधारणा करून दाखवा असे ते सांगत- 'तत्त्वचर्चा नको, प्रत्यक्ष कार्य हवे' हाच सावरकरांच्या समाजकारणाचा पाया होता. रत्नागिरी जिल्ह्याच्या सीमेत त्यांनी किती आणि कसे भरीव सामाजिक कार्य केले त्याचे अनेक दाखले प्रस्तुत ग्रंथात दिलेले आहेत. त्यांची महाडच्या चवदार तळ्याच्या चळवळीत सत्याग्रहही करण्याची तयारी होती. त्यांना स्थानबद्धतेमुळे सत्याग्रह करता आला नाही, तरी त्या वेळी सावरकर पक्षाच्या तरुणांनी सहभागी होऊन नमुनेदार कार्य केले होते.

सावरकरांनी सुधारणेचे विविध टप्पे पाडून कार्यक्रम आखला आणि त्याप्रमाणे कार्य केले. त्यांनी आता रूढ झालेल्या पंचवार्षिक कार्यक्रमांच्या धर्तीवर वार्षिक, द्विवार्षिक, पंचवार्षिक नियोजन केलेले होते. महारवाड्यात भजने, हळदीकुंकू, शाळेत मुलांना व सभांतून सरमिसळ नमविणे, सार्वत्रिक सत्यनारायण, बँडचे पथक, सहभोजन, पूर्वास्पृश्यांसह घरोघर जाऊन संक्रांतीचा तिळगूळ आणि दसऱ्याचे सोने वाटप, मंदिर प्रवेशाचे आंदोलन (टप्प्याटप्प्याने) गणपती उत्सव आणि मिश्र हिंदुमेळा, भंग्यांचे गायत्रीपठन, अखेर पतितपावन मंदिराची स्थापना इत्यादी त्यांच्या कार्याचे टप्पे नमूद केले म्हणजे 'अकरणात मंदकरणं श्रेयः' या सूत्राची कल्पना येते. रत्नागिरीसारख्या त्या काळी एकाकी पडलेल्या आणि सनातनी मंडळींचा मोठा पगडा असलेल्या क्षेत्रात सावरकरांनी हे

सामाजिक कार्य केले. त्याचे श्रेय आणि कौतुक काही मंडळींनी केलेले असले, तरी त्यांच्या प्रत्येक पावलावर जो टीकास्त्राचा मारा चाललेला होता त्याचाही परामर्ष प्रा. मोरे यांनी तटस्थ वृत्तीने या ग्रंथात घेतलेला आहे.

### अखेरचा आरोप

रत्नागिरीतील स्थानबद्धतेच्या काळात राजकारण करणे अशक्य होते, म्हणूनच सावरकरांनी सामाजिक कार्य केले, राजकारणात प्रवेश मिळताच त्यांनी इकडे दुर्लक्ष केले. या टीकेचा प्रतिवादही या ग्रंथात सविस्तरपणे केलेला आढळतो. विस्मरणात जात चाललेल्या नेत्याची पुनःस्थापना करण्याचा प्रा. मोरे यांनी प्रयत्न केलेला आहे, असा या ग्रंथावर आरोपही करण्यात आला आहे. त्यामुळे हा प्रचंड ग्रंथ सादर करण्यामागे लेखकाचा हेतू कोणता आहे, त्याचा उल्लेख करावा असे वाटते. समाजाची सुधारणा करण्यासाठी ज्यांनी आपले विचार मांडले आणि त्याप्रमाणे कार्य करून दाखविले ते आपल्याला प्रेरक आणि मार्गदर्शक असल्याने त्यांचा अभ्यास करणे आवश्यक आहे. या ग्रंथात निरनिराळ्या कारणांनी फुले-आंबेडकर इत्यादी अनेकांच्या मतांचा आणि कार्याचा अभ्यासपूर्वक उल्लेख केलेला आहे. तो इतका मोठा आहे की, सामाजिक कार्याचा, मतांचा, टीकांचा जणू संदर्भग्रंथच झाला आहे असे वाटते.

हिंदूमुस्लिमसमस्या पुरोगामी म्हणविणारांना कधीही- आतापर्यंत अनेक धक्के खाऊनही- समजली नाही. तसेच सावरकरांचे 'हिंदुत्व' हे धर्मनिरपेक्ष आहे, जडवादी साम्यवादाला सामावून घेणारे आहे, हेही कोणी समजावून घेण्याचा प्रयत्न केला नाही. सावरकर ब्राह्मण आणि हिंदुत्वनिष्ठ आहेत म्हणून त्यांच्या समाजकारणाकडे दुर्लक्ष करणे आपल्या आणि मुसलमान समाजालाही अहितकारक ठरेल, हा प्रा. मोरे यांनी काढलेला निष्कर्ष हे या ग्रंथाचे वैशिष्ट्य आहे.

सावरकरांनी जीवनात कोठल्याही कार्याचा केवळ उपदेश करीत स्वस्थ न बसता तो स्वतः कार्य करीत आचरणात आणून दाखविलेला आहे. त्यांच्या रत्नागिरीतील कार्याचा वृत्तांत हा मुरब्बी शिक्षकाने घेतलेला सुधारणेच्या शाळेतील आदर्श वस्तुपाठ आहे, मार्गदर्शक प्रकल्पच होय असे मत एका विचारवंताने व्यक्त केले आहे. आरामखुर्चीत बसून जगाला उपदेश करणाऱ्या पर्यंक पंडिताचे त्यांच्या लिखाणाला स्वरूप आले आहे असे काहीसे निंदाव्यंजक दुसऱ्या टीकाचे मतही व्यक्त करण्यात आले आहे. सावरकरांच्या यशापयशाची कारणमीमांसा प्रा. मोरे यांनीही केली आहे. परंपरावादाचा आणि सहिष्णुतेचा जबरदस्त पगडा असलेल्या हिंदुसमाजाला प्रखर बुद्धिवाद कळला नाही. दुर्दैव असे की त्यांचे अनुयायी म्हणविणारांनाही तो आचरण करण्याइतका पचला नाही. विरोधकांनीही अनेक स्वार्थापोटी सावरकरांच्या मतप्रतिपादनाचा विपर्यास करण्यात आनंद मानला.

गांधीजींच्या विचारांकडे झुकलेल्या प्रचार माध्यमांनी सावरकरांच्या प्रखर राष्ट्रवादाकडे आणि बुद्धिवादाकडे दुर्लक्ष करीत मात केली असेही म्हणता येईल. परंपरागत समाजाला एखादी अगदी साधी, निरुपद्रवी सुधारणा सुचविली तरी ती आचरली जात नाही. प्रतिवर्षी साजऱ्या होणाऱ्या गुढी पाडव्याचे उदाहरण येथे द्यावे असे वाटते. वर्षप्रतिपदेला जी परंपरागत गुढी उभारण्यात येते त्यात रेशमी वस्त्र (सोवळे) काठीला बांधून तिच्या टोकावर गडू पालथा ठेवलेला असतो. या वर्षारंभाच्या गुढीवर टीकास्त्र सोडीत सावरकरांनी देशाचा ध्वज उभारावा, असा अनेक मार्गांनी प्रचार केलेला अनेकांना आठवत असेल. त्या वेळी हा प्रयत्न काही अंशी सफल झाला तरी पुन्हा घराघरांवर परंपरागत गुढीच दिसते. याचा दोष आपले विचारवंत कोणावर टाकू शकतील ?

थोडक्यात शेवट करायचा तर समाजसुधारणेचे कार्य टीकाकारांना वाटते तितके सोपे नाही. हजारो वर्षांच्या रूढी जायला काही शतके तरी लागणार हे गृहित धरणे भाग आहे. वस्तुस्थिती कशीही असली तरी सुधारक वृत्तीची माणसे काम करीतच राहिली पाहिजेत. अशा सर्व दृष्टींनी पाहिले, तर प्रा. शेषराव मोरे यांचा सावरकरांवरील हा अभ्यासपूर्ण ग्रंथ अत्यंत उपयुक्त ठरेल.

(सावरकरांचे समाजकारण- सत्य आणि विपर्यास : लेखक प्रा. शेषराव मोरे, राजहंस प्रकाशन, पुणे ३० पृष्ठे ७००, मूल्य दोनशे रुपये.)

(कमलश्री ३०, पारिजात सोसायटी, विववेवाडी पुणे ४११ ०३७)

□

**अनंतराव पाटील**

# रसिक मनाचा रंगतदार आविष्कार

श्री. विद्याधर गोखले यांनी 'लोकसत्ता' वृत्तपत्रात तेहतीस वर्षे विविध पदाच्या जबाबदाऱ्या सांभाळल्या आणि १९८४ मध्ये ते प्रमुख संपादक म्हणून निवृत्त झाले. ह्या प्रदीर्घ कालखंडात त्यांनी विविध विषयांवर अग्रलेख लिहिले. राजकारण, समाजकारण, शिक्षण, साहित्य, कला, संस्कृती आदी विषय हाताळताना त्यांचा व्यासंग, बहुश्रुतपणा, परखडपणा, भाषेवरील प्रभुत्व प्रकर्षाने जाणवल्याशिवाय राहत नाही. त्यांचे हे संपादकीय लेखन पाच खंडांत प्रकाशित होणार असून त्यांपैकी पहिला 'अष्टपैलू' हा खंड नुकताच प्रसिद्ध झाला आहे. या खंडात कला-साहित्य-संस्कृतीविषयक अग्रलेख संग्रहित करण्यात आले आहेत. हा खंड वाचताना वाचकाला संगीतसृष्टीत खिळवून ठेवण्याची किमया










गोखले यांनी आपल्या तेजाळलेल्या लेखणीने आणि खानदानी भाषेने केली आहे.

पहिल्या खंडात एकूण ५१ अग्रलेखांचा समावेश केलेला आहे. सुरुवात तुकोबांपासून केली असून शेवट दूरदर्शनच्या दुर्दशेने केला आहे. अग्रलेखाला मार्मिक शीर्षकाची निवड करण्यापासून आतील मजकुराला भारदस्तपणाचा घाट देण्यापर्यंतची विद्याधर गोखले यांची विशिष्ट धाटणी पाहिली की वाटते, एकाच वेळी कवी, संगीत नाटककार आणि पत्रकार म्हणून गाजलेला हा संपादक आगळावेगळा ! उर्दू-संस्कृत-मराठी भाषांवरील त्यांचे प्रभुत्व अग्रलेखात ठायी ठायी दिसून येते. त्याचबरोबर संगीतातील रागदारीबद्दलची त्यांची जाण, अभ्यासही अनुभवायला येतो. एकेक विषय दोन दोन - तीन तीन घटनांच्या संदर्भात त्यांनी समर्थपणे आणि वेगळेपण हाताळला आहे. साहित्य संमेलन, संस्कृत, संगीत, चित्रपट या विषयांवरील गोखले यांचे लिखाण वाचताना माहिती व मनोरंजन यात भर पडतेच, पण त्याचबरोबर मार्गदर्शनही होते. डॉ. घुर्ये, प्रबोधनकार ठाकरे, ग. वि. केतकर, दुर्गाबाई भागवत यांच्यावर गोखले यांनी मोजक्याच शब्दांत लिहिले आहे, पण कायमचे लक्षात राहील अशा भाषेत आणि ढंगात. "केतकरांनी पत्रकारिता हे एक 'सतीचे वाण' मानले होते आणि ते दिव्य म्हणूनच दाहक असणार असे गृहित धरले होते. अंगावर आलेल्या किटाळातून हा तपस्वी पत्रकार सुटला. त्याचे निर्दोषत्व सिद्ध झाले. पण नियतीने आणि नियत नसलेल्या नादान समाजाने सच्च्या विद्वानाचा किती अंत पाहावा ह्याला काही सीमा. अशा या व्रतस्थ पत्रकाराला, त्याच्या त्या ध्येयवादी कणखरपणाला आमचे वंदन असो," अशा शब्दांत केतकरांना आदरांजली वाहिली आहे. प्रबोधनकारांना शेलारमामांची उपमा देऊन म्हटले आहे, 'प्रबोधनकारांसारखा चिरतरुण विरळाच. महाराष्ट्रातील शेकडो 'एकसष्टी' बहाद्दर वृद्धांनी पेन्शनकडे डोळे लावून भकास जिणे जगण्यापेक्षा 'प्रबोधनकर्ता' आदर्श डोळ्यांपुढे ठेवावा. कारण महाराष्ट्राला आज जशी तरुण तानाजीची गरज आहे, तशीच केशवरावांसारख्या शेलारमामांचीदेखील !' डॉ. गोविंद सदाशिव घुर्ये या समाजशास्त्र-विभूषण विद्वानाकडे समाजाचे लक्ष वेधविताना विद्याधर गोखले यांनी लिहिले आहे-

'डॉक्टरसाहेबांनी आजवर २१ बहुमोल ग्रंथ लिहिले आहेत आणि ते सर्वच विद्वानांच्या आदरास पात्र झाले आहेत. या मोहमयी दुनियेतील नानाविध मोहांपासून नि मायेपर्यंत वादविवाद नि संघर्ष यांच्यापासून पूर्णतः अलिप्त राहून शारदेच्या उद्यानाची एवढी भरघोस सेवा क्वचितच कोणी केली असेल ! 'जे जे आपणासी ठावे ते ते शिष्यास शिकवावे' या समर्थांच्या उक्तीनुसार त्यांनी समाजशास्त्राचा अभ्यास करणारे अनेक विद्यार्थी निर्माण केले. महाविद्यालयांना आज बाजारस्वरूप प्राप्त झाले असताना डॉ. घुर्ये यांच्यासारख्या, मुक्तकंठाने विद्यादान करणाऱ्या व्यक्तींची बूज समाजाने आणि विशेषतः त्यांच्या शिष्यवर्गाने राखलीच पाहिजे. एखाद्या सिनेनटीला 'पद्मश्री' करण्यास उतावीळ असलेल्या आमच्या सरकारला डॉ. घुर्ये यांचा 'पद्मभूषण' किताब देऊन गौरव करणे जड

जावे काय ? पण हे असेच चालायचे या जमान्यात !'

संस्कृत भाषेवर डॉ. गोखले यांचे अतिशय प्रेम. संस्कृतच्या महत्त्वाबद्दल लिहिताना 'मुस्लिमांची संस्कृत मुहब्बत' या अग्रलेखात त्यांनी म्हटले आहे की, कोणे एकेकाळी जन्मजात चातुर्वर्ण्याच्या कर्मठ कल्पनांनी बहुजनांना संस्कृतपासून दूर ठेवले, तर आता बहुजनांच्या हिताचा ठेका घेतलेल्या अर्धकच्च्या विद्वानांनी जणू संस्कृतलाच समाजापासून दूर फेकण्याचा चंग बांधलेला दिसतो. संस्कृत ही काही मूठभर उच्चवर्णियांची मातृभाषा नव्हे. बहुसंख्य भाषांचा मूलस्रोत संस्कृत आहे. उर्दू ही जशी केवळ मुस्लिमांची भाषा नव्हे तशी संस्कृतही केवळ हिंदूंची भाषा नव्हे, गुलाम दस्तगीर बिराजदार हे मुस्लिम शिक्षक संस्कृत प्रेमाबद्दल सुपरिचित असून त्यांनी 'मुस्लिमानां संस्कृताभ्यास' नामक एक उद्‌बोधक पुस्तक लिहिले आहे. लग्नपत्रिकाही संस्कृत भाषेत छापली आहे. ते संस्कृतमध्ये उत्तम लिहितात आणि बोलतातही. त्यांनी राष्ट्रीय एकात्मतेचे जेवढे कार्य केले आहे, 'सेक्युलर' वृत्तीचे संगोपन केले आहे, तेवढे बोलघेवड्या राजकारणी पुढाऱ्यांनी केलेले नाही. बिराजदार हे पाँडेचारीच्या 'विश्वसंस्कृत प्रतिष्ठान' चे उपाध्यक्ष असून सोमय्या संस्कृत केंद्र सूरभारतीचे सहसंयोजक आहेत. मुस्लीम संस्कृत संशोधन केंद्र त्यांनी चालविले आहे आणि तेथे सूफी तत्त्वज्ञानाबरोबरच वेदांताचाही अभ्यास होतो, राष्ट्रीय एकात्मता दृढ होते.

'राज्यकर्ते आणि संगीत' हा अग्रलेख वाचताना गोखले यांनी वाचकांना संगीत-सागराच्या तळाशी नेऊन निवडक माणिकमोती पाहण्याची संधी उपलब्ध करून दिली आहे. तानसेन, जगन्नाथ, रूपमती आदी संगीतरत्नांपासून अकबर, शहाजहान, बाजबहाद्दर, वाजिदअली शहा आदी बादशहांची भेट घडवून आणली आहे. पूर्वीचे राज्यकर्ते आणि त्यांचे संगीतप्रेम आणि आजचे लोकशाहीतील राज्यकर्ते आणि त्यांची अरसिकता याचे वर्णन बहारदार केले आहे. गोखले म्हणतात, "आमच्या राज्यकर्त्यांना मालवाहतुकीत जेवढा रस आहे, त्यांच्या शतांशही रस मालकंसात नाही. अडाणी जनतेला चुचकारण्यासाठी ज्यांना अहर्निश ठणाणा करावा लागतो, त्यांना 'अडाणा' किंवा 'अडाणा बहार' एक पेडकी मूली। इंदिराके दार पर ज्यांना तिष्ठत बसावे लागते त्यांना 'केदार' रागाचे दार काय ठाऊक असणार !

*जोगी भूप विहाग, देशी पुरिया श्री कोशिया मारवा ।*
*दुर्गा, भीम-पलाश, भैरव, पिलू, मल्हार, केदार वा ।*
*रागांच्या घनकाननात ना रमे माझी दरिद्री मती ।*
*जावे मी जन-राग-रंग अथवा ती इंदिरा श्रीमती ॥*

आकाशवाणीची पन्नाशी आणि दूरदर्शनची दूर्दशा वाचण्यासारखी आहे. आकाशवाणीचे पूर्वीचे ते दिवस, आकाशवाणीकडून निमंत्रित केले जाणारे कलावंत यांची आठवण देऊन गोखले यांनी घसरगुंडीचे सार्थ वर्णन केले आहे.

गोखले यांच्या आणखी कितीतरी अग्रलेखांचा उल्लेख येथे करता येण्यासारखा आहे. साहित्य-संस्कृतीविषयक लेखांची सुग्रास मेजवानीच आपण चाखत आहोत असे 'अष्टपैलू' वाचताना वाटते.

(अष्टपैलू : विद्याधर गोखले, मानसन्मान प्रकाशन, ४/४० चंद्रप्रकाश, कर्वेरोड पुणे ४११ ००४, पृष्ठे १६४, मूल्य ८० रु.)

(१३२ ब सहजीवन सोसायटी, गणेशखिंड रस्ता, पुणे ४११ ००७)

□

द. धों. रत्नपारखी

## धुमसत्या बर्फाचे दाहक चटके

एखाद्या ममत्व असलेल्या गोष्टीला संकटाने वेढले असताना होणारी मनाची तगमग, होणारा चित्ताचा क्षोभ किती तळमळीने व्यक्त होऊ शकतो याचे मूर्तिमंत उदाहरण म्हणजे श्री. मो. ग. तपस्वी यांनी अनुवादित केलेला 'काश्मीर– धुमसते बर्फ' हा ग्रंथ. जम्मूकाश्मीरचे भूतपूर्व राज्यपाल श्री. जगमोहन यांनी त्यांच्या काश्मीरच्या राज्यपालपदाच्या कारकीर्दीत काश्मीरच्या इतिहासाचा वेध घेत घेत काश्मीर समस्येचे सखोल व विवेचक विश्लेषण My Frozen Turbulence in Kashmir या इंग्रजी ग्रंथात केले आहे. त्याचाच श्री. मो. ग. तपस्वी यांनी केलेला रसाळ अनुवाद म्हणजे 'काश्मीर– धुमसते बर्फ' हा ग्रंथ.

श्री. जगमोहन हे प्रथम एप्रिल १९८४ ते जून १९८६ व नंतर जानेवारी १९९० ते मे १९९० असे दोन वेळेस काश्मीरचे राज्यपाल होते. त्यांनी या ग्रंथात काश्मीरचा श्रीकृष्णाच्या काळापासूनच्या ज्ञात इतिहासापासून भारताच्या फाळणीपर्यंत व त्यानंतर पाक टोळीवाल्यांच्या काश्मीरवर झालेल्या हल्ल्यानंतर काश्मीरचे भारतात झालेले विलीनीकरण येथपर्यंतचा इतिहासाचा थोडक्यात आढावा घेऊन काश्मीर समस्येच्या विवेचनास सुरुवात केली आहे. काश्मीरच्या भारतात झालेल्या विलीनीकरणापासूनच काश्मीर भारतापासून तोडण्याचे पाकिस्तानचे प्रयत्न सतत चालू झाले. त्याकरिता १९६५ मध्ये भारतावर लादलेले युद्ध व १९७१ मध्ये पूर्व पाकिस्तानातून निर्वासितांचा लोंढा भारतात लोटून निर्माण केलेला तणाव हे मुख्य प्रयत्न. परंतु १९७१च्या युद्धात बांगलादेशाची निर्मिती होऊन पाकिस्तानचे तुकडे झाल्यामुळे सरळ युद्धाचा प्रयत्न सोडून काश्मीर आतून पोखरण्याचे तंत्र पाकिस्तानने अवलंबिले. त्याकरिता पाकिस्तानात प्रशिक्षण देऊन तयार केलेले दहशतवादी काश्मिरात

घुसवून व धर्माच्या नावावर काश्मिरी जनतेत भारताविषयी असंतोष निर्माण करण्यास सुरुवात केली. या सर्वांचा म्हणजे हळूहळू काश्मीरचे प्रशासन पोखरले जाऊन तेथे अतिरेक्यांचे राज्य चालू झाल्यासारखी स्थिती निर्माण झाली. दंगली, बॉंबस्फोट, अपहरण, हत्या असे गुन्हे वाढत्या प्रमाणात होऊ लागले. त्यातच फुटीरवाद्यांना डॉ. फारूख अब्दुल्ला यांच्या राजवटीत राजाश्रय मिळू लागल्यामुळे अतिरेक्यांवर कारवाई करणे कठीण झाले.

नंतर जुलै १९८३ मध्ये झालेल्या राज्यविधानसभेच्या निवडणुकीत फॅसिस्ट तंत्र वापरून व केंद्रविरोधी मुसलमानांची एकगठ्ठा मते आपणाला मिळण्यासाठी कट्टर सार्वमतवादी आणि पाकधार्जिण्या मीरवैझ मौलवी फारुख यांच्याशी हातमिळवणी करून डॉ. अब्दुल्लांनी निवडणुका जिंकल्या. पण त्यातूनच बंडखोरी होऊन डॉ. अब्दुल्लांचे सरकार जगमोहनना बडतर्फ करावे लागले. ते करताना राज्यातील परिस्थिती बिघडू नये यासाठी राज्यपालांची राजवट लागू करावी, ही जगमोहन यांची शिफारस डावलून केंद्र सरकारने जी. एम. शाह यांना मंत्रिमंडळ बनविण्यास सांगितले. त्या संबंधात श्री. जगमोहन यांची प्रतिक्रिया फार तीव्र व बोलकी आहे. ते म्हणतात, 'वेळोवेळी केंद्रात जी राजकीय मंडळी सत्तेवर येत गेली ती पक्षकारणाच्या वर उठू शकली नाहीत; म्हणून समस्या निर्माण होत गेल्या. केंद्र सरकारचे तत्त्वशून्य राजकारण आणि संविधानिक अनौचित्य हेच त्याला कारण आहे. संविधान कितीही चांगलं असलं तरी ज्यांनी ते राबवायचं तेच जर वाईट असतील, तर ते संविधान परिणामदृष्ट्या वाईटच ठरतं.' सेक्युलर भारताच्या सेक्युलर भागातील काश्मीरच्या राजधानीत राष्ट्रपिता म. गांधींचा पुतळा लोकसभेचे तिकीट मिळालेल्या एका नॅशनल कॉन्फरन्सच्या पुढाऱ्याच्या चिथावणीमुळे उभारला जाऊ शकत नाही व कॉंग्रेस (आय) आणि नॅशनल कॉन्फरन्सचे संयुक्त सरकार त्याबद्दल अवाक्षर बोलू शकत नाही.

या भयंकर नामुष्कीच्या गोष्टीवरील श्री. जगमोहन यांची प्रतिक्रिया खरोखरच भारतीयांच्या हृदयाचे स्पंदन दाखविणारी आहे. ते म्हणतात– 'आपला प्रतिस्पर्धी इतका बुळा व मेषपात्र निघेल असे उपद्रवखोरांनाही वाटले नसेल आणि त्यामुळे याहूनही जास्त आक्रमक पवित्रा घेण्याची आकांक्षा त्यांच्यांत निर्माण झाल्यास नवल ते काय ? नरमाईचे आणि मूलभूत तत्त्वांनाही मुरड घालणारे हे धोरण दहशतवाद व शस्त्राचाराला निमंत्रण ठरणार नाही, असे फक्त ठार भोळसटच मानतील. मूलभूत तत्त्वांचा बळी देऊन क्षणिक शांतता मिळविणे म्हणजे भविष्यासाठी उपद्रव आणि अशांतता पेरून ठेवणेच आहे.'

काश्मिरातील ही भयानक परिस्थिती हाताळण्यासाठी श्री. जगमोहन यांनी काही निर्णय घेतले. त्यांनी जनतेत मिसळून त्यांच्या अडीअडचणी समजून घेण्याचा प्रयत्न करून त्यांच्यात विश्वास निर्माण करण्यास सुरुवात केली, जनतेला गरजेच्या वस्तू मिळवून देण्याची व्यवस्था केली, अधिकाऱ्यांच्या कामात येणाऱ्या अडचणी दूर करून संपूर्ण यंत्रणा दक्ष आणि चोख करण्याचा प्रयत्न केला, मुलकी आणि सैनिकी अधिकाऱ्यांमधे समन्वय

साधण्याकरिता पूर्वी विसर्जित केलेले राज्यसुरक्षा मंडळाचे पुनर्जीवन केले. घातपाती संघटनांवर बंदी घातली, दहशतवादी संघटनांशी संबंधित असलेल्या कर्मचाऱ्यांवर कारवाई केली, दहशतवाद्यांच्या झडत्या घेणे व त्यांना अटक करणे सुरू केले, सीमेवर कडक निर्बंध घातले, श्रीनगर शहरात संचारबंदी लागू केली. या सर्वांचा परिणाम होऊन घुसखोर पकडले जाऊ लागले, शस्त्रास्त्रे जप्त होऊ लागली, अतिरेक्यांची श्रीनगरात कोंडी झाली, परंतु त्याच वेळेस राजकीय दबावाखाली संचारबंदी शिथिल करण्याचे आदेश दिले गेले आणि त्यामुळे श्रीनगरात कोंडी झालेले अतिरेकी निसटून राज्यात विखुरले गेले.

काश्मीर आतून पोखरण्यासाठी पाकिस्तानने तीन टप्प्यांची 'टोपाक' योजना तयार केली. त्यात प्रथम सत्तासंकुलातील सर्व घटकांत घुसखोरी करून ते उद्ध्वस्त करायचे, दुसरे काश्मिरात अंतर्गत घातपात सुलभतेने करण्यासाठी सियाचिन व कारगिल येथे भारतीय सैन्यावर दबाव आणून भारतीय सैन्य तेथे अडकवून ठेवायचे व तिसऱ्या टप्प्यात जर्ब-ए-मोमीन सारखे अभियान हाती घेऊन काश्मीरवर लष्करी आक्रमण करायचे. त्याप्रमाणे पोलिस व शासकीय यंत्रणेत घुसखोरी करून शासकीय यंत्रणा खिळखिळी करण्यात त्यांनी हळूहळू यश मिळविले. त्याच वेळेस राज्यसरकारने जुलै ते डिसेंबर १९८९ मध्ये काही कट्टर दहशतवाद्यांना सोडून दिले. विद्रोहाचे हे कुटिल स्वरूप व तंत्र माहीत होऊनही केंद्र सरकारने अक्षम्य निष्क्रियता दाखविली, त्याचेच फळ म्हणजे त्यानंतरची वाढती अशांतता, रक्तपात आणि देशाच्या अखंडत्वाला दिलेले आव्हान. जगमोहन यांच्या मते वेळीच जागरूकता दाखविली असती तर हा अनर्थ टाळता आला असता. पुढे ते उद्वेगाने असे म्हणतात की देश अशा मंडळींच्या हातात होता की ज्यांना दूरदृष्टी नव्हती आणि त्यांचे बौद्धिक अंधत्व आणि सत्तांधता इतकी उन्मत्त होती की राजीव गांधी आणि मंडळी ही परिस्थिती मुद्दामच चिघळू देऊ चाहत होती कारण नंतर जानेवारी-फेब्रुवारी १९९० मध्ये होऊ घातलेल्या संसदीय निवडणुकीच्या सुमारास त्यांना भारत-पाकिस्तान सीमेवर कडक कारवाईचे समर्थन करता येऊन काँग्रेस (आय)च्या बाजूने अनुकूल लाट निर्माण करता येईल असे वाटत होते. हा सर्व प्रकार किती संतापजनक वाटणारा होता हे जगमोहन यांच्या शब्दाशब्दातून जळजळीतपणे प्रतीत होते.

त्यानंतर श्री. जगमोहन यांनी १९९०च्या फेब्रुवारीअखेर प्रशासन पुन्हा मार्गावर आणण्याची शक्यता निर्माण केली. विकासाची विविध कामे सुरू केली. भ्रष्टाचारविरोधी आघाडी उघडली. त्यामुळे बहुसंख्य जनता घातपाती व दहशतवादी गोटातून बाहेर खेचून आणण्यात यश येत असतानाच पंतप्रधान विश्वनाथ प्रतापसिंग यांनी एक सात जणांची सर्वदलीय समिती (ज्या समितीत प्रामाणिकपणाबद्दल ठाम संशय असलेल्या दोन पक्षांना म्हणजे काँग्रस (आय) व नॅशनल कॉन्फरन्स यांना प्रतिनिधित्व दिले होते) नेमली आणि जॉर्ज फर्नांडिस यांना काश्मीर व्यवहार मंत्री नेमले. त्याच सुमारास घडलेल्या काही हिंसक घटनांच्या

पार्श्वभूमीवर या समितीने काश्मीरला भेट देऊ नये, अशी राज्यपालांनी विनंती करूनही समितीने काश्मीरला भेट दिली. त्या भेटीत श्री. राजीव गांधींनी बेजबाबदार वर्तन करून श्री. जगमोहनना जातीय ठरविण्याची पराकाष्ठा केली. या समितीतील सदस्यांत एकवाक्यता नसल्यामुळे अतिरेक्यांशी वाटाघाटी करण्यासंबंधी समितीमधील सदस्यांनी एकमेकांच्या विरोधी मतप्रदर्शन करून काश्मिरी जनतेला केंद्र सरकारच्या दुबळेपणाचा प्रत्यय आणून दिला. श्री. फर्नांडिस राज्यपालांना विश्वासात न घेता अतिरेक्यांना भेटू लागले. अधिकाऱ्यांना परस्परविरोधी आदेश मिळू लागले. भ्रष्टाचारविरोधी मोहीम थांबविण्याचे आदेश दिले गेले. त्यामुळे शासकीय कारवाई निरर्थक होऊन सर्व यंत्रणा लुळीपांगळी बनली. या संबंधात श्री. जगमोहन यांनी श्री राजीव गांधींना पत्र लिहून आपली मते परखडपणे मांडली.

त्यात ते म्हणतात की, अगदी १९८८पासून मी काश्मिरात घोंघावत असलेल्या धोक्याचे इशारे देऊनही तुम्ही त्याकडे दुर्लक्ष केले. जानेवारी १९९० मध्ये राज्यपाल राजवट लावण्यापूर्वी काश्मीर मनाने पूर्णपणे शरण गेले होते. पोलिस यंत्रणा खचलेली, प्रशासनात घुसखोरी झालेली, टोपाकसारख्या विद्रोही योजना तयार होत असताना डॉ. अब्दुल्ला यांनी ७० अट्टल दहशतवाद्यांना, त्रिसदस्य मंडळाने त्यांची अटक योग्य आहे असे सांगूनही सोडले, या सर्व गोष्टीवर आपण काहीच कारवाई केली नाही. माझ्या १९८४ ते १९८६ या पहिल्या कारकीर्दीत मी काश्मिरी जनतेचा (अगदी काश्मिरी युवकांचाही) आदर, स्नेह व विश्वास मिळविला तो क्षुद्र राजकारणापायी तुम्ही उद्ध्वस्त करण्याचा प्रयत्न केला. ३७० कलम हे मूठभरांची भ्रष्ट सत्ता पोसायला मदत करते, प्रादेशिक ताणतणाव निर्माण करते, देशाच्या मुख्य प्रवाहापासून काश्मीरला दूर ठेवण्याचा प्रयत्न करते. हे जाणून ते कलम (जे तात्पुरत्या कालापुरते होते) रद्द करून त्यात सुधारणा व पुनर्रचना करण्याकरिता काही कल्पना मांडल्या त्याची तुम्ही उपेक्षा करून काश्मीर समस्या सोडविण्याची एक महान संधी गमावली. तुमच्या तथाकथित राजवटीत काश्मिरी पंडितांच्या हालास पारावार राहिला नाही. तो समाज नष्ट होतो आहे. तुम्ही भारताची सत्यवादी आणि न्यायी देश बनविण्याची क्षमताच संपवून टाकली आहे. आज काश्मिरात विघटनवाद आणि घातपात यांचं पीक आलं आहे, ते त्याची बीजं सातत्यानं पेरून व तुम्ही मंडळींनी त्याला मुक्तपणे खतपाणी घातलं त्यामुळेच. आज काश्मीरची गंभीर समस्या सोडविण्यासाठी आवश्यक असलेली क्षमताच सरकार गमावून बसलं आहे."

विकृत आणि अपप्रचाराच्या परिणामी व्ही.पी. सिंग सरकारने श्री. जगमोहनना मे १९९० अखेर काश्मिरातून परत बोलावले. त्याबद्दल जनतेने व बहुसंख्य वर्तमानपत्रांनी निषेध केला. २६ मे १९९० च्या अंकात काश्मीर टाइम्सने सरकारचा निषेध करताना म्हटले की, 'काश्मिरातील परिस्थितीचे भान न राखता सरकारने हा निर्णय अत्यंत अविचाराने घेतला आहे. सर्वसामान्य परिस्थिती पुन्हा प्रस्थापित करण्यासाठी श्री. जगमोहन जिवापाड प्रयत्न करीत

असताना आणि ते त्या ध्येयाच्या अगदी जवळ आले असताना देशाची एकता आणि अखंडता यांच्या शत्रूच्या दबावाखाली सरकारने त्यांना हटविण्याचा घेतलेला हा निर्णय अत्यंत दुर्दैवी आहे. काश्मिरात केलेल्या उत्तम कामगिरीचे प्रशस्तिपत्र जगमोहनना त्यांच्या शत्रूकडूनच मिळाले, ते अत्यंत बोलके आणि वस्तुस्थितिनिदर्शक आहे. इंडिया वीकच्या २४-८-१९९० च्या अंकात अट्टल दहशतवादी मंझूर यांनी म्हटले की 'जगमोहनना हटविल्यामुळे पंधरा दिवसांत आम्ही काश्मिरात आमची स्थिती मजबूत करण्यात यशस्वी झालो. त्याकरिता व्ही.पी. सिंग यांचे आम्ही आभारच मानायला पाहिजेत.' काश्मीर समस्येचे भारत सरकारने वेळोवेळी दृष्टिपथात येणाऱ्या यशाचं रूपांतर चिघळणाऱ्या पेचप्रसंगात केलं. या आत्मघातीपणाचे जागते उदाहरण म्हणजे श्री. जगमोहनना काश्मीरातून दूर करणे.

काश्मीरप्रश्नाचे विश्लेषण करताना श्री. जगमोहन यांनी कोठलाही आग्रह धरलेला नाही. परंतु त्यांची वर्णनशैली काहीशी आत्मप्रशंसात्मक झालेली वाटते. ती थोडी सौम्य व निःपक्ष झाली असती तर ते निवेदन जास्त प्रत्ययकारी झाले असते. त्यांच्या त्या शैलीबद्दल त्यांनीच एका ठिकाणी म्हटले आहे की, 'मी आत्मस्तुती करतोय असं वाटेल असे उल्लेख करणं मला आवडत नाही, परंतु कठोर सत्याकडे लक्ष वेधण्याकरिता मला हे करणे भागच आहे. त्यांनी या ग्रंथात केलेले विवेचन केवळ ऐकीव माहिती व बातम्यावर विसंबून लिहिलेले नाही, तर वेळोवेळी त्यांनी आपल्या विवेचनाच्या पुष्ट्यर्थ भरीव पुरावे, वर्तमानपत्रातील उतारे, पत्रव्यवहार यांचा उपयोग केलेला आहे, हे सर्व लिखाण करताना काही लोकांवर कठोर टीकाप्रहार झालेले आहेत. परंतु ते कोणत्याही वैयक्तिक आकसाने केलेले नाहीत, तर केवळ वस्तुस्थितीचे यथार्थ दर्शन घडविण्याकरिताच केलेले आहेत. त्यामुळेच त्यांच्या या प्रतिपादनावर, टीकेवर किंवा युक्तिवादावर कुणीही संबंधितांनी प्रतिवाद केला नाही.

भारतीय राजकारणातील ढिसाळपणा, दुटप्पीपणा, प्रशासनातील दुबळेपणा आणि सत्तेच्या राजकारणामुळे आलेला भोंगळपणा यांचे लेखकाने केलेले परखड विवेचन फार मार्मिक आहे. काश्मीरसारखी जुनी, जटिल आणि खोलवर मुरलेली समस्या सरकारच्या नाकर्तेपणाने आणि राजकीय स्वार्थी आणि अविचारी डावपेचामुळे कशी जास्त जास्त भयानक होत चालली आहे हे विदारक सत्य जाणवल्यामुळे कोणाही सच्च्या भारतीयाचे मन सुन्न झाल्याखेरीज राहणार नाही. श्री. जगमोहन यांनी दाखविलेल्या धोक्याच्या इशाऱ्यांकडे संबंधितांचे आतातरी लक्ष जाईल व वास्तवाचे भान ठेवून राष्ट्रहिताकरिता व्यावहारिक आणि योग्य उपाय योजण्याचे धैर्य संबंधितांना होईल अशी आशा वाचकांच्या मनात निर्माण करण्याचे सामर्थ्य या ग्रंथात नक्कीच आहे असे वाटते.

(काश्मीर-धुमसते बर्फ, अनुवादक श्री. मो. ग. तपस्वी, (मूळ लेखक : श्री. जगमोहन My Frozen Turbulence in Kashmir', मोरया प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठे ६०८, मूल्य रु. १६०

(विनायक स्मृती ११४-अ प्रभात रस्ता, पुणे ४)

□

डॉ. प्रल्हाद वडेर

# ठळक, दणकट आणि कणखर व्यक्तिरेखा

वसंत केशव पाटील यांचा हा १० कथांचा ग्रामीण जीवनातील सुखदुःखं टिपणारा संग्रह आहे.

'छप्पर' या वस्तूला मानवी जीवनात महत्त्वाचं स्थान आहे. ते जेव्हा डोक्यावर असतं, तेव्हा त्याचं महत्त्व सहजी जाणवत नाही. पण ते कधी उडतं, कधी कोसळतं, कधी हरवतं तेव्हा माणसाच्या जीवनातलं त्याचं महत्त्व कळतं. छप्पर कोसळलं तरी ते पुन्हा उभं करावं लागतं. पण ते सुखासुखी करता येत नाही. या कथासंग्रहातील 'छप्पर' या प्रदीर्घ कथेत कथानायकाची छप्पर उभं करण्यातली धडपड पाटलांनी विविध अनुभवाच्याद्वारे उत्कटपणे रंगविली आहे. लहानपणी बापाचा मृत्यू झाल्यावर डोक्यावरचं छप्पर कोसळतं. पण आई ते काबाडकष्ट करून सावरून धरण्याची जीवघेणी धडपड करते. दिवस पालटतात. कथानायक नोकरीला लागतो आणि कोसळलेलं छप्पर पुन्हा उभं करण्याचं ठरवितो. पण त्याला भावकीतले लोक मोडता घालतात. आजवर कधीही बहिणीकडे न फिरकलेला मामा भाच्याच्या गळ्यात आपली पोरगी बांधण्यासाठी छप्पर उभं करण्याचं सगळं श्रेय पैशाच्या जोरावर आपल्याकडं घेऊ इच्छितो. पण भाचा आणि बहीण त्याचा हा बेत हाणून पाडतात आणि छप्पर उभं राहतं. अशा या म्हटलं तर निर्जीव, पण खऱ्या अर्थानं सजीव अशा छपराची विविध रूपं, घरातल्या माणसांच्या त्याच्याभोवती असलेल्या सुखदुःखाच्या अनेक आठवणी, जीवनाची काटेरी वाटचाल, त्यातील वाळवंटातले दुर्मिळ झरे इत्यादी सगळे पाटलांनी उत्कटपणे रंगविले आहेत. या कथेला आत्मचरित्राचा जो सूर आहे तोही कथानायकाच्या दृष्टिकोणातून ग्रामीण जीवन, तिथली माणसं, नातेवाईक, मित्र, सल्लागार यांचंही सुरेख व्यक्तिदर्शन घडविण्यास साहाय्यभूत होतो.

'मंगलमूर्ती स्टोअर्स आणि मंडळी' या कथेतही दत्ता लोहार या आपल्या दोस्ताच्या दुकानावरचं आणि पर्यायानं त्याच्या घरावरचं छप्पर पुन्हा उभं करण्याचा त्याच्या बालमित्रांचा प्रयत्न आहे. दत्तू लोहाराच्या पहिल्या भरभराटीच्या दिवसांनंतर त्याच्या दुकानाला व जीवनाला आलेली अवकळा त्याच्या मित्रांना पाहवत नाही आणि ते प्रत्येकी हजार रुपये देऊन त्याचं दुकान, त्याचं घर पुन्हा कसं उभारतात हे या कथेत आहे. त्यातील विविध माणसे आणि त्यांचे स्वभाव, त्यांचं बोलणं या कथेला एक वेगळेपणा देतात.

'छप्पर' या कथासंग्रहाचं एक वैशिष्ट्य म्हणजे त्यातून एक गाव आपल्या

डोळ्यांसमोर उभं राहतं. ब्राह्मण, मराठे, जैन, महार असं विविध तऱ्हेचं आणि बारा बलुतेदारांचं हे गाव आपले परंपरागत धंदे करीत कसंबसं जगताना दिसतं. पण त्यातही ईर्षा, सुप्त हेवेदावे आहेत. पण या सर्वांतून आपल्या डोक्यावरच्या छपराचीच सर्वांना काळजी आहे. त्यामुळेच एकमेकांत ताणतणाव उद्भवतात. ते सासू-सून, सासरा, नवरा-बायको या सर्व थरांत आहेत. 'उसळी'मधल्या मालीचं शिवाप्पा जंगम मध्यस्थ होऊन लग्न लावतो. पण तिचं आणि तिच्या सासऱ्याचं जमत नाही. हे आण, ते आण अशी सारखी त्याची भुणभुण चालू असते. ते मिटविण्यासाठी आणि मुलीच्या डोक्यावरचं छप्पर सांभाळण्यासाठी तिचा बाप रामभाऊ जाब विचारण्यासाठी व तडजोड करण्यासाठी तिच्या गावी जातो. शकुन मामामधल्या सखारामाला पोर होत नाही, याचं कारण देवदेवस्कीवर बायकोची श्रद्धा नाही असं वाटतं. पाल, मांजर याची त्याला भीती वाटते. मांजराची दृष्ट लागेल असं त्याला भय वाटतं. अपुशा, पुनव लक्षात न ठेवणाऱ्या बायकोचं तो भांडून भुस्कट पाडतो. शेवटी त्याची बहीणच नवरा-बायकोचं भांडण मिटविते. त्यातील श्रद्धा-अंधश्रद्धेचा व नवराबायकोच्या बोलभांडपणाचा खुसखुशीत परामर्श लक्षात राहतो.

खेड्यातील जीवनात प्राण्यांनाही एक महत्त्वाचं स्थान आहे. म्हैस, शेळ्या, मेंढ्या यांची ग्रामीण जीवनातली गरज आणि त्यामुळं त्यांचं माणसाशी नातं अतूट आहे. या प्राण्यांचेही काही प्रश्न आहेत. त्यांची सुखदुःखं आहेत. ती तिथल्या माणसाशी एकरूप झाली आहेत. प्राण्यांनाही भूक असते. माणसाला ती कळत नाही. त्यामुळे म्हैस दावं तोडून आपल्या पोटातला अग्नी शांत करायला जाते. आणि पोट भरल्यावर परत येते. रामभाऊला आपल्या म्हशीच्या पोटात भडकलेला अग्नी सोनूभटानं सांगितल्यावरच कळतो, हे 'म्हशीचं भविष्य' या कथेत हलक्याफुलक्या शैलीत सांगितलं आहे.

प्राण्यांना जशी पोटाची भूक असते, तसा त्यांना कामाग्नीही असतो. तो माणसांनाच शांत करावा लागतो. तो शांत झाला नाही, तर त्यांची कशी तडफड, तळमळ होते हे 'भूक' कथेत लेखकानं दाखविलं आहे. पण या कथेत म्हशीचं दुःख माणसाच्या दुःखाशी वेगळ्या प्रकारे एकरूप झालं आहे. म्हशीचा कामाग्नीनं पेटलेला जीव थंडगार करावा लागतो. पण धोंडी ही स्त्रीसुद्धा अशीच अतृप्त आहे. आपण कमनशिबी, फुटक्या कपाळाच्या आहोत, याची तिला जाणीव होते.

गावात जसे साव, सज्जन, जिवाला जीव देणारे मित्र, नातेवाईक आहेत तसेच ढोंगी, भ्रष्टाचारी पाटील आणि भिवऱ्यासारखे चोर रामोशीही आहेत. ते 'शेलकं मेंढरू' चोरतात. त्यामागे पाटीलच असतो हे उघड होतं आणि भिवऱ्याला मात्र मार खावा लागतो. हे ग्रामीण विश्व वारकाव्यासह व्यक्त होतं.

अशा या ग्रामीण जीवनाचे विविध कोनांतून चित्रण करणाऱ्या कथा वैशिष्ट्यपूर्ण आहेत. त्यांतील व्यक्तिरेखा ठळक, दणकट व कणखर आहेत. त्यातील संवाद तर

फुटाण्यासारखे फुटतात. मग ते आई-बाप, नवरा-बायको, नातेवाईक, सासू-सासरा किंवा शहरातील मुलाच्या तोंडून शिव्या ऐकून धास्तावलेले नवराबायको असोत. प्रत्येकाच्या बोलण्यातला ठसका, तिरकसपणा, भाषेनं घेतलेली वळणं, मराठीतील वैशिष्ट्यपूर्ण ग्रामीण म्हणी व वाक्प्रचार यांचा त्यात वापर आहे. त्यामुळे त्यांचा हा चित्रमय शैलीतील भाषासंवाद लक्षात राहतो. ते लेखकाचं एक सामर्थ्य आहे.

मात्र पाटलांनी भाषेच्या या वैभवाबरोबरच तिच्या तोलामोलाच्या अनुभवाची जोड आपल्या कथांना द्यायला हवी. 'भाषेची दौलत उधळणारा जादूगार' एवढ्यावरच त्यांनी समाधान मानू नये. 'कसं' सांगायचं हे कौशल्य त्यांच्याजवळ निश्चितच आहे, याची या संग्रहातल्या कथांनी साक्ष पटते. पण अद्याप 'काय' सांगायचं यावर त्यांची पूर्ण पकड वाटत नाही. त्यामुळे साचेबंद अशा काही अनुभवांकडून त्यांनी आता अधिक वैशिष्ट्यपूर्ण, नावीन्यपूर्ण अनुभवाकडे वळायला पाहिजे, व आपल्या अनुभूतीचं क्षेत्र वाढवायला पाहिजे, असं या कथा वाचून तीव्रतेनं वाटतं.

(छप्पर : वसंत केशव पाटील, प्रतिमा प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे १७२, मूल्य ६० रु.)

(ए/८, दत्तगुरू सोसायटी माला, पणजी, गोवे, ४०३००१)

□

**म. श्री. दीक्षित**

# वाचनीय जीवनानुभव

लो. टिळकांचे नातू, 'केसरी'चे दीर्घकाळ संपादक, आमदार, मंत्री, खासदार, विधानपरिषदेचे अध्यक्ष इ. विविध नात्यांनी श्री. जयंतराव टिळक यांना सर्वसामान्य साक्षर मराठी माणूस ओळखतो. संयुक्त महाराष्ट्र आणि गोवामुक्ती या दोन चळवळीत त्यांनी जीव ओतून जे प्रभावी प्रसारकार्य केलं ते लोकमान्यांच्या नातवाला शोभेलसंच होतं. पण जयंतरावांच्या कर्तृत्वाची ही झाली एक बाजू. राजकारणासारख्या धकाधकीच्या, रूक्ष क्षेत्रात राहूनही त्यांनी आपली रसिकता चांगली जोपासली, अबाधित ठेवली नि त्याजबरोबर शिकारीचे किंवा बागकामासारखे छंदही जपले. या साऱ्या गोष्टी करीत असताना जयंतरावांनी आपला प्रपंचही नेटका केला. राजकीय आणि प्रापंचिक जीवनात यशस्वी ठरलेल्या या माणसाचे पूर्वायुष्य किती खडतर, उपेक्षित अवस्थेत गेलं याची मात्र निकटवर्तियांखेरीज कुणाला कल्पना असणे शक्य नाही. 'वारसा' या पंधरा लेखांच्या नव्या











संग्रहात त्यांच्या एकूण राजकीय नि प्रापंचिक जीवनाच्या सर्व ज्ञात-अज्ञात बाजूंची गोळाबेरीज वाचायला मिळते.

गेल्या काही वर्षांत 'केसरी'त व क्वचित इतरत्र प्रसिद्ध झालेले 'वारसा'तील लेख-(संग्रह) म्हणजे जयंतरावांची एक प्रकारे आत्मकथाच आहे. या आत्मकथेला अर्थात दोन बाजू आहेत. एक राजकीय आणि दुसरी प्रापंचिक, वैयक्तिक आठवणी सांगणारी. राजकीय स्वरूपाच्या लेखातून लो. टिळकांचे राजकीय तत्त्वज्ञान, त्या तत्त्वज्ञानावर पोसला गेलेला आपला पिंड, काँग्रेसची चळवळ, तिचे कार्य, तिच्यातील भलेबुरेपणा, संयुक्त महाराष्ट्र आणि गोवामुक्ती लढ्यांची हकिकत नि त्या लढ्यातील आपला सहभाग इ. गोष्टींचा भरपूर तपशील वाचायला मिळतो. लो. टिळक हे जयंतरावांचे श्रद्धास्थान असल्यामुळे टिळकभक्तीच्या समान सूत्राभोवती हे सर्व लेख गुंफलेले आहेत. त्यामुळे ते भावनोत्कट आणि स्फुरणदायी उतरले आहेत. लो. टिळकांचा वारसा जपण्याचा नातवाने 'केसरी'द्वारा आणि आपल्यापरी जमेल तेवढा यत्न केला, याची प्रचिती या सर्व लेखांवरून खात्रीने येते.

'वारसा' संग्रहातील प्रापंचिक स्वरूपाच्या काही लेखांतून श्री. जयंतरावांनी आपले दुर्दैवी वडील श्रीधरपंत, उपेक्षित वनवासी झालेली कष्टाळू माता, विक्षिप्त रामभाऊकाका, धाकटा अकाली मृत्यू पावलेला भाऊ, 'केसरी'तील केळकर, करंदीकर, दा. वि. गोखले, ग.वि. केतकर इ. ज्येष्ठ संपादक, गोवालढ्यामुळे अतूट मैत्री जडलेले पं. महादेवशास्त्री जोशी इत्यादींची अतिशय हृद्य, चटका लावणारी व्यक्तिचित्रं रेखाटली आहेत. श्रीधरपंत, मातुःश्री शांताबाई, महादेवशास्त्री आणि सुधाताई यांच्या जीवनकथा विशेष जिव्हाळ्याने नि तपशीलवार लिहिल्या गेल्या आहेत. वडिलांच्या आत्महत्येनंतर चार लहान मुलामुलींसह आपल्या मातोश्रींना विदर्भात कसं वनवासी, उपेक्षित जीवन कंठावं लागलं नि पुढे केळकर-करंदीकर यांच्या सक्रिय सहानुभूतीमुळे गायकवाडवाड्यात टिळक कुटुंबाचा कसा प्रवेश झाला ती सारी करुणकथा मुळातूनच वाचण्यासारखी आहे. शिकारीचा नि बागकामाचा षोक, टिळकांचा गायकवाडवाडा आणि सिंहगड हे जयंतरावांच्या व्यक्तिगत जीवनाचे अविभाज्य विषय आहेत. त्या विषयांवरील 'वारसा'मधील लेखनात लालित्याबरोबर चिंतनशीलताही परिणामकारकरीत्या व्यक्त झालेली आहे.

श्री. जयंतराव हे सांप्रत एक प्रकारचं कृतार्थ जीवन जगत आहेत. आयुष्याच्या या संध्यासमयी त्यांचं मन अलीकडे अधिकाधिक अंतर्मुख, काहीसं अध्यात्मप्रवण आणि चिंतनशील होतंय नि याचे पडसाद 'वारसा'तील काही लेखांतून पडलेले स्वच्छ दिसतात. आत्मकथनात्मक असा हा संग्रह त्यांच्या कर्तृत्वाचा नि वैचारिक बदलत्या वाटचालीचा सरस आलेख असून त्यांच्यातील ललितलेखकाची साक्ष देणारा आहे.

प्रस्तुत संग्रहात सं. महाराष्ट्र नि गोवामुक्ती लढा यासंबंधीच्या मजकुराची कमीअधिक



अनुक्रमणिका






पुनरुक्ती झालेली आढळते. पृ. ९ वर वडिलांच्या मृत्यूची तारीख २५ मे ऐवजी १५ मे छापली गेली आहे. पृ. ३५ वर 'गो.ब.'जोशी ऐवजी 'गो. म.' छापले गेले आहे. गायकवाडवाड्याच्या संदर्भात पृ. ३८ वर लोकहितवादी आणि सार्वजनिक काका यांचे उल्लेख येणे अनैतिहासिक ठरेल. अशा काही चुका अनवधानाने किंवा घाईत प्रुफे पाहिल्यामुळे झाल्या असल्या पाहिजेत. अर्थात तेवढ्याने 'वारसा' या आत्मकथनात्मक लेखसंग्रहाची वाचनीयता बिलकूल कमी होणारी नाही.

(वारसा : ज. श्री. टिळक, टिळक बंधू, प्रकाशन, ५६८ नारायण पेठ, पुणे ३०, मूल्य ७५ रु.)
(८६५ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०)

□

सुजाता शेणई

## स्त्री-जीवनाचे दर्शन घडविणाऱ्या कथा

नवोदित कथालेखिकांमध्ये रेखा बैजल हे नाव बरंच परिचित झालेलं आहे. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या १९८५ च्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झालेली 'आकाश पेलताना' ही रेखा बैजलांची कथा, त्यांच्या नावाची नोंद घ्यायला लावून गेली. तेव्हापासून आजपर्यंत त्यांचं लेखन सतत प्रसिद्ध होत आहे. त्यांनी फक्त कथाच लिहिल्या असं नाही, तर 'आकाशओढ' हे नाटक, 'स्वप्नस्थ', 'अग्निपुष्प' यांसारख्या कादंबऱ्या आणि 'मानस', 'विज्ञानकथा' यांसारखे कथासंग्रह त्यांच्या नावावर जमा आहेत.

'तपस्या' हा त्यांचा नुकताच प्रसिद्ध झालेला कथासंग्रह. एकूण पंधरा कथा असलेल्या या कथासंग्रहातील चौदा कथा पूर्वी दिवाळीअंकांतून किंवा नियतकालिकांमधून प्रसिद्ध झालेल्या आहेत. 'दरवेशी' ही नवीन कथा ह्या संग्रहात समाविष्ट केली आहे.

'तपस्या' या कथासग्रहातील विश्व हे पूर्णतः माणसांनी गजबजलेलं. माणसांच्या भावभावना, त्यांना जन्मतःच मिळालेल्या देणग्या, त्यांच्यातील दोष, त्यांच्यातील स्वाभाविकता यांचं चित्रण कथांच्याद्वारे आपल्याला पाहायला मिळतं. यांतील काही माणसं मध्यमवर्गीय, काही ऋषी, काही ग्रामीण जीवन जगणारे, काही उच्चभ्रू, श्रीमंत. . . अशी कितीतरी ! निरनिराळ्या वातावरणातील व्यक्ती यात रेखाटल्यामुळेच जीवनाकडे पाहण्याची वृत्तीही प्रत्येकाची कशी निराळी असते ते यातून दिसतं. कधी जीवनाबद्दलची आसक्ती, तर कधी जीवनाबद्दलची उदासीनता, कधी जीवनाशी झगडून स्वतःचं अस्तित्व टिकविण्याची धडपड तर कधी स्वतःहून आपलं जीवन संपविल्याची खूण. . . तेव्हा जीवन



अनुक्रमणिका






शाप की वरदान हा प्रश्नच वाचकांना पडत राहतो.

मानव हा समाजप्रिय असतो. समूहाशी त्याचं नातं बांधलेलं असतं आणि अशा मानवाला जर 'एकटं', 'एकलकोंडं' जीवन वाट्याला आलं तर ते त्याला नकोसं होतं. हेच जीवन त्याला संपवावंसं वाटतं. 'तपस्या' ह्या कथेत 'सिद्धस्वामी' आपलं जीवन संपवितात. स्वामी म्हणून एका बाजूने मिळणारे सन्मान, त्यांच्या नावाचा होणारा जयजयकार, पण दुसऱ्या बाजूला आपल्यात आणि समाजात असलेलं अफाट अंतरच आपलं जीवन नकोसं करतंय ही दाहक जाणीव वाचकाला व्यथित करते.

मध्यमवर्गीय कौटुंबिक विश्वसुद्धा या संग्रहात पाहायला मिळतं. ज्यात आई, वडील, मुलगा आणि इतर यांची दखल घेतलेली दिसते. पण हे मध्यमवर्गीयांचं विश्व रेखाटताना, स्त्री असो अथवा पुरुष, एकूणच मानवाला जन्मतःच चिकटून येणारा स्थायी भाव म्हणजे स्वार्थ. या स्वार्थाचं चित्रण 'प्रायश्चित्त', 'अपूर्व', 'राणीचं दुःखं', 'दंश' यांसारख्या कथांमधून पाहायला मिळतं. परंतु या कथांचं वैशिष्ट्य म्हणजे या कथांमधील या स्वार्थी माणसांचा राग येत नाही. त्यांच्याबद्दल कीवही वाटत नाही, उलट ती माणसं त्यांच्या परीने बरोबरच वाटतात. म्हणून तर त्या कथाही स्वाभाविक, सहजगत्या पुढे नेलेल्या वाटतात.

'अपूर्व'मधील 'आई' आपल्या सहा वर्षांच्या मुलाला 'डोळे' मिळावेत म्हणून वृद्ध माणसाच्या मरणाची वाट पाहते. त्यात तिचा स्वार्थ निश्चितच आहे, पण 'आई'चं मुलावर असलेलं प्रेम, तिची चाललेली धडपड ही तिच्या स्वार्थापेक्षा मोठी ठरते. 'प्रायश्चित्त' या कथेत अनामिकाची अमात्याने केलेली हत्या. . . ती केवळ स्वार्थापोटीच. अनामिकाच्या बासरीत निर्जीवतेला सजीव करण्याची शक्ती आहे. त्यामुळे त्याने एक शाप दिलेलं गाव पुन्हा सजीव केलं. ही जादू, ही विद्या जर या अनामिकापाशी असेल तर तो उद्या सर्व राज्यांचा स्वामी होईल हे अमात्यांच्या लक्षात येतं. म्हणूनच अतिशय निरिच्छ, निष्पाप, केवळ आपल्या कलेवर प्रेम करणाऱ्या अनामिकालाही बळी जावं लागतं. 'दंश'मधील गोदाक्का आपल्या मुलाचं हित व्हावं म्हणून सीताक्कांना दोष देत असतात, तर सीताक्का आपल्या मुलीला जीवदान मिळावयासाठी गोदाक्कांच्या दारात उभ्या असतात. ह्या दोन्ही व्यक्तिरेखा 'मातृत्वा'च्या दृष्टिकोनातून पाहिल्या तर अगदी निरिच्छ, प्रामाणिकच वाटतात. त्यामुळेच कथेलाही एक वेगळे परिमाण लाभते ज्यात स्त्री, शेजारणी, असूया ठेवणारी स्त्री, मातृत्व लाभलेली आणि आपल्या अपत्यांसाठी प्राण पणाला लावणारी स्त्री, अशा अनेक छटा यात आपल्याला पाहायला मिळतात. एकूणच या कथासंग्रहात स्त्रीच्या विविध, पण स्वाभाविक, मूलतः असलेल्या गुणांचं दर्शन वेगवेगळ्या अंगांनी घडविलेलं दिसतं.

'मेघ वळवाचे', 'वादळ अंकुरता', 'गुदमर' यांसारख्या कथेतून प्रेमभावनेचे हळुवार दर्शन पाहायला मिळते. दोन भिन्न लिंगियांमध्ये आकर्षण असणं हे अगदी उघडच आहे, तेवढंच ते नैसर्गिकही आहे. आणि ह्या नैसर्गिकतेचं दर्शनच इथे घडतं. पण त्यातही

लेखिकेने या कथेतील नायिकांना झुकतं माप दिलं आहे. 'मेघ वळवाचे' या कथेतील "विद्या' जणूकाही घडलंच नाही असं दाखविते, 'गुदमर'मधील 'ती' शेवटपर्यंत आपल्या पतीचा पूर्वेतिहास जाणू शकत नाही, 'वादळ अंकुरता'मधील 'रत्ना' ही परिस्थितीने गांजल्यामुळे 'मेघन्'वरोबर पळून जाते. या प्रेमभावनेतही कुठंही भडकपणा, उत्तानपणा दिसत नाही. या नायिका बंडखोर नाहीत, पण विचारशील नक्कीच आहेत. परिस्थितीची, समाजाची, स्वतःच्या मर्यादांची त्यांना पूर्ण जाणीव आहे. तरीही या नायिका कुठे हताश, उदास होत नाहीत तर पुन्हा नव्याने स्वतःचा मार्ग स्वतः शोधण्याच्या कामी लागलेल्या दिसतात. 'अंतरीचे धावे'मधील 'जया' एस.कें.च्या सांत्वनानंतर शांत होते आणि स्वतःच स्वतःजवळ चुकांची कबुली देते. 'सल' कथेतील 'विभा' ही जास्त लक्षात राहते ती, तिने नवऱ्याला विचारलेल्या प्रश्नांमुळेच! यातूनच ही 'विभा' कुठेतरी आपल्या पतीच्या जीवनाचा, आपला पतीशी असलेल्या संबंधांचा, आपल्याला पंख मिटून बसणंच आवडू लागतं, ह्याची छळणारी जाणीव यामुळे ती लक्षात राहते. तिची व्यक्तिरेखा ही इतर सामान्य मध्यमवर्गीय स्त्रियांपेक्षा निराळी आहे हे पटतही जाते.

'राजयोगी', 'उद्ध्वस्त', 'दरवेशी' या कथाही स्वतःचं निराळेपण दाखवून जातात. राजयोगीत एकाच व्यक्तिमत्त्वाची दोन रूपं... कथेतील निराळेपण प्रकट करतात. 'दरवेशी' आणि 'अनिकेत' यात २५-३० वर्षांचा भूतकाळ आणि त्याचं वर्तमानाशी जोडलेलं नातं योग्य वाटतं, 'उद्ध्वस्त'मधील 'आई' मुलासाठी स्वतःला 'उद्ध्वस्त' करते हेही हृदयस्पर्शी वाटतं.

'तपस्या' हा कथासंग्रह वाचनीय, रंजक निश्चित आहे. 'राणीचे दुःख' ही कथा वगळता इतर कथा लहान आहेत. कथेतील कथाबीज हे अल्प असतं, कथेला एकच कथाकेंद्र असतं. ही समीक्षेची भाषा या संग्रहाला पूर्णतः लागू पडते. कोणतीही कथा ही कादंबरीचा आवाका असलेली नाही.

कथा अतिशय आटोपशीर असून पाल्हाळिकतेपासून दूर आहेत. भाषा सहज, सोपी, ओघवती, कथेला पुढे नेणारी आहे. कथा दुर्बोध होत नाहीत. 'वादळ अंकुरता', 'राणीचे दुःख', 'दंश', या कथा विशेष लक्षात राहतात. 'तपस्या' हा कथासंग्रह, कथेच्या प्रवाहात जोडला जाणारा आहे, परंतु कथेच्या प्रवाहाला नवीन वळण लावण्यास समर्थ नाही.

(तपस्या : रेखा बैजल, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे : २००, मूल्य : ८० रुपये.)

(बाजीराव चाकणकर चाळ, गारमाळ, धायरी, पुणे)

□

राजा दीक्षित

# विशालतेचा महत्त्वाकांक्षी वेध

'कालपात्र' हा नागपूरचे कवी श्री. बाळकृष्ण बन्नोरे यांचा पहिलाच कवितासंग्रह. तो विलंबाने प्रकाशित झाल्याची कवीची खंत 'कालपात्र'च्या वाचनानंतर सार्थ वाटू लागते. या संग्रहाच्या निमित्ताने 'साहित्य-विहार'सारख्या स्थानिक कविमित्रांच्या 'अंतरंग मंडळा'ची कामगिरीही आपल्याला जाणवू शकते.

'कालपात्र' या नावानुसार प्रस्तुत कवितेचे अवकाश खरोखरच मोठे आहे. श्री. बन्नोरे यांची प्रतिभा वेदांपासून पेरेस्रोइका-ग्लासनॉस्टपर्यंत संचार करणारी आणि 'व्यापक मनुष्यमूल्यगर्भ जीवनानुभवाची कलेच्या पातळीवरील अभिव्यक्ती' साधू पाहणारी आहे. नाजूक गहिऱ्या मोहफुलांपासून ते दिगन्ताला महासागरात लोटणाऱ्या महाशून्यापर्यंत अनेक गोष्टींचा वेध ही कविता घेत राहते. 'शब्दामधुनी कसे दिसावे । निःशब्दाचे विभ्रम गहिरे' असा प्रश्न जरी कवी उपस्थित करीत असला, तरी एका अर्थाने निःशब्दाच्या गहिऱ्या विभ्रमाचा अखंड शोधच त्याच्या कवितेद्वारा प्रत्ययाला येतो. भव्यतेचा सूक्ष्म मागोवा हे बन्नोरे यांच्या कालपात्राचे वैशिष्ट्य म्हणावे लागेल. त्यामुळेच विशाल कालपात्रात थेट परमाणू-परब्रह्म क्रीडेचा पट साकार होतो. साहजिकच कवी सांगून जातो :

*"अनवट कुठल्या रंग मदाने*
*गंधसागरी तरंग उठती ।*
*खुळी मासळी रिती तळाशी*
*दिग्ज्योतीच्या वळते वाती ॥"*

एकीकडे शाश्वताच्या तर दुसरीकडे वर्तमानकालीन वास्तवाच्या परिघात कवीची प्रतिभा संचार करते, म्हणूनच वर्तमानाची व्यामिश्रता व्यक्त करताना कवी वेद, वेदान्त, बौद्ध-जैन परंपरा, रामायण, महाभारत, पुराणे, स्फिंक्स, सॉक्रेटिस, येशू ख्रिस्त या सगळ्यांशी संबंधित प्रतिमासृष्टीचा वापर करतो. त्यातून 'नार्सिसस', 'कॅटॅलिसिस' किंवा 'घुबडाचा ऋग्वेद' यांसारख्या आपले वेगळेपण जपणाऱ्या कविता आकार घेतात. गोमटेश्वरावरील मांड्यांच्या शिल्पवेलींना कवीच्या कमरेखालच्या शतघावांचा आणि अमूर्त आत्मदंशाचा संदर्भ लाभल्यावर 'पुतळा' ही केवळ वर्ण्यवस्तू राहत नाही, तर ती एक अर्थगर्भ प्रतिमा बनते. वेळोवेळी कवीची चिंतनशीलता अशी प्रकट होतेच; पण या आविष्काराला एक प्रभावी चित्रमयताही लाभल्याचे आढळते. तिचा प्रत्यय पुढील ओळींवरून येऊ शकेल :



अनुक्रमणिका

*"पाण्यातील हिरवे प्रतिबिंब हिंदकळते*
*वासराने ढुशी मारलेल्या*
*गाईच्या कासेसारखे"...*

कवीचा संस्कृत साहित्याचा अभ्यास आहे. तसे प्रास्ताविकात ('प्रस्तरीया'त) नमूद केलेले आहे आणि कवितांमधूनही त्याची साक्ष पटते. 'शब्दब्रह्मावर तर आपली मनस्वी माया' असल्याचेही कवीने म्हटले आहे. अर्थात काही वेळा या ब्रह्म तेथे मायेपायी कविता शब्दबंबाळ झाल्या आहेत. वास्तविक 'भेसळ 'सारख्या कवितेद्वारे साध्या व सरळ शैलीतून विदारक वास्तवाला भिडण्याची क्षमता कवीकडे आहे, तरीही शब्दांच्या आणि प्रतिमांच्या जाळ्यात तो नको इतका गुरफटतो. पण एकंदरीत आपल्या पहिल्याच कवितासंग्रहात विशालतेचा जो महत्त्वाकांक्षी वेध कवीने घेतला आहे, तो उल्लेखनीय म्हटला पाहिजे.

'कालपात्र' (कवितासंग्रह) : बाळकृष्ण वत्रांरे, संघमित्रा प्रकाशन, नागपूर १, प्रथमावृत्ती, मार्च १९९२, पृष्ठे ५२, मूल्य ९ रु.)

(८६५, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०)

□

डॉ. चंद्रकांत देऊळगावकर

## साहित्यविषयक सखोल चिंतन

डॉ. जनार्दन वाघमारे यांच्या 'साहित्य चिंतन' या समीक्षेच्या पुस्तकाने मराठी वाङ्मय-समीक्षेत मोठी मोलाची भर घातली आहे. 'साहित्याचे मूल्यमापन : विचार आणि पुनर्विचार' हा या ग्रंथातील एक महत्त्वाचा लेख.

या संदर्भात डॉ. वाघमारे म्हणतात, "साहित्याचे स्वरूप बदलत असते. त्याच्या निर्मितीमागच्या प्रेरणाही बदलत असतात. त्यांची उद्दिष्टेही अर्थात बदलत असतात. साहित्याचे स्वरूप, प्रेरणा आणि उद्दिष्टे चिरस्थिर असूच शकत नाहीत. हे लक्षात घेणे आवश्यक आहे. आणि म्हणूनच त्याच्या मूल्यमापनांच्या प्रश्नावर नव्याने विचार करण्याची आवश्यकता निर्माण होते. साहित्याच्या मूल्यमापनाचे प्रचलित मानदंड अपुरे, कालबाह्य आणि अर्थहीन ठरत असतील तर, नवीन मानदंड निर्माण करण्याचा प्रयत्न करावा लागतो; आणि त्यासाठी गतकालीन आणि प्रचलित वाङ्मयीन सिद्धांतांचा आणि संकल्पनांचा मागोवा घेण्याचीही आवश्यकता असते". समीक्षेतील हा महत्त्वाचा विचार डॉ. वाघमारे यांनी डोळ्यासमोर ठेवून साहित्याचा विचार केला आहे, त्यात त्यांची समतोल दृष्टी दिसून

येते. त्याचप्रमाणे दुसरा एक जुनाच पण महत्त्वाचा विचार डॉ. वाघमारे यांनी मांडला आहे. ते म्हणतात, "साहित्याचे मूल्यमापन वाङ्मयीन निकषाच्या आधारावर करणे क्रमप्राप्त असले तरी, त्याची सामाजिक आणि सांस्कृतिक परिमाणेही तितकीच महत्त्वाची असतात. साहित्याची सामाजिक आणि सांस्कृतिक फलश्रुतीही तितकीच महत्त्वाची असते. दलित, ग्रामीण, आदिवासी, जनवादी साहित्यामुळे समाजातील शोषित, वंचित व दुर्बल घटकांना आत्मभान प्राप्त झाले, हीच तर खरी त्याची सर्वांत मोठी व लक्षणीय फलनिष्पत्ती आहे." अगदी याच भूमिकेतून कै. गं. बा. सरदारांनी 'संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुती' हे पुस्तक चाळीस वर्षापूर्वी लिहिले होते. या संदर्भात जिज्ञासूंनी हे पुस्तक वाचून पाहावे. या संदर्भात डॉ. वाघमारे यांनी दिलेले नॉर थ्रॉपचे अवतरण अत्यंत बोलके आहे. तो म्हणतो, "Every work of Art in the past had a social function in its own time, a function which was often not primarily an aesthetic function at all". साहित्य हे सामाजिक प्रक्रियेचे अविभाज्य अंग आहे." असे रेनेबेलेकेनेही म्हटले आहे. मराठी साहित्याच्या प्रारंभापासून हे घडले आहे, हे या ठिकाणी ध्यानात घेतले पाहिजे. तसेच हरिभाऊ, वामन मल्हार जोशी व केशवसुतांच्या काळातही घडले आहे, याची अजिबात दखल न घेता समीक्षक समीक्षा करीत असतात. पण डॉ. वाघमारे यांनी 'दुसऱ्या युद्धोत्तर मराठी साहित्याची सांस्कृतिक फलश्रुती' या लेखात ह्या कालखंडातील साहित्याचा समतोलपणे विचार मांडला आहे. पण 'जयवंत दळवी, मधु मंगेश कर्णिक आदी लेखकांना 'दलितत्व' सापडू शकले नाही' हे विधान पटू शकत नाही. असे जर झाले तर 'वेणा' या कथेतील त्या स्त्रीच्या वेणांचं जे सुंदर वर्णन शंकर पाटलांनी केलं आहे, त्यातही शंकर पाटलांना 'स्त्रीत्व' गवमलं नाही असं म्हणावं लागेल. हरिभाऊंची 'पण लक्षात कोण घेतो' ही कादंबरी हरिभाऊंनी लिहिली नसावी, कोण्या स्त्रीनं ती कादंबरी लिहिली असावी, असा समज स्त्रियांचाही झाला होता. तेव्हा 'दलित जीवनाचे कर्णिक यांनी कॅरिकेचर केले' हे म्हणणे पटू शकत नाही. दलित साहित्याच्या निर्मितीची चर्चा यथार्थ आहे. 'साहित्यापासून सांस्कृतिक फलिताची अपेक्षा करावयाची असेल तर साहित्यनिर्मितीमागे सांस्कृतिक प्रयोजन असणे आवश्यक आहे. या प्रयोजनांमागची उत्कटता, आणि लेखकाची संवेदना, प्रतिभा आणि भाषाप्रभुत्व यांवर वाङ्मयीन कलाकृतीचे यशापयश अवलंबून असते. पण प्रयोजन म्हणजे प्रचार नव्हे. मराठी संतांच्या रसिकत्वाला परतत्त्वाचा स्पर्श होता. आजच्या साहित्याला सांस्कृतिक परिवर्तनाचा स्पर्श असला पाहिजे' हा अत्यंत चांगला विचार मांडला गेला आहे. पण या ठिकाणी एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की संत साहित्यात 'परतत्त्व स्पर्शाबरोबर' सांस्कृतिक परिवर्तनही आहे. संतसाहित्य हे मध्ययुगीन भारतीय संस्कृतीचे अविभाज्य अंग आहे. म्हणून संतसाहित्याचा विचार करताना त्या काळातील संस्कृतीचा विचार करणे अपरिहार्य ठरते. त्या काळातील संतांना 'समाजप्रबोधन',



अनुक्रमणिका

'सांस्कृतिक परिवर्तन', 'सांस्कृतिक प्रयोजन' हे शब्द माहीत नसतील. पण तुकाराम सहज म्हणून जातो 'उजळावया आलो वारा खरा खोटा करा निवाड". सध्याच्या भाषेत सांगावयाचे तर त्यात 'एनलाईटमेंट' आहे व 'अवेकनिंग' पण आहे. संत साहित्याची चळवळ ही सांस्कृतिक परिवर्तनाची चळवळ आहे. सध्याच्या काळाच्या संदर्भात एखादा विचार पटणार नाही, पण ते साहित्य समाजविन्मुख आहे असे म्हणता येणार नाही. डॉ. वाघमारे यांना हे माहीत नसेल असे वाटत नाही.

'दलितांचे वेगळे सौंदर्यशास्त्र असू शकत नाही' असा परखड विचार डॉ. वाघमारे यांनी मांडला आहे. 'अमेरिकन निग्रोंनी स्वतःचे वेगळे असे सौंदर्यशास्त्र निर्माण करण्याचा प्रयत्न केला, पण त्यांच्या प्रयत्नाला फारसे यश आले नाही,' हे निग्रो साहित्याचे ज्याने चिंतन, मनन केले त्याचे मत आहे म्हणून याला विशेष महत्त्व आहे. 'दलितांची अशी सौंदर्यभावना वेगळी असू शकते काय' असा मार्मिक प्रश्न निर्माण करून त्या प्रश्नाला नकारात्मक उत्तर डॉ. वाघमारे यांनी दिले आहे. दलित साहित्याला वेगळ्या समीक्षेची गरज आहे, सौंदर्यशास्त्राची नाही असे मत डॉक्टरांनी नोंदविले आहे.

आतापर्यंत जनसाहित्याचा मूलगामी विचार केला गेला नव्हता, तो विचार डॉ. वाघमारे यांनी 'जनसाहित्यः स्वरूप व मर्यादा' या लेखात केला आहे. मानवी प्रतिष्ठा हे जनवादाचे उद्दिष्ट असते. स्वातंत्र्य, समता, बंधुता व न्याय ही जनवादाची साध्य व साधने असतील. ज्या ज्या मूल्यांमुळे मानवी प्रतिष्ठा प्रस्थापित होईल, त्या मूल्यांचा स्वीकार करण्याचे आवाहन जनवादी साहित्याला करावे लागेल. त्याशिवाय सांस्कृतिक परिवर्तन घडू शकणार नाही हे कोणालाही मान्यच करावे लागेल. एकदा 'जनवादी साहित्य' म्हटल्यावर ते आत्मकेंद्रित व व्यक्तिनिष्ठ नसते हे ओघाने आलेच. जनवादी साहित्याचे नेमकेपण या लेखातून कळून येते. 'दलित साहित्याची फलनिष्पत्ती आणि भवितव्यता' हा एक सध्याच्या काळातील ज्वलंत प्रश्नावर लिहिलेला समीक्षात्मक लेख आहे. गेल्या चाळीस वर्षांपासून दलित साहित्याची निर्मिती होत आहे पण त्यातून काय साधले गेले व भावी काळात या साहित्याचे भवितव्य काय, असा तो प्रश्न आहे. 'दलित साहित्याने क्रांतियुग निर्मिले, पारंपरिक मूल्ये नाकारली व मराठी साहित्याचा परीघ आणि संस्कृतीचा व्यास वाढविला, हा विचार वादातीत आहे. 'आज दलितसाहित्य दुहीच्या आवर्तात सापडले आहे व सम्यक चिंतनशीलताच मानवी जीवनाची सखोलता व उत्तुंगता वाढविते, हे फार मोठे आव्हान दलित साहित्यापुढे आहे. नकार व विद्रोहाचा उपयोग केवळ शस्त्र म्हणून केला जाऊ नये' हा अत्यंत स्तुत्य विचार दलित साहित्याचे अभ्यासक डॉ. वाघमारे यांनी नमूद केला आहे म्हणून महत्त्वाचा आहे.

'परिवर्तनशील साहित्याची आवश्यकता' हा एक विस्तृत लेख आहे. आपण जर मराठी साहित्याचा इतिहास पाहिला तर मराठी साहित्याचा उगमच सामाजिक बांधिलकीच्या जाणिवेतून झाल्याचे दिसून येईल. तेव्हापासूनच महाराष्ट्रात



अनुक्रमणिका

समाजप्रबोधनाची प्रकिया चालू आहे. 'मराठी साहित्याला खऱ्या अर्थाने परिवर्तनवादी दिशा प्राप्त झाली ती स्वातंत्र्योत्तर काळात', असे विधान डॉ. वाघमारे यांनी केले आहे. मराठी साहित्याचा सामग्र्याने विचार केला असता, हे विधान पटण्यासारखे नाही. परिवर्तनवादाचा संकुचित अर्थ घ्यावयाचा ठरवले तर प्रश्न नाही. पण अशी मर्यादा साहित्याच्या क्षेत्रात असू नये. 'सामाजिक बांधिलकी मानणारा चिंतनशील लेखक हा खऱ्या अर्थाने 'प्रबोधन पुरुष' असतो' हा एक सुंदर विचार डॉ. वाघमारे यांनी मांडला आहे. त्याचप्रमाणे परिवर्तनशील साहित्याचा मागोवा घेताना संत साहित्याचाही त्यांनी मागोवा घेतला आहे. हा मागोवा अभ्यासकांना उपयुक्त होईल, तो या लेखातील समतोल विचारामुळे.

'अक्करमाशीः एक दुःखयात्रा' हा एक उत्कृष्ट रसग्रहणात्मक लेख आहे. 'अक्करमाशी' उकळत्या अवहेलनेने काठोकाठ भरलेला हा शब्द आहे. शंभर इंगळ्यांचा विषारी डंख या शब्दाच्या पोटात दडलेला असावा. 'प्रत्येक दलित आत्मकथा ही एक दुःखयात्रा असते' असे वास्तव वर्णन डॉ. वाघमारे यांनी केले आहे. शरणकुमारची झुंज ही केवळ दारिद्र्याविरुद्ध आणि अस्पृश्यतेविरुद्ध नाही. त्याच्या कपाळावर 'अक्करमाशी' असा शिक्का मारला आहे. त्याच्या कपाळावर गोंदलेली ही अक्षरे मिटवायची कशी, हा खरा प्रश्न आहे. 'मी कोण' हा प्रश्न अगदी पुरातन काळातही विचारला गेला. पण शरणकुमारला 'मी कोण'? हा पडलेला प्रश्न फार वेगळा आहे. शरणकुमारनं स्वतःविषयीचं सत्य दडवून न ठेवता सर्व काही सांगितलं आहे, हे या आत्मकथेचं वैशिष्ट्य आहे.

डॉ. वाघमारे हे इंग्रजी साहित्याचे अभ्यासक आहेत, त्यामुळे सतत इंग्रजी साहित्याचे संदर्भ येणे स्वाभाविक आहे. मराठी साहित्याचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांनी वाचलेच पाहिजे असे हे पुस्तक आहे. पण इंग्रजी संदर्भांचा किती अर्थ लागेल असा प्रश्न मनात निर्माण झाल्याखेरीज राहत नाही. डॉ. वाघमारे स्वतः प्राध्यापक आहेत, शिक्षणतज्ज्ञ आहेत, तेव्हा सध्याची शैक्षणिक परिस्थिती त्यांना पूर्णपणे ज्ञात आहे.

इंग्रजी शब्दांना प्रतिशब्द दिले असते तर बरे झाले असते. इंग्रजी अवतरण देऊन पुढे थोडक्यात मराठी सारांश दिला असता तर उपयुक्त ठरले असते व वाचकांना संदर्भांचा अर्थ लागला असता. जे जाणकार वाचक आहेत, त्यांच्या संबंधी प्रश्नच निर्माण होत नाही.

डॉ. जनार्दन वाघमारे यांचे सखोल चिंतन या पुस्तकातून व्यक्त झाले आहे. ज्याला म्हणून गेल्या दोन-तीन दशकातील मराठी साहित्यातील वाङ्मयीन प्रवाहांचा अभ्यास करावयाचा आहे त्यांनी हे पुस्तक वाचलेच पाहिजे.

(साहित्यचिंतन : डॉ. जनार्दन वाघमारे, प्रतिमा प्रकाशन, १३५९, सदाशिव पेठ, पुणे ३०, मूल्य ४० रु.

(सरस्वती कॉलनी, लातूर ४१३५३१)

□

# संत तुकारामांच्या प्रभावळीचा परिचय

संतपरंपरेच्या संदर्भात 'प्रभावळ' ही संज्ञा लक्ष्मण रामदास पांगारकरांनी प्रथम वापरली. 'ज्ञानेश्वरांची प्रभावळ' हा त्यांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. विनायक लक्ष्मण भावे यांनी संतपंचकाची संकल्पना सांगितली. आपल्या 'महाराष्ट्र सारस्वता'मध्ये त्यांनी 'एकनाथ-पंचक' आणि 'दासपंचायतन' यांची ओळख करून दिली आहे.

अशाच व्यापक भूमिकेवरून सुहासिनी इर्लेकरांनी 'तुकारामांची प्रभावळ' हा विषय आपल्या पुस्तकात मांडला आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेने प्रकाशित केलेल्या वाङ्मयेतिहासाच्या दुसऱ्या खंडात इर्लेकरांनी या विषयावर लिहिले आहे. आपल्या त्या निबंधात जरूर तेवढी भर घालून हे पुस्तक त्यांनी सादर केले आहे.

संतसाहित्य हे इर्लेकरांच्या विशेष अभ्यासाचे आणि अभिरुचीचे क्षेत्र आहे. प्राचीन मराठी संत कवयित्रींविषयीचा त्यांचा ग्रंथ विद्वनमान्य ठरला आहे. मुक्ताबाई व ज्ञानेश्वर, जनाबाई व नामदेव, तसेच बहिणाबाई व तुकाराम यांच्या काव्यसंपदेचा तुलनात्मक परामर्श घेऊन, त्या तिन्ही कवयित्रींच्या अभंगभांडाराचे वेगळेपण त्यांनी विशद केले आहे. तसेच आधुनिक काव्यसमीक्षेच्या कसोट्या लावून, त्यांच्या आधारे कवयित्रींच्या कवितेची गुणवत्ता त्यांनी तपासून पाहिली आहे. इर्लेकरांच्या या स्वायत्त भूमिकेमुळे त्यांच्या त्या ग्रंथाची वा. ल. कुलकर्णी या गुरुवर्यांनी भलावण केली आहे.

'तुकाराम आणि त्यांची प्रभावळ' हा ग्रंथ निखळ वाङ्मयीन दृष्टिकोनातून केलेल्या तौलनिक अभ्यासाच्या अंगाने जाणारा, असाच ठरतो. हे लेखिकेचे गृहितकृत्य आहे. या प्रभावळीचे केंद्र तुकारामांचे काव्य हेच आहे. या काव्याचा तुकाराम-समकालीन व तुकारामोत्तरकालीन कवींवर कोणता प्रभाव पडला, याचा मागोवा घेण्याचा प्रयत्न त्यांनी केला आहे.

तुकोबांच्या व्यक्तिमत्त्वाने किंवा त्यांच्या अभंगवाणीने प्रभावित झालेल्या वीस-बावीस व्यक्ती 'तुकारामांचे संतसांगाती' म्हणून वा. सी. बेंद्रे यांना अभ्यसनीय वाटल्या. पण 'वाङ्मयीन प्रभावळ' म्हणून त्या सर्वांचा सारखा विचार करणे इर्लेकरांना जरुरीचे वाटले नाही. त्या सांगातींपैकी काही मोजक्याच व्यक्तींना 'कवी' म्हणून स्थान देता येईल, असे त्यांचे मत आहे. रामेश्वर भट वाघोलीकर, बहिणाबाई सिऊरकर, निळोबा पिंपळनेरकर, कचेश्वरभट्ट ब्रह्मे, तुकया-बंधू कान्होबा, तुकाराम-कन्या भागूबाई, आणि संताजी जगनाडे

यांचा समावेश इर्लेकरांनी प्रभावळीत केला आहे. किंबहुना, हे संत-सप्तकच तुकोबांचे वाङ्मयीन वारसा मिरवू शकेल, असे त्यांना वाटते.

प्रभावळीतील एकेका कवीचा परिचय करून देताना लेखिकेने विशिष्ट सूत्र वापरले आहे. चरित्राचा आलेख, व्यक्तित्वाचे विशेष, काव्यसंपदेचे स्वरूप आणि वाङ्मयीन गुणविशेष या मुद्द्यांना धरून हा परिचय करून दिलेला आहे. जरूर तेथे त्या त्या व्यक्तीच्या काव्यातील काही वेचक उतारे देऊन आपले प्रतिपाद्य लेखिकेने स्पष्ट केले आहे. तुकोबांच्या प्रभावळीवरील या विवेचनात रामेश्वरभट्ट, बहिणाबाई व निळोबा यांच्या वाट्याला पुरेशी पाने आली आहेत. त्या मानाने उरलेल्या चार कवींची ओळख अगदीच ओझरती करून दिलेली आहे.

तीच गोष्ट, खुद्द तुकोबांची. सबंध पुस्तकात आरंभीची आठ पाने केवळ त्यांच्या कवितेला वाहिलेली आहेत. मूळ वाङ्मयेतिहासात अन्य लेखकाचा तुकोबांवर स्वतंत्र व प्रदीर्घ निबंध असल्यामुळे तिथे या आठ पानांचा आटोप ठीक होता. पण प्रभावळीवरील आपल्या निबंधाला ग्रंथरूप देताना तुकयाच्या प्रसिद्ध अभंगवाणीचे विस्तृत व विवेचक दर्शन अपेक्षित होते. तसेच संतसप्तकाचा परिचय पूर्ण झाल्यानंतर शेवटी समारोपाचे एक प्रकरण हवे होते. या सर्व कवींच्या अभंगधनाचा तौलनिक अभ्यास, प्रभावळीच्या काव्यसंपदेत प्रत्येकाच्या कवितेचे स्थान आणि प्राचीन मराठी काव्याला या प्रभावळीचे योगदान अशा काही महत्त्वाच्या विषयांचा ऊहापोह समारोपात करता आला असता. त्याच्या अभावी, निळोबांवरील प्रकरणानंतर विवेचनाला दिलेला पूर्णविराम खटकतो. एखाद्या वृहत् ग्रंथातील एखादे प्रकरण जेव्हा स्वतंत्र पुस्तकाच्या स्वरूपात सिद्ध होते, तेव्हा अशी काही पथ्ये पाळणे जरुरीचे ठरते. ही त्रुटी वजा केली, तर तुकारामांच्या प्रभावळीचा लेखिकेने घेतलेला परामर्श स्वागतार्ह आहे.

तुकारामांची प्रभावळ : डॉ. सुहासिनी इर्लेकर, साकेत प्रकाशन, गांधीनगर, औरंगाबाद ४३१००५, प्रथमावृत्ती १९९२, पृष्ठे डेमी १२०, मूल्य रु. ४५.)

(संतोष, भारतीनिवास कॉलनी, एरंडवणे, पुणे ४१)

---

**साभार स्वीकार**

३. **स्त्रीलिखित कादंबऱ्या–** प्रेरणा आणि प्रवृत्ती, डॉ. विद्या देवधर, प्रतिमा प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे १६०, मूल्य ४५/- रुपये.

४. **साहित्य विचार–** प्रा. अरविंद वामन कुलकर्णी, प्रतिमा प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे १९८, मूल्य ७०/- रुपये.

५. **संशोधक–** इतिहासाचार्य वि. का. राजवाडे संशोधन मंडळ, पृष्ठे ९०, मूल्य २०/- रुपये.

६. **सवंगडी–** साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ३२, मूल्य ५/- रुपये.

७. **डॉ. भीमाशंकर देशपांडे एकसष्ठी गौरविका–** साहित्य संशोधन, (गुलबर्गा), पृष्ठे २६.

## कार्यवृत्त : जानेवारी ते मार्च १९९३

**४ जानेवारी :** श्री. म. माटे स्मृतिदिन

सुप्रसिद्ध साहित्यिक कै. श्री. म. माटे यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. सरोजिनी बाबर, श्री. म. श्री. दीक्षित आणि डॉ. गं. ना. जोगळेकर यांची प्रा. माटे यांच्या विविध साहित्यिक पैलूंविषयी भाषणे झाली.

**१५ जानेवारी :** श्री. बा. रानडे जन्मशताब्दी

रविकिरण मंडळाचे ज्येष्ठ सदस्य कै. श्री. बा. रानडे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त प्रा. द. ता. भोसले, सौ. कुंदा कारखानीस आणि डॉ. गं. ना. जोगळेकर यांची भाषणे झाली. रविकिरण मंडळाविषयी आणि त्या निमित्ताने तत्कालीन कवितेच्या नव्या प्रवाहांविषयी या कार्यक्रमात अभ्यासपूर्ण विवेचन करण्यात आले.

**१८ जानेवारी :** वि. द. घाटे जन्मदिन

डॉ. अनुराधा पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलन आयोजित करण्यात आले होते. डॉ. कल्याण इनामदार यांनी सूत्रसंचालन केले. या संमेलनात मनोहर सोनावणे, उद्धव कानडे, दीपक करंदीकर, स्नेहसुधा कुलकर्णी, स्वाती सामक, संगीता बर्वे, शंतनु चिंधडे, विजया संगवई यांनी भाग घेतला. या निमित्ताने कै. वि. द. घाटे यांच्या कन्या डॉ. अनुराधा पोतदार आणि नातू डॉ. प्रियदर्शन पोतदार आणि सौ. यशोधरा साठे यांनी कवितेच्या प्रांतातील आपली मुशाफिरी कथन केली.

**१९ जानेवारी :** चिं. वि. जोशी स्मृतिपारितोषिक

कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत स्मृतिपारितोषिक या वर्षी श्री. माधव भावे यांच्या 'पिकॅडली सर्कस व इतर विनोदी लेख' या पुस्तकाला देण्यात आले. या प्रसंगी श्री. मंगेश तेंडुलकर यांचे व्यंगचित्रे व विनोद याविषयी सोदाहरण व सचित्र भाषण झाले. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.

**१० फेब्रुवारी :** नरहर कुरुंदकर स्मृतिदिन

ज्येष्ठ समीक्षक कै. नरहर कुरुंदकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त प्रा. मधु जामकर यांचे 'कुरुंदकरांच्या सहवासात' या विषयावर व्याख्यान झाले. कार्यवाह डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्तविक केले.

**२० फेब्रुवारी :** कृ. पां. कुलकर्णी जन्मशताब्दी

महाराष्ट्र साहित्य परिषद व मराठी अभ्यास परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने ख्यातनाम भाषाशास्त्रज्ञ प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांच्या जन्मशताब्दी निमित्ताने अमेरिकेतील मिशिगन विद्यापीठातील भाषातज्ज्ञ डॉ. माधव देशपांडे यांचे 'संस्कृत व प्राकृत : भाषिक आणि सामाजिक संबंध' या विषयावर भाषण झाले.



अनुक्रमणिका

**२७ फेब्रुवारी :** कवी कुसुमाग्रज पुरस्कार

१९९२ मधील सर्वोत्कृष्ट काव्यसंग्रह म्हणून श्री. दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांच्या 'एकूण कविता भाग– १' (पॉप्युलर प्रकाशन) या काव्यसंग्रहाची निवड करण्यात आली. कॉन्टिनेंटल प्रकाशनने पुरस्कृत केलेल्या रु. १२००/- च्या या पारितोपिकाचे वितरण डॉ. अनुराधा पोतदार यांच्या हस्ते झाले. पॉप्युलर प्रकाशनासही या संबंधात रु. ९००/- चे पारितोपिक देण्यात आले. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.

**५ व ६ एप्रिल :** कै. पिलाजीराव फडणीस स्मृतिदिन

वाई शाखेतर्फे कै. पिलाजीराव फडणीस स्मृतिदिनानिमित्त दि. ५ व ६ एप्रिल रोजी श्री. रवींद्र भट यांची दोन व्याख्याने आयोजित केली होती. गंगापुरीच्या घाटावर हा कार्यक्रम झाला. 'विवेकानंद व्यक्ती आणि विचार' व 'शिवसमर्थ कालखंड' या विपयावरच्या ह्या व्याख्यानांना उत्तम प्रतिसाद लाभला.

**९ मार्च :** कवी यशवंत जन्मदिन

महाराष्ट्र कवी यशवंत यांच्या जन्मदिनानिमित्त या वर्षी श्री. गोविंद कुलकर्णी यांच्या 'तीन रंगांचे इंद्रधनुष्य' या पुस्तकास रु. १०००/- चे पारितोपिक देण्यात आले. परीक्षकांतर्फे डॉ. शंतनु चिंधडे यांनी पुस्तकातील कवितांचा आढावा घेतला. अध्यक्षीय भापणात ज्येष्ठ कवयित्री श्रीमती शांता शेळके यांनी मराठी कवितेविषयी मूलभूत विचार मांडले. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले.

**१० मार्च :** अहिताग्नी राजवाडे स्मृतिदिन.

अहिताग्नी कै. शंकर रामचंद्र राजवाडे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ नागपूरचे डॉ. मधुकर आष्टीकर यांचे व्याख्यान झाले. विपय होता 'वेदकालीन स्त्रिया'. कार्यवाह डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी कार्यक्रमाचे प्रास्ताविक केले.

**२६ मार्च :** न्या. रानडे यांची दीडशेवी जयंती

न्या. महादेव गोविंद रानडे यांच्या दीडशेव्या जयंतीनिमित्त साहित्य महामंडळाने दिलेल्या अनुदानातून न्यायमूर्तींच्या विविध पैलूंचे दर्शन घडविणारा एक विशेष कार्यक्रम आयोजित करण्यात आला. या वेळी पुढीलप्रमाणे व्याख्याने झाली :

१) प्रा. ग. प्र. प्रधान : रानड्यांचे राजकारण आणि समाजकारण.

२) डॉ. आनंद नाडकर्णी : रानड्यांचे अर्थकारण.

३) डॉ. सदानंद मोरे : रानड्यांचे धर्मकारण.

कार्यक्रमाचे प्रास्ताविक व सूत्रसंचालन कार्यवाह डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी केले.

**विभागीय संमेलन :** डोंबिवली आणि कल्याण शाखांच्या संयुक्त विद्यमाने दिनांक २२, २३ आणि २४ जानेवारी रोजी डोंबिवली येथील ध. ना. चौधरी विद्यालयाच्या प्रांगणात उभारलेल्या भव्य मंडपात विभागीय साहित्य संमेलन साजरे झाले. अध्यक्षस्थानी सुप्रसिद्ध साहित्यिक प्रा. द. मा. मिरासदार होते. उत्कृष्ट रंजन कार्यक्रम, प्रबोधन करणारे विविध परिसंवाद, सर्व शाखांचे प्रतिनिधित्व करणारे कविसंमेलन, बालसंस्कार, सातारा येथील अ. भा. मराठी

साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. विद्याधर गोखले यांची मुलाखत, भव्य साहित्यदिंडी आदी कार्यक्रमांमुळे या उपनगरीय परिसरात आनंददायी वातावरण निर्माण होण्यास मदत झाली. सिडकोचे अध्यक्ष श्री. नकुल पाटील, श्री. राम कापसे, कल्याण शाखेचे श्री. प्रभाकर संत, डोंबिवलीचे श्री. दिलीप महाजन, तसेच दोन्ही शाखांचे अनेक उत्साही कार्यकर्ते यांच्या अखंड परिश्रमाने हे संमेलन यशस्वी झाले.

महामंडळाच्या योजनेनुसार मिळालेल्या अनुदानातून पुणे, इचलकरंजी, ठाणे इत्यादी शाखांतर्फे न्यायमूर्ती रानडे यांच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकणारी भाषणे आयोजित करण्यात आली. डॉ. म. वि. गोखले, प्रा. ग. प्र. प्रधान, डॉ. आनंद नाडकर्णी, डॉ. सदानंद मोरे यांनी याविषयी अभ्यासपूर्ण व्याख्याने दिली.

केंद्राच्या कक्षेत येणाऱ्या सातारा शाखेतर्फे आयोजित करण्यात आलेल्या ६६ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या आयोजनातही कार्याध्यक्ष म. वि. गोखले आणि कार्यवाह रवींद्र भट यांनी पुढाकार घेतला. या संमेलनातील प्रतिनिधी शुल्कातील केंद्राचा हिस्सा रु. ५०००/- च्या धनादेशाद्वारे केंद्राकडे त्वरित जमा झाला आहे.

**२९ मार्च** : शं. ना. जोशी स्मृतिदिन

इतिहास संशोधक कै. शं. ना. जोशी यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ प्रा. सु. श्री. पांढरीपांडे यांच्या 'ध्रुवपद' या ग्रंथाला डॉ. सरोजिनी बाबर यांच्या हस्ते पारितोषिक देण्यात आले. या प्रसंगी परीक्षक डॉ. सदानंद मोरे आणि डॉ. स. मा. गर्गे यांची पुस्तकावर समीक्षणात्मक भाषणे झाली. कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर यांनी प्रास्ताविक आणि सूत्रसंचालन केले. या प्रसंगी जोशी कुटुंबियांनी कै. शं. ना. जोशी यांचे तैलचित्र परिषदेला भेट दिले.

**३० मार्च ना. गो. चापेकर स्मृतिदिन** : कै. ना. गो. ऊर्फ नानासाहेब चापेकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त 'भारतीय संस्कृतीमधील प्रयत्नवाद' या विषयावर रवींद्र भट यांचे भाषण झाले. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले.

रवींद्र भट, कार्यवाह

---

**साभार स्वीकार**

**८. देवीचा टाक**– दिगंबर कुलकर्णी, रेणुका प्रकाशन, पृष्ठे ११२, मूल्य ५०/- रुपये.
**९. एक होता डॉक्टर**– दिगंबर कुलकर्णी, रेणुका प्रकाशन, पृष्ठे १३२, मूल्य ६०/- रुपये.
**१०. महामेरू**– रा. शं. दातार, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे ८४, मूल्य २०/- रुपये.
**११. प्रार्थना**– मानसी दिवेकर, श्रुती प्रकाशन, पृष्ठे ७४, मूल्य ४०/- रुपये.
**१२. दर्यासारंग ख्रिस्तोफर कोलंबस**– संजीवनी खेर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे १८१, मूल्य ८०/- रुपये.
**१३. माझ्या साहित्याचा बॅलन्सशीट**– श्री. ज. जोशी, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे २०९, मूल्य ८५/- रुपये.
**१४. पितळी दरवाजा**– सुभाष भेंडे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे २६०, मूल्य १००/- रुपये.












# शाखांची कार्यवृत्ते

**ठाणे जिल्हा शाखा**

शाखेचा १३ वा वर्धापन दिन १४ जून ९२ रोजी आयोजित केला होता. या वेळी पाहुणे/ अध्यक्ष म्हणून प्रा. डॉ. यशवंत पाठक यांना निमंत्रित केले होते. 'येणे वाग्यज्ञे तोपावे' या विषयावर त्यांनी आपले विचार मांडले.

नवकवींना व्यासपीठ उपलब्ध करून देण्यासाठी १६ ऑगस्ट १९९२ या दिवशी कविता-वाचनाचा कार्यक्रम आयोजित केला होता. म. पां. भावे अध्यक्षस्थानी होते. सुमारे ३५ कवींचा यात सहभाग होता.

सप्टेंबर महिन्यात प्रा. म. वि. फाटक स्मृतिपुष्प डॉ. अरुणा ढेरे यांच्या व्याख्यानाने गुंफण्यात आले. 'लोक रामायण' या विषयावर त्यांनी आपले विचार प्रकट केले. जनमानसासमोर रामायण कशा प्रकारचे आहे, हे डॉ. ढेरे यांनी विविध रामायणांच्या अभ्यासातून उदाहरणे देऊन स्पष्ट केले.

सुप्रसिद्ध रंगभूषाकार व मुखवटेकार श्री. प्रभाकर भावे यांची मुलाखत नोव्हेंबर ९२ मध्ये आयोजित केली होती. म. पां. भावे व विनायक मोहरीर यांनी ही मुलाखत घेतली. विविध प्रायोगिक नाटके व चित्रपटांसाठी भावे यांनी प्रभावी व प्रसंगोचित रंगभूषा केलेली असल्यामुळे नाट्य, साहित्य क्षेत्रातील मंडळी बहुसंख्येने या कार्यक्रमास उपस्थित होती. या वेळी त्यांनी तयार केलेल्या मुखवट्यांचे छोटेखानी प्रदर्शनही भरविण्यात आले होते.

१० जानेवारी १९९३ या दिवशी ठाण्यातील अन्य संस्थांच्या सहकार्याने ६६ व्या मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. विद्याधर गोखले यांचा सत्कार करण्यात आला. या वेळी डॉ. अनंत देशमुख, अशोक चिटणीस, शशी जोशी वक्ते म्हणून उपस्थित होते. सौ. मधुवंती दांडेकर यांनी या वेळी स्वागतगीत म्हटले. पद्माकर शिरवाडकर यांनी या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले. श्री. म. पां. भावे यांनी आभार मानले.

न्या. महादेव गोविंद रानडे यांच्या संबंधात, 'रानडे आणि एकविसावे शतक' या विषयावर प्रा. डॉ. म. वि. गोखले यांचे व्याख्यान २० मार्च ९३ रोजी आयोजित केले होते. हा कार्यक्रम केंद्र कार्यालयाच्या वतीने ठाणे जिल्हा शाखेने आयोजित केला होता.

**पद्माकर शिरवाडकर,** कार्यवाह

**कल्याण शाखा**

अनुभव आणि वास्तव अनुभूतीतून खरी कथा जन्म घेते, असे विचार सुप्रसिद्ध लेखिका सौ. गिरिजा कीर यांनी कल्याण येथील लेखिका सौ. विजया गोखले यांच्या 'वचन' या कथासंग्रह प्रकाशन प्रसंगी अध्यक्षपदावरून व्यक्त केले. हा प्रकाशन सोहळा महाराष्ट्र साहित्य परिषदेची कल्याण शाखा आणि कल्याण गायन समाज यांच्या वतीने ४ एप्रिल रोजी साजरा झाला. प्रमुख पाहुणे प्रा. राम कापसे होते. प्रसिद्ध विनोदी लेखक वि. आ. बुवा यांच्या हस्ते कथासंग्रहाचे प्रकाशन झाले.



अनुक्रमणिका

म. सा. प. कल्याण शाखेचे कार्याध्यक्ष श्री. भालचंद्र रेडे यांनी आपल्या प्रास्ताविकात शाखेच्या गेल्या तीन वर्षातील कार्याचा आढावा घेतला व नुकत्याच झालेल्या विभागीय साहित्य संमेलनातील डोंबिवली येथील शाखेच्या सहभागाबद्दल आनंद व्यक्त करून या संमेलनातील खर्च वजा जाता जी रक्कम कल्याण शाखेला मिळणार आहे त्या रकमेतून साहित्य, संगीत, नाट्य, चित्र आदी कलांना प्रोत्साहन देण्यासाठी एक सभागृह बांधून संमेलनाची स्मृती जागृत ठेवण्याचा प्रयत्न सुरू असल्याचे सांगितले.

वि. आ. बुवा यांनी कथासंग्रहाचे प्रकाशन करताना ज्या संग्रहाचे प्रकाशन करावयाचे त्याचे वाचन न करताच कसे वक्ते बोलतात, यांचे गमतीदार किस्से सांगितले. नंतर लीलाताई देशमुख, सुशीला महाजन, मीनल सांडू, कालिंदीबाई जोशी यांनी विजयाताईंच्या लेखनासंबंधी गौरवोद्‌गार काढले.

या समारंभात विजया गोखले यांचा गिरिजा कीर यांचे हस्ते शाल, पुष्पगुच्छ देऊन सत्कार करण्यात आला.

श्री. किरण जोगळेकर यांनी सौ. गिरिजा कीर यांचा परिचय करून दिला.

कल्याण शाखेचे अध्यक्ष श्री. प्र. अ. संत यांनी मान्यवरांचा पुष्पगुच्छ देऊन सत्कार केला. त्यात प्रकाशक श्री. बल्लाळ यांचा आवर्जून उल्लेख करण्यात आला. श्री. विजय चिपळूणकर यांनी आभार प्रदर्शन केले व मीरा जोशी यांनी पसायदान सादर केले.

कार्यक्रमाचे सूत्रसंचालन म. सा. प. चे कार्यवाह श्री. गिरीश लटके यांनी केले.

**भालचंद्र रेडे, कार्याध्यक्ष**

### सोलापूर शाखा

सोलापूर येथील प्रा. अजिज नदाफ हे मुस्लीम साहित्य सम्मेलनाचे अध्यक्ष झाले म्हणून, श्री. विश्वासराव फाटे यांना महाराष्ट्र शासनाने राज्य पुरस्कार देऊन गौरविले म्हणून, श्री. वसंतराव एकबोटे यांना पत्रकारितेचा पुरस्कार प्राप्त झाला म्हणून, डॉ. निर्मलकुमार फडकुले साहित्यपरिषदेच्या उपाध्यक्षपदी व रा. व्यं. छत्रपती कार्यकारिणीचे सदस्य म्हणून व सोलापूर महानगरपालिकेच्या प्राथमिक शिक्षण मंडळाचे सदस्य म्हणून निवडून आल्याबद्दल या सर्वांचा यथोचित सत्कार करण्यात आला.

'कविता सोलापुरी' हा कार्यक्रम श्री. गाताडे, श्रीमती सुनेत्रा देसाई, व्यंकटेश कामतकर यांनी सादर केला.

कवी रा. ना. पवारांना श्रद्धांजली वाहण्यात आली. त्या वेळी प्रा. अंबरकर यांचे पवारांच्या काव्यासंबंधी व्याख्यान झाले. शारंगधर कुलकर्णींना श्रद्धांजली वाहण्यात आली.

**प्रा. रा. व्यं. छत्रपती, उपाध्यक्ष**

### धुळे जिल्हा शाखा

धुळे जिल्हा शाखेने आपल्या वैशिष्ट्यपूर्ण कार्यक्रमांनी धुळे शहरात सांस्कृतिक, साहित्यिक वातावरणनिर्मिती करण्यात यश मिळविले. या कामी अध्यक्ष प्रा. पुरुषोत्तम पाटील

आणि केन्द्रीय सचिव तथा जिल्हा प्रतिनिधी प्रा. भगवान ठाकूर यांचे कार्यकारिणीला मोलाचे सक्रिय सहकार्य लाभले.

५ जानेवारी १९९३ रोजी ख्यातनाम विनोदी साहित्यिक रमेश मंत्री, प्रभाकर तामणे, ना. सं. इनामदार, राजेंद्र मंत्री यांचा रंगतदार साहित्यिक गप्पांचा कार्यक्रम झाला. कार्यक्रमाचे प्रास्ताविक कार्याध्यक्ष डी.बी.जगत्पुरिया यांनी, तर कार्यक्रमाचे सूत्रसंचालन प्रा. भगवान ठाकूर यांनी केले.

१६ जानेवारी रोजी प्रसिद्ध दलित साहित्यिक प्रा. दामोदर मोरे यांनी 'दलित कविता' या विषयावर विचार व्यक्त केले. मुंबईचे राघवेन्द्र कोल्हटकर 'मराठी माणूस' या विषयावर बोलले. श्री. मोरे यांनी मानवमुक्तीचा आंबेडकरप्रणीत विचार दलित कवितेतून समर्थपणे व्यक्त होत असल्याचे पटवून दिले. दैनिक 'श्रमराज्य'चे संपादक मनोहर पाटील यांनी दलित व विद्रोही कवितेचे स्थान साहित्यात मोलाचे असल्याचे आपल्या अध्यक्षीय भाषणात सांगितले. कार्यवाह प्रा. सौ. उषा पाटील यांनी आभार मानले.

**फेब्रुवारी :** येथील दिवंगत कवी तथा पत्रकार कै. किसनराव पवार यांच्या स्मृतिदिनानिमित्त प्राचार्य राम शेवाळकर यांच्या प्रकट मुलाखतीचा कार्यक्रम फेब्रुवारीमध्ये साजरा झाला. प्रा. मालती कदम व प्रा. भगवान ठाकूर यांच्या प्रश्नांमुळे ही मुलाखत रंगतदार झाली. प्रा. पुं. म. चित्ते यांनी शेवाळकर यांचा परिचय करून दिला.

२४ फेब्रुवारी ९३ रोजी ६६ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. विद्याधर गोखले यांचा सत्कार करण्यात आला. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी ख्यातनाम नाटककार प्रा. अनिल सोनार होते. प्रा. पुरुषोत्तम पाटील यांच्या हस्ते श्री. गोखले यांचा शाल व श्रीफल देऊन सत्कार करण्यात आला.

१४ मार्च रोजी मसाप धुळे शाखा, गरुड वाचनालय व संगर प्रकाशन यांच्या संयुक्त विद्यमाने कार्याध्यक्ष डी. बी. जगत्पुरिया यांच्या 'ठिणगी' काव्यसंग्रहाचा प्रकाशन सोहळा 'अस्मितादर्श' चे संपादक डॉ. गंगाधर पानतावणे यांच्या हस्ते पार पडला. अध्यक्ष म्हणून डॉ. श्रीपाल सबनीस उपस्थित होते. सर्वश्री प्रा. अनिल सोनार, प्रा. पुरुषोत्तम पाटील, वा. रा. सोनार, त्र्यंबक सपकाळे, गुलाबराव वोरसे, पी. बी. सांगळे, जगतराव सोनवणे, सुरेश खोपडे, चन्द्रकांत शिरोळे, नंदलाल अग्रवाल इत्यादी मान्यवर प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते.

प्रास्ताविक व स्वागत मनोहर पाटील यांनी केले. 'ठिणगी' तील अंगार घेऊन येणाऱ्या कविता संस्कृतीची पडझड व्यक्त करतात. एका समर्थ, आश्वासक कवीचे दर्शन 'ठिणगी'तील कविता वाचताना घडते, असा गौरव डॉ. पानतावणे यांनी आपल्या भाषणामध्ये केला. या मूल्यगर्भ कवितांना कुठलेही लेबल लावण्याची गरज नाही, असे सांगून परिवर्तनसन्मुख विचार पेरणारी कविता म्हणून प्रा. डॉ. सबनीस यांनी 'ठिणगी'चा गौरव केला. प्रा. डॉ. कृष्णा पोतदार यांनी संदेशवाचन केले. प्रा. भगवान ठाकूर यांनी पाहुण्यांचा परिचय करून दिला. सूत्रसंचालन जगदीश देवपूरकर यांनी, तर आभारप्रदर्शन कवी सतीश कुलकर्णी यांनी केले.

**२६ मार्च :** महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या केन्द्रीय कार्यालयाने केलेल्या आर्थिक

सहकार्यातून न्यायमूर्ती रानडे स्मृतिनिमित्त प्राचार्य मा. य. वैद्य व प्रा. डॉ. प्र. न. देशपांडे यांची 'न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे- व्यक्तित्व आणि कर्तृत्व' या विषयावर व्याख्याने झाली. उभय वक्त्यांनी आपल्या भाषणांतून न्या. रानडेंच्या जीवनकार्याचा विविध बाजूंनी वेध घेतला. अध्यक्ष म्हणून डॉ. रा. भ. चौधरी उपस्थित होते. प्रा. सौ. लीला देवरे यांनी आभार मानले.

३० मार्च रोजी मर्ढेकर स्मृतिनिमित्त सुप्रसिद्ध समीक्षक प्रा. भा. ज. कविमंडन यांचे भाषण झाले. प्रा. सौ. स्नेहल बोरसे यांचेही 'विनायकांची कविता' या विषयावर भाषण झाले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी श्री. वा. रा. सोनार उपस्थित होते. मर्ढेकरांची कविता अश्लील व दुर्बोध नसून ती अत्यंत सुस्पष्ट आहे, त्यांची कविता समाजाचे प्रतिरूपच आहे, असा गौरव प्रा. कविमंडन यांनी आपल्या भाषणातून केला. प्रास्ताविक डी. बी. जगत्पुरीया यांनी, तर सूत्रसंचालन प्रा. भगवान ठाकूर यांनी केले. प्रा. पुरुषोत्तम पाटील यांच्या हस्ते वा. रा. सोनार यांचा, साठी पूर्ण केल्याबद्दल परिषदेच्या वतीने शाल-श्रीफल देऊन सत्कार करण्यात आला. कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी प्रा. सौ. राजश्री शेलकर प्रा. सौ. उषा पाटील यांनी सहकार्य केले.

पत्रिकेच्या मागील (क्र. २६४) अंकामध्ये धुळे शाखेच्या कार्यवृत्तात प्रसिद्ध कथालेखिका उज्ज्वला कुलकर्णी असा कथाकथनाच्या संदर्भात उल्लेख झालेला आहे. तो चुकीचा असून ते कथाकथन नंदूरबारचे श्री. उज्ज्वल कुलकर्णी यांनी सादर केले होते.

**डी. बी. जगत्पुरिया,** कार्याध्यक्ष

**बारामती शाखा**

मराठीतील ज्येष्ठ कथाकार श्री. अरविंद गोखले यांचे २४ ऑक्टोबर ९२ रोजी, तर त्यानंतर थोड्याच दिवसांत सोलापूरचे प्रसिद्ध लोककवी श्री. रा. ना. पवार यांचे निधन झाले. त्यांच्या साहित्य क्षेत्रातील स्मृती जागविण्यासाठी कै. अरविंद गोखले यांच्या मासिक स्मृतिदिनी (२४ नोव्हेंबर ९२) बारामतीमधील कविवर्य मोरोपंत वाचनालयाच्या सभागृहात स्मृतिकार्यक्रम आयोजित करण्यात आला. म. सा. प. च्या बारामती शाखेचे उपाध्यक्ष श्री. र. द. मावळणकर अध्यक्षस्थानी होते.

त्यानंतर कार्याध्यक्ष श्री. अनंत सुमंत यांनी कै. गोखले यांचे गुणवर्णन करणारा व त्यांना श्रद्धांजली अर्पण करणारा लेख वाचून दाखविला. तसेच कै. गोखले यांच्या 'मानलेला जावई' या कथेचा परामर्श घेतला. श्री. अवधूत कुलकर्णी यांनी कै. गोखले यांच्या 'मंजुळा' या कथासंग्रहामधील 'माहेर', 'झेप', व 'मंजुळा' या कथांच्या लेखन-वैशिष्ट्यांवर प्रकाश टाकला. त्यानंतर कै. गोखले यांच्या साहित्यावर झालेल्या चर्चेत सहभाग घेऊन कार्यवाहा सौ. कुसुम जगदाळे, कार्यवाह श्री. संदीप सुभेदार व कार्य सदस्य प्रा. मुरुमकर यांनी विचार व्यक्त केले.

लोककवी कै. रा. ना. पवार यांच्या साहित्याचा परामर्श करून देणाऱ्या लेखाचे वाचन कार्यवाह श्री. संदीप सुभेदार यांनी केले, तर कार्यक्रमाचे अध्यक्ष श्री. व. द. मावळणकर यांनी कै. रा. ना. पवार यांच्या अखेरच्या काळातील 'जीवनाचे शिल्प' या कवितेचे स्पष्टीकरणासह



अनुक्रमणिका






वाचन केले. कै. रा. ना. पवार यांच्या साहित्यावरील चर्चेत सर्वश्री डॉ. के. बी. आटोळे, रघुनाथ जगदाळे, श्री. अनंत सुमंत, संदीप सुभेदार, श्री. अनिल गलांडे व कु. अनुपमा इनामके व कु. स्वाती इनामके या कवींनी सहभाग घेतला.

कार्यक्रमाचा समारोप करताना कार्यक्रमाचे अध्यक्ष श्री. व. द. मावळणकर यांनी, 'कै. गोखले यांनी त्यांच्या काळात मराठी कथेला वेगळे वळण लावले. त्याप्रमाणे नव्या कथाकारांनी आताच्या कथेला पुन्हा काळानुरूप वळण देण्याचा प्रयत्न करावा, तसेत कै. रा. ना. पवार यांच्यासारख्या उपेक्षित असलेल्या कवींचा व गद्य साहित्यिकांचा शोध घेऊन त्यांना व्यासपीठ मिळवून देणे, हीच खऱ्या अर्थाने त्यांना श्रद्धांजली ठरेल, असे मत व्यक्त केले.

**संदीप सुभेदार,** कार्यवाह

**फलटण शाखा**

श्री. रमेश मंत्री यांच्या मार्गदर्शनाखालील साहित्य यात्रेचे फलटण शहरात १० फेब्रुवारी रोजी आगमन झाले. त्यानिमित्त माध्यमिक विद्यालयातील शिक्षक व विद्यार्थी यांच्या समवेत ग्रंथदिंडी क्रांतिसिंह नाना पाटील पुतळ्यापासून निघाली. या ग्रंथदिंडीचा शुभारंभ श्री. सुभापराव शिंदे ह्यांच्या हस्ते आणि श्री. सुभापराव वेडके ह्यांच्या अध्यक्षतेखाली झाला.

या वेळी फलटण तालुक्यातील साहित्यिकांच्या सूचीचे प्रकाशन झाले. याच वेळी विविध नामवंत लेखकांच्या पुस्तकांचे प्रदर्शनही मुधोजी हायस्कूलच्या ड्रॉइंग हॉलमध्ये आयोजित केले होते.

**श्रीराम वेडकिहाळ,** कार्यवाह

**श्रीरामपूर शाखा**

१९९२ ते १९९५ ह्या तीन वर्षांसाठी पुढीलप्रमाणे पदाधिकारी व कार्यकारिणी सदस्य एकमताने निवडण्यात आले. अध्यक्ष – ॲड. रावसाहेब शिंदे, उपाध्यक्ष– डॉ. शरदराव आगाशे, कार्याध्यक्ष– प्रा. डॉ. र. बा. मंचरकर, कोषाध्यक्ष– प्रा. सौ. मंजिरी सोमाणी, कार्यवाह– सौ. मीनाताई जगधने व प्रा. डॉ अविनाश वि. कांबळे, कार्यकारिणी सदस्य– प्रकाश निकम पाटील, सौ. शशिकलाताई शिंद्रे, डी. जी. पोखरकर, दिनकर पोखरकर, प्रा. विश्वास काळे, सौ. सुमतीताई लांडे, सौ. मंगलाताई काजळे, प्रा. प्रकाश देशमुख, श्री. मधुकर कारखानीस, प्राचार्य शिवाजीराव भोर (स्वीकृत सदस्य), प्रभाकर विसपुते (निमंत्रित सदस्य)

**११ जानेवारी– 'कवितेच्या गावा जावे' (काव्यवाचन-काव्यगायनपर कार्यक्रम)** : ह्या कार्यक्रमात अरुण म्हात्रे, अशोक बागवे, अशोक नायगावकर, निरंजन उजगरे, सौमित्र व प्रकाश होळकर या कवींनी काव्यवाचन- काव्यगायन केले. सूत्रसंचालन सौ. सुमती लांडे ह्यांनी केले. प्रास्ताविक प्रा. डॉ. अविनाश वि. कांबळे ह्यांनी, तर आभारप्रदर्शन प्रा. सौ. मंजिरी सोमाणी ह्यांनी केले.

**२६ फेब्रुवारी– सौ. सुनीता देशपांडे लिखित 'आहे मनोहर तरी. . .' वर टिपणवाचन व**



अनुक्रमणिका





**चर्चा** : या कार्यक्रमात प्रा. सौ विद्या थिगळे, सौ. मंजिरी सोमाणी व सौ. मीना जगधने यांनी टिपणे वाचली. त्यानंतर उपस्थितांनी त्यावर चर्चा केली. तीत ॲड. रावसाहेब शिंदे, प्राचार्य शिवाजीराव भोर, प्रा. डॉ. र. बा. मंचरकर आदी मान्यवरांनी भाग घेतला.

**२९ मार्च– 'साहित्यसंवाद'**: ह्या कार्यक्रमात श्री. मधुकर कारखानीस ह्यांनी 'छत्रपती लॉजमध्ये शिवाजी महाराज' ह्या आपल्या विनोदी कथेचे वाचन केले. डॉ. शरद आगाशे ह्यांनी वा. भ. बोरकरांची त्यांना आवडलेली 'तू गेल्यावर' ही कविता वाचून तिच्यावर स्वानुभवावर आधारित भाष्य केले. डॉ. अविनाश वि. कांबळे ह्यांनी 'गझल' काव्यप्रकार व मराठीतील त्याची वाटचाल ह्या विषयावर माहिती देऊन स्वतःच्या चार गझलांचे वाचन केले. नंतर झालेल्या चर्चेत डॉ. र. बा. मंचरकर, प्रा, ब. ह. विलायते, प्रा. डॉ. सदाशिव कदम, सौ. मेघा किराणे, सौ. श्यामला द्रविड इ. नी. भाग घेतला होता. प्रास्ताविक सौ. मीनाताई जगधने ह्यांनी, तर आभारप्रदर्शन प्रा. सौ. मंजिरी सोमाणी ह्यांनी केले.

**डॉ. अविनाश कांबळे,** कार्यवाह

**सोनई शाखा**

मुळा सहकारी साखर कारखान्यावर प्राचार्य विजय कसबेकर यांच्या उपस्थितीत स्थानिक कविसंमेलनाचा कार्यक्रम महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सोनई शाखेने आयोजित केला होता.

कवितेमध्ये उत्कटता व अनुभूतीची प्रचीती येणे आवश्यक आहे, असे उद्‌गार प्राचार्य विजय कसबेकर यांनी नवकवींना मार्गदर्शन करताना काढले.

या कविसंमेलनात प्राचार्य उत्तमराव लोंढे, श्री. दशरथराव जाधव, शनैश्वर माध्यमिक विद्यालयाचे श्री. जमधडे, पोंधे, चव्हाण, श्री. विजय नांगरे, सौ. मंगल गायकवाड, सौ. वत्सला चौधरी, सौ. जयश्री देसाई यांनी भाग घेतला. या प्रसंगी मुळा सहकारी साखर कारखान्याचे मुख्य शेतकी अधिकारी श्री. डी. आर. लटमाळे, चीफ अकौंटंट श्री. एस. टी. चौधरी, उपमुख्य शेतकी अधिकारी श्री. डी. एन. गायकवाड, विजय गोरे, कु. प्रीती देसाई, कु. भक्ती देसाई आदी उपस्थित होते. कार्यक्रमाचे संयोजन कार्यवाह श्री. नामदेवराव देसाई यांनी केले.

मुळा सहकारी साखर कारखान्याचे डिस्टीलरी विभागातील अधिकारी लेखक-कवी श्री. विजय नांगरे यांच्या पैठणी प्रकाशनने प्रकाशनने प्रकाशित केलेल्या 'शिल्पकार' या कादंबरीचे प्रकाशन प्रा. विजय कसबेकर यांच्या हस्ते २७ मार्च रोजी करण्यात आले. हा प्रकाशन समारंभ मुळा सहकारी साखर कारखाना व महाराष्ट्र साहित्य परिषद, सोनई शाखा यांनी संयुक्तरीत्या आयोजित केला होता. समारंभाच्या अध्यक्षस्थानी मुळा सहकारी साखर कारखान्याचे सरव्यवस्थापक श्री. के. एन. मोरे होते. प्रमुख अतिथी म्हणून मुळा सहकारी साखर कारखान्याचे कार्यकारी संचालक व महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सोनई शाखेचे कार्याध्यक्ष श्री. विनायकराव आंबरे पाटील होते.

मुळा सहकारी साखर कारखान्याचे जनसंपर्क अधिकारी श्री. नामदेवराव देसाई यांनी प्रा. विजय कसबेकर यांचा परिचय करून दिला. श्री. एस. बी. शेटे, श्री. नागपुरे, व प्रा. चव्हाण

सर यांनी श्री. विजय नांगरे यांचा परिचय करून दिला.

प्राथमिक शिक्षकांच्या जीवनावरील ही कादंबरी वाचकांस लोकप्रिय होईल, असा विश्वास प्रा. विजय कसवेकर यांनी व्यक्त केला.

**नामदेवराव देसाई, कार्यवाह**

**इस्लामपूर शाखा**

२ एप्रिल रोजी इस्लामपूरच्या शाखेच्या फलकाचा अनावरण समारंभ कर्मवीर भाऊराव पाटील कॉलेजचे श्री. रा. पा. निपाणीकर यांचे हस्ते साजरा झाला. या प्रसंगी कवी अरुण महाळुंगकर, विलास परदेशी, प्रदीप सांगावकर व राजेंद्र हिरवे यांनी आपल्या कविता सादर केल्या.

७ मे रोजी इस्लामपूर येथील ख्यातनाम वकील ॲडव्होकेट श्री. एम. वाय. कुलकर्णी यांचे साहित्य, अश्लीलता व अब्रुनुकसानी या विषयावर उद्‌बोधक व्याख्यान झाले. स्वागत व प्रास्ताविक प्रा. मधुकर हसमनीस यांनी केले. पाहुण्यांची ओळख विलास नरहर कुलकर्णी यांनी करून दिली.

या प्रसंगी महाराष्ट्र साहित्य परिषदेने जानेवारी ९३ मध्ये घेतलेल्या प्रथमा परीक्षेत इस्लामपूर येथील विद्यार्थिनी कु. संध्या शामराव पारगांवकर हिचा दुसरा क्रमांक आल्याने तिचा सत्कार प्रमुख पाहुण्यांच्या हस्ते करण्यात आला.

कार्यक्रमाचे सूत्रसंचालन प्रा. दीपक स्वामी यांनी केले. प्रा. प्रदीप शिरसट पाटील यांनी आभार मानले. समारंभाच्या अध्यक्षस्थानी प्रा. डॉ. मधुकर हसमनीस होते.

इस्लामपूर शाखा आणि राजारामबापू पाटील ज्ञान प्रबोधिनी यांच्या संयुक्त विद्यमाने १६ फेब्रुवारी रोजी सायंकाळी भरतनाट्यम नृत्य सादरीकरण कार्यक्रम पार पडला. नृत्य शिक्षक श्री. व्यंकटेश परुळेकर कोल्हापूर, यांचा या प्रसंगी शाल, श्रीफळ देऊन प्रा. शामराव पाटील यांनी सत्कार केला. या सादरीकरणामध्ये कु. रूपाली फार्णे, कु. रूपाली महाळुंगकर, कु. ऋचा शहा, कु. स्वरदा शहा, कु. प्राची शहा, कु. अदिती जोशी, कु. स्मिता चौगुले, कु. मनीषा हसमनीस, कु. कादंबरी पाटील, कु. प्रज्ञा देशपांडे, कु. संध्या शहा, कु. सोनाली फार्णे, कु. कृष्णा देशपांडे यांनी नृत्य सादर केले. परिषदेचे अध्यक्ष रंगराव बापू पाटील यांच्या हस्ते सर्व मुलींना भेटवस्तू देण्यात आल्या. कार्याध्यक्ष प्रा. एम. एस. हसमनीस यांनी प्रास्ताविक व पाहुण्यांची ओळख करून दिली. प्रा. प्रदीप शिरसाट पाटील यांनी आभार मानले.

**शहानवाझ ज. मुल्ला, कार्यवाह**

□

---

**साभार स्वीकार**

१५. **परिक्रमा ३**– लता राजे, श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे २८९, मूल्य १००/- रुपये.

१६. **विश्व विदेश सेवेचे**– हेमा देवरे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे १८२, मूल्य ७५/-रुपये.

# महाराष्ट्र साहित्य परिषद

टिळक रस्ता, पुणे ४११०३०
फोन नं. ४४ २९ ६३

- वार्षिक साधारण सभेची सूचना
- वार्षिक कार्यवृत्त १९९२-९३
- हिशेबपत्रके १९९२-९३
- अर्थसंकल्प १९९३-९४



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद

टिळक रस्ता, पुणे ४११०३०

## वार्षिक साधारण सभेची सूचना

स.न.वि.वि.

महाराष्ट्र साहित्य परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार दिनांक २५ जुलै १९९३ रोजी पुणे येथे माधवराव पटवर्धन सभागृहात सायंकाळी ४-३० वाजता भरणार आहे. या सभेला सभासदांनी उपस्थित राहून सहकार्य करावे, अशी विनंती आहे.

या सभेत खालीलप्रमाणे कामकाज होईल :

**सभेत करावयाची कामे**

१) श्रद्धांजली

२) मागील सभेचे कार्यवृत्त वाचून संमत करणे.

३) १९९२-९३ या वर्षाचे कार्यवृत्त संमत करणे.

४) १९९२-९३ चे उत्पन्न-खर्चपत्रक आणि ताळेबंद संमत करणे.

५) १९९३-९४ चा अर्थसंकल्प संमत करणे.

६) १९९३-९४ करिता हिशोब तपासनिसांची नेमणूक करणे.

७) मा. अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळचे विषय.

आपले.

**ना. गो. जोशी**
कोषाध्यक्ष

**म. वि. गोखले**
कार्याध्यक्ष

**सरोजिनी बाबर**
अध्यक्ष

**गं. ना. जोगळेकर**
कार्यवाह

**रवीन्द्र भट**
कार्यवाह

**कल्याणी दिवेकर**
कार्यवाह

**भगवान ठाकूर**
कार्यवाह

---

**विशेष सूचना :**

१) पुरेशी गणसंख्या नसल्यास सभा १५ मिनिटे स्थगित करण्यात येईल व नंतर ती रीतसर सुरू होईल. अशा वेळी गणसंख्येचे बंधन असणार नाही.

२) वरील कामकाजासंबंधी मतदार सभासदांस काही सूचना करावयाच्या असतील वा माहिती पाहिजे असेल, अगर ठराव मांडायचा असेल तर लेखी स्वरूपात तसे १५ जुलै, १९९३ पर्यंत कळवावे.



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे - ३०

वर्ष ८७ वे    वार्षिक कार्यवृत्त– १९९२-९३    नोंदणी क्र. ४०९

**१ एप्रिल ९२ ते ३१ मार्च ९३**

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे १ एप्रिल १९९२ ते ३१ मार्च १९९३ या कालावधीचे कार्यवृत्त सादर करताना आम्हास आनंद होत आहे.

**सभासद**– वर्षारंभी वार्षिक साधारण सभासद ३४२ आणि आजीव सभासद ३८७८ अशी एकूण ४२२० सभासद संख्या होती. १ एप्रिल ९२ ते ३१ मार्च ९३ या कालावधीत नव्याने १०६ आजीव सभासद झाले. व एकूण साधारण सभासद् २४७ झाले. वृत्तान्त सालात ९५ साधारण सभासद कमी झाले त्यामुळे दि. ३१ मार्च ९३ रोजी आजीव सभासद ३९८४ आणि साधारण सभासद २४७ अशी एकूण सभासद संख्या ४२३१ आहे.

**नवीन कार्यकारी मंडळ**

**१ अ**

मार्च १९९२ मध्ये त्रैवार्षिक निवडणूक घेण्यात आली व १-४-१९९२ पासून नवे कार्यकारी मंडळ तीन वर्षांसाठी अस्तित्वात आले. म. सा. परिषदेच्या १-१०-१९९१ पासून अमलात आलेल्या नवीन घटनेनुसार हे नवे कार्यकारी मंडळ खालीलप्रमाणे निवडण्यात आले :

कार्याध्यक्ष– **म. वि. गोखले**

कोषाध्यक्ष– **ना. गो. जोशी**

प्रमुख कार्यवाह– **गं. ना. जोगळेकर**

नवीन घटनेनुसार परिषदेच्या सर्व सभासदांनी यांची निवड केली.

म. सा. पत्रिका संपादक– **श्री. वि. स. वाळिंबे (सौ. ललिता कुंभोजकर** यांची संपादकपदी निवड झाली होती. पण त्यांनी काही कारणाने राजीनामा दिल्यामुळे त्यांच्या जागी कार्यकारी मंडळाने श्री. वि. स. वाळिंबे यांची संपादकपदी निवड केली.)

**१ आ**

कार्यकारी मंडळाचे सदस्य म्हणून खालीलप्रमाणे निवड झाली :

**पुणे शहर** : रवींद्र भट, कल्याणी दिवेकर, वि. भा. देशपांडे, रंगा मराठे, विजय कसबेकर, ह. ल. निपुणगे, संतोष शेणई, शंतनु चिंधडे, सु. वा. जोशी.

**पुणे जिल्हा** : हरी नरके, **ठाणे जिल्हा** : म. पां. भावे, **नाशिक जिल्हा** : सतीश

पिंपळगावकर, **धुळे जिल्हा** : भगवान ठाकूर, **जळगाव जिल्हा** : प्र. श्री. चौधरी, **कोल्हापूर जिल्हा** : पाटलोबा पाटील, **अहमदनगर जिल्हा** : सु. प्र. कुलकर्णी.

ज्या जिल्ह्यांमधून उमेदवारी अर्ज भरले गेले नव्हते, अशा जिल्ह्यांचे कार्यकारी मंडळावरील प्रतिनिधी म्हणून खालीलप्रमाणे निवड करण्यात आली : **सोलापूर जिल्हा** : रा. व्यं. छत्रपती, **सातारा व सांगली जिल्हा** : म. द. हातकणंगलेकर **रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग जिल्हे** : सुरेश जोशी, (श्री. सुरेश जोशी यांनी प्रथम लेखी संमती कळविली होती, पण नंतर आपली असमर्थता त्यांनी पत्राने व्यक्त केली.)

याशिवाय वीणा देव व अरुण खोरे यांची स्वीकृत सदस्य म्हणून कार्यकारी मंडळावर निवड करण्यात आली.

**कार्यकारी मंडळाच्या सभा** : या वृत्तान्ताच्या कालावधीत कार्यकारी मंडळाच्या एकूण ४ सभा झाल्या. दिनांक ५-४-९२, २६-७-९२, २२-१-९३, २८-३-९३ रोजी झालेल्या या सभांना पुढीलप्रमाणे उपस्थिती होती :

| नाव | सभा | नाव | सभा |
|---|---|---|---|
| म. वि. गोखले | ४ | रंगा मराठे | ४ |
| ना. गो. जोशी | ४ | विजय कसबेकर | ४ |
| गं. ना. जोगळेकर | ३ | ह. ल. निपुणगे | ४ |
| रवींद्र भट | ४ | संतोष शेणई | ४ |
| कल्याणी दिवेकर | ४ | शंतनु चिंधडे | ४ |
| वि. भा. देशपांडे | २ | अरुण खोरे | १ |
| म. पां. भावे | ३ | पाटलोबा पाटील | ३ |
| हरी नरके | ४ | सु. वा. जोशी | २ |
| सतीश पिंपळगावकर | ३ | वि. स. वाळिंबे | ३ |
| सु. प्र. कुलकर्णी | ३ | रा. व्यं. छत्रपती | २ |
| भगवान ठाकूर | ४ | म. द. हातकणंगलेकर | २ |
| प्र. श्री. चौधरी | ३ | वीणा देव | २ |

**साहित्यिक आणि सांस्कृतिक कार्यक्रम** :

१० एप्रिल १९९२ : डॉ. वा. ल. मंजूळ यांचे 'गेल्या दशकातील महाराष्ट्रातील सूची व कोशकार्य' या विषयावर व्याख्यान (कै. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त)

१७ एप्रिल १९९२ : श्रद्धांजली सभा नामवंत साहित्यिक मो. रा. वाळंबे, शरच्चंद्र चिरमुले आणि उद्धव शेळके यांच्या निधनाबद्दल शोकसभा आयोजित करण्यात आली.

आदरांजलीपर भाषणे झाली.

२० एप्रिल १९९२ : कै. स. ह. मोडक स्मृतिदिनानिमित्त डॉ. भ. ग. बापट यांचे 'रशियातील क्रांती - काय घडलं ? काय चुकलं ? काय उरलं ?' या विषयावर व्याख्यान.

२२ मे १९९२ : थोर इतिहाससंशोधक कै. शं. ना. जोशी यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ दिले जाणारे पारितोषिक श्रीमती प्रतिभा रानडे यांच्या 'स्त्री प्रश्नांची चर्चा : एकोणिसावे शतक' या ग्रंथास डॉ. सरोजिनी बाबर यांच्या हस्ते देण्यात आले. या निमित्ताने डॉ. विद्युत भागवत यांचे 'एकोणिसाव्या शतकातील स्त्री प्रश्न' या विषयावर व्याख्यान झाले.

२२ जून १९९२ : कै. नाथमाधव यांच्या स्मृत्यर्थ 'हिरोशिमा' या विषयावर श्री. भा. द. खेर यांचे व्याख्यान.

२५ जून १९९२ : कै. का. र. मित्र यांच्या स्मृत्यर्थ डॉ. विश्वास मेहेंदळे यांचे 'वृत्तपत्रे आणि इतर प्रसारमाध्यमे' या विषयावर व्याख्यान.

७ जुलै १९९२ : कै. र. वा. दिघे स्मृतिदिनी प्रा. नीलिमा गुंडी यांचे 'पाणकळाच्या निमित्ताने' या विषयावर व्याख्यान.

२० जुलै १९९२ : कै. वा. म. जोशी यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. अंजली सोमण यांचे 'वामन मल्हारांच्या साहित्यातील स्त्री' या विषयावर व्याख्यान.

२२ जुलै १९९२ : कै. ग. ल. ठोकळ यांच्या स्मरणार्थ रु. १००१/- चा पुरस्कार श्री. उत्तम बावस्कर यांच्या 'बुजगावनं' या कथासंग्रहास डॉ. आनंद यादव यांच्या हस्ते देण्यात आला. या निमित्ताने डॉ. आनंद यादव यांचे 'ग्रामीण साहित्याच्या चळवळीला तात्त्विक अधिष्ठान आहे काय ?' या विषयावर व्याख्यान.

३० व ३१ जुलै १९९२ : संतश्रेष्ठ सावतामहाराज यांच्या स्मृत्यर्थ गुरुवार दि. ३० जुलै रोजी डॉ. अशोक कामत यांचे 'संत साहित्यावरील आक्षेप' व शुक्रवार दि. ३१ जुलै रोजी डॉ. अंजली कान्हेरे यांचे 'संत साहित्यातील स्त्री जीवन' या विषयांवर भाषणे झाली.

१० ऑगस्ट १९९२ : श्री. रंगनाथ पठारे लिखित 'टोकदार सावलीचे वर्तमान' (मॅजेस्टिक प्रकाशन) या कादंबरीस श्री. शंकर पाटील पुरस्कार डॉ. भालचंद्र फडके यांच्या हस्ते देण्यात आला.

१९ ऑगस्ट १९९२ : कै. पु. भा. भावे यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. न. म. जोशी यांचे 'पु. भा. भावे यांच्या जीवननिष्ठा' या विषयावर व्याख्यान.

१४ सप्टेंबर १९९२ : कै. बालकवी यांच्या स्मृतिदिनानिमित्त सोमवार दि. १४ सप्टेंबर १९९२ रोजी झालेल्या कवितावाचनात हेमंत जोगळेकर, सतीश देवपूरकर, संतोष शेणई, परशुराम देशपांडे, प्रल्हाद अवचट, भारती पांडे, स्वाती सामक, माधवी पटवर्धन, आसावरी काकडे, विजया संगवई, शीला निपुणगे हे सहभागी झाले. सूत्र

**६ ऑक्टोबर १९९२ :** म. म. कै. दत्तो वामन पोतदार यांच्या स्मृतिदिनानिमित्त प्रा. डॉ. अरविंद देशपांडे यांचे 'इतिहासाचा मागोवा' या विषयावर व्याख्यान झाले. या वर्षीच्या दत्तो वामन पोतदार पारितोषिकासाठी श्री. सेतुमाधव पगडी यांच्या 'एका माळेचे मणी' या ग्रंथाची निवड झाली.

**९ ऑक्टोबर १९९२ :** कै. विद्याधर पुंडलिक यांच्या स्मृतिदिनी प्रा. म. द. हातकणंगलेकर यांच्या हस्ते 'कै. विद्याधर पुंडलिक पुरस्कार' प्रा. चंद्रकांत पाटील यांच्या 'चौकटीबाहेरील चेहरे' या व्यक्तिचित्रात्मक पुस्तकास देण्यात आला.

**४ व ५ नोव्हेंबर १९९२ :** सुप्रसिद्ध नाट्यरसिक कै. व. ह. गोळे यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. म. वि. गोखले यांची दि. ४ व ५ नोव्हेंबर रोजी दोन भाषणे झाली. विषय : 'राजकीय रंगाची नाटके.'

**४ जानेवारी १९९३ :** कै. श्री. म. माटे यांच्या स्मृत्यर्थ डॉ. सरोजिनी बाबर, म. श्री. दीक्षित व गं. ना. जोगळेकर यांची भाषणे झाली.

**७ जानेवारी १९९३ :** ६६ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे नवनिर्वाचित अध्यक्ष श्री. विद्याधर गोखले यांचा प्रकट सत्कार डॉ. सरोजिनी बाबर यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आला. या प्रसंगी श्री. अनंतराव पाटील, डॉ. म. वि. गोखले यांची भाषणे झाली. श्री. विद्याधर गोखले यांनी सत्कारास उत्तराचे भाषण केले.

**१५ जानेवारी १९९३ :** रविकिरण मंडळाचे ज्येष्ठ कवी कै. प्रा. श्री. वा. रानडे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त प्रा. द. ता. भोसले (पंढरपूर), सौ. कुंदा पारसनीस, प्रा. देवदत्त दाभोलकर आणि डॉ. गं. ना. जोगळेकर यांची भाषणे झाली.

**१८ जानेवारी १९९३ :** कै. वि. द. घाटे यांच्या स्मृत्यर्थ डॉ. अनुराधा पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलन आयोजित करण्यात आले. सूत्रसंचालन डॉ. कल्याण इनामदार यांनी केले.

**१९ जानेवारी १९९३ :** दरवर्षी विनोदी पुस्तकाच्या लेखकास व प्रकाशकास कॉंटिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत चिं. वि. जोशी पारितोषिक देण्यात येते. या वर्षी 'पिकॅडेली सर्कस व इतर विनोदी लेख' (लेखक व प्रकाशक श्री. माधव भावे) या पुस्तकास हे पारितोषिक देण्यात आले. या निमित्ताने श्री. मंगेश तेंडुलकर यांचे 'व्यंगचित्रे व विनोद' या विषयावर व्याख्यान झाले.

**२० फेब्रुवारी १९९३ :** म. सा. परिषद, पुणे व मराठी अभ्यास परिषद पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने ख्यातनाम भाषाशास्त्रज्ञ प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांच्या जन्मशताब्दी निमित्ताने डॉ. माधव देशपांडे यांचे 'संस्कृत व प्राकृत : भाषिक आणि सामाजिक संबंध' या विषयावर व्याख्यान झाले.

पुरुषोत्तम चित्रे यांच्या 'एकूण कविता - भाग १' (पॉप्युलर प्रकाशन, मुंबई) या संग्रहास डॉ. अनुराधा पोतदार यांच्या हस्ते देण्यात आला. परीक्षकांच्या वतीने डॉ. शंतनु चिंधडे काव्यसंग्रहावर बोलले.

**९ मार्च १९९३ :** महाराष्ट्र-कवी यशवंत पुरस्कारासाठी श्री. गोविंद कुलकर्णी यांच्या 'तीन रंगाचे इंद्रधनुष्य' (स्वयंप्रभा प्रकाशन, नांदेड) या पुस्तकाची निवड करण्यात आली. पारितोषिक वितरण समारंभ सुप्रसिद्ध कवयित्री श्रीमती शांता शेळके यांच्या हस्ते झाला. डॉ. वि. म. कुलकर्णी व डॉ. शंतनु चिंधडे यांची या वेळी भाषणे झाली.

**१० मार्च १९९३ :** कै. आहिताग्नी शंकर रामचंद्र राजवाडे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ डॉ. मधुकर आष्टीकर यांचे 'वेदकालीन स्त्रिया' या विषयावर व्याख्यान झाले.

**२६ मार्च १९९३ :** न्या. महादेव गोविंद रानडे यांच्या जन्माला १५० वर्षे पूर्ण झाल्याच्या निमित्ताने न्यायमूर्तींच्या जीवनकार्याच्या विविध पैलूंचे दर्शन घडविणाऱ्या विशेष कार्यक्रमात प्रा. ग. प्र. प्रधान (न्या. रानड्यांचे राजकारण व समाजकारण), डॉ. आनंद नाडकर्णी (न्या. रानड्यांचे अर्थकारण), डॉ. सदानंद मोरे (न्या. रानड्यांचे धर्मकारण) यांची व्याख्याने झाली.

**३० मार्च १९९३ :** श्री. ना. गो. चापेकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त श्री. रवींद्र भट यांचे 'भारतीय संस्कृतीमधील प्रयत्नवाद' या विषयावर व्याख्यान.

**का. र. मित्र शारदीय व्याख्यानमाला :**

दरवर्षीप्रमाणे या वर्षाची का.र.मित्र शारदीय व्याख्यानमाला ७-१२-९२ ते १६-१२-९२ या कालावधीत आयोजित करण्यात आली होती. या मालेत 'एकोणिसावे शतक : महाराष्ट्रातील प्रबोधन' या विषयावर खालीलप्रमाणे व्याख्याने आयोजित करण्यात आली :

| | दिनांक | विषय | वक्ते |
|---|---|---|---|
| १) | ७-१२-९२ | महाराष्ट्रातील संक्रमणकाळ | डॉ. य. दि. फडके |
| २) | ८-१२-९२ | दादोबा पांडुरंग | डॉ. गं. ना. जोगळेकर |
| ३) | ९-१२-९२ | लोकहितवादी | डॉ. निर्मलकुमार फडकुले |
| ४) | १०-१२-९२ | महात्मा फुले | श्री. हरी नरके |
| ५) | ११-१२-९२ | विष्णुबुवा ब्रह्मचारी | प्रा. राम बापट |
| ६) | १२-१२-९२ | न्यायमूर्ती रानडे | डॉ. राजेंद्र व्होरा. |
| ७) | १३-१२-९२ | विष्णुशास्त्री चिपळूणकर | प्रा. माधवी [illegible] |
| ८) | १४-१२-९२ | गोपाळ गणेश आगरकर | प्रा. ग. प्र. प्रधान |
| ९) | १५-१२-९२ | पंडिता रमाबाई | श्रीमती ज्योत्स्ना देवधर |

या सर्व व्याख्यानांना श्रोत्यांचा मोठा प्रतिसाद मिळाला.

**परिषदेचा वर्धापन दिन :**

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा ८६वा वर्धापन-दिन समारंभ बुधवार २७ मे १९९२ रोजी ज्येष्ठ साहित्यिक श्री. गोपीनाथ तळवलकर यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. कार्याध्यक्ष डॉ. म. वि. गोखले यांनी प्रास्ताविक केले. म. सा. परिषदेच्या अध्यक्षा डॉ. सरोजिनी बाबर यांच्या हस्ते श्री. गोपीनाथ तळवलकर यांचा सत्कार करण्यात आला.

या समारंभाच्या प्रसंगी 'महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक' रु. ३००० व मानचिन्ह ज्येष्ठ लेखिका श्रीमती मालतीबाई बेडेकर यांना देण्यात आले. पारितोपिकासंबंधी डॉ. कल्याणी दिवेकर यांनी निवेदन केले.

महाराष्ट्र साहित्य परिषदेने साहित्यिक साहाय्यनिधीची योजना कार्यान्वित केली आहे. या योजनेनुसार या वर्षी श्री. सदानंद भिडे यांना सन्मानपूर्वक अर्थसाहाय्य देण्यात आले.

कै. भीमराव कुलकर्णी पुरस्कारासंबंधी डॉ. वि. भा. देशपांडे यांनी निवेदन केले. अध्यक्षांच्या हस्ते श्री. वसंतराव आगाशे यांना कै. डॉ. भीमराव कुलकर्णी पुरस्कार प्रदान करण्यात आला.

म.सा. परिषदेच्या ग्रंथ-पारितोषिकांसंबंधी निवेदन श्री. रवींद्र भट यांनी केले. अध्यक्षांच्या हस्ते पारितोषिकांचे वितरण झाले.

शेवटी समारंभाचे अध्यक्ष श्री. गोपीनाथ तळवलकर यांचे भाषण झाले. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले आणि संपूर्ण कार्यक्रमाचे संयोजन कार्यवाह श्री. रवींद्र भट यांनी केले.

**वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालय :**

परिषदेच्या वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयाचा लाभ सुमारे १०४५ सभासद घेत आहेत. वर्षारंभी ग्रंथसंख्या २६,४९६ ही होती. त्यात मार्च ९३पर्यंत ८१४ पुस्तकांची भर पडली, त्यामुळे आता ग्रंथसंख्या २७,३१० इतकी झाली.

**विभागीय संमेलन :**

डोंबिवली आणि कल्याण शाखांच्या संयुक्त विद्यमाने २२,२३ आणि २४ जानेवारी रोजी डोंबिवली येथील ध. ना. चौधरी विद्यालयाच्या प्रांगणात उभारलेल्या भव्य मंडपात विभागीय साहित्य संमेलन संपन्न झाले. अध्यक्षस्थानी सुप्रसिद्ध साहित्यिक **प्रा. द. मा मिरासदार** होते. उत्कृष्ट रंजन कार्यक्रम, प्रबोधन करणारे विविध परिसंवाद, सर्व शाखांचे



अनुक्रमणिका






साहित्य संमेलनाचे अध्यक्ष **श्री. विद्याधर गोखले** यांची सडेतोड मुलाखत, भव्य साहित्य दिंडी अशा भरगच्च कार्यक्रमामुळे, काही काळापूर्वी मुंबई येथे निर्माण झालेल्या अशांत उद्रेकाच्या परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर मुंबईच्या उंबरठ्यावर असलेल्या या उपनगरीय परिसरात एक शांत आणि आनंददायी वातावरण निर्माण होण्यास मदत झाली. सिडकोचे अध्यक्ष मा. नकुल पाटील, खासदार राम कापसे, कल्याण शाखेचे श्री. प्रभाकर संत, डोंबिवलीचे श्री. दिलीप महाजन तसेच दोन्ही शाखांचे अनेक उत्साही कार्यकर्ते यांच्या अखंड परिश्रमाने हे संमेलन सर्वार्थाने यशस्वी झाले.

**शाखा मेळावा :**

दिनांक २९ नोव्हेंबर १९९२ रोजी वाई शाखेच्या सहकार्याने शाखा मेळावा आयोजित करण्यात आला. एकूण १८ शाखांचे पन्नासच्या वर प्रतिनिधी उपस्थित होते. या मेळाव्यामुळे परस्परसंपर्क आणि सहकार्याची भावना वाढीस लागण्यास मदत झाली. पुणे केंद्राचे सर्व पदाधिकारी मार्गदर्शन करण्यासाठी मेळाव्यामध्ये सहभागी झाले होते. त्याच दिवशी कवी माधव जूलियन यांच्या स्मृतिदिनानिमित्त स्थानिक आणि बाहेरगावचे प्रतिनिधी यांच्या सहकार्याने डॉ. अरुणा ढेरे यांच्या अध्यक्षतेखाली एक कविसंमेलनही आयोजित करण्यात आले.

**संलग्न संस्था :**

वाई येथील लोकमान्य टिळक स्मारक मंदिर ही संस्था गेली पंचाहत्तर वर्षे वाईतील सांस्कृतिक, साहित्यिक आणि सार्वजनिक जीवनात मोलाची भर घालीत आहे. या वर्षी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाने लोकमान्य टिळक संस्थेस संलग्न संस्था म्हणून मान्यता दिली. आता म. सा. परिषद वाई शाखा आणि ही संस्था यांच्या संयुक्त विद्यमाने वाई येथे विविध कार्यक्रम आयोजित करता येतील.

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाकडून या वर्षी महाराष्ट्र साहित्य पत्रिकेसाठी अनुदान मिळाले, याबद्दल परिषद मंडळाची आभारी आहे.

वृत्तान्त वर्षात पत्रिकेचे चार अंक प्रकाशित करण्यात आले. अंक क्र. – २६३ ऑक्टोबर-डिसेंबर १९९२ चा दिवाळी अंक म्हणून प्रसिद्ध झाला.

**महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे प्रतिवर्षी देण्यात येणाऱ्या विविध पारितोषिकांसाठी १९९२ सालाकरिता निवडलेली पुस्तके :**

- **१) हरि नारायण आपटे पारितोषिक (कादंबरी)**

● २) **वा. म. जोशी पारितोषिक (कादंबरी)**
'खंडाळ्याच्या घाटासाठी'– शुभदा गोगटे, शुभदा-सारस्वत प्रकाशन, पुणे. १०००/-

● ३) **ह. स. गोखले पारितोषिक (कविता)**
'वाटेवरच्या कविता'– अशोक नायगावकर, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई. रुपये ३००/-

● ४) **नी. स. गोखले पारितोषिक (कथा)**
'स्पष्टवक्तेपणाचे प्रयोग'– रंगनाथ पठारे, साकेत प्रकाशन. रुपये ३००/-

● ५) **आनंदीबाई शिर्के पारितोषिक (कथा)**
'कृष्णकिनारा'– अरुणा ढेरे, सुरेश एजन्सी, पुणे. रुपये १०००/-

● ६) **अ. स. गोखले पारितोषिक (उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती)**
'भरतनाट्यम'– एक कला, एक हठयोग !, लेखिका, प्रकाशिका- शोभा जोशी, मुंबई. रुपये ३००/-

● ७) **गिरिजा गंगाधर जांभेकर, पारितोषिक (संपादित ग्रंथ)**
'काळाच्या पडद्याआड'– प्रा. द. पं. जोशी, मराठी साहित्य परिषद, आंध्रप्रदेश. रुपये १००/-

● ८) **ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक (समीक्षा)**
'इब्सेन : व्यक्ती आणि नाटक'– अनिरुद्ध कुलकर्णी, कॉंटिनेन्टल प्रकाशन, पुणे. रुपये ५००/-

● ९) **तुळशीराम वाघ पारितोषिक (संत वाङ्मय)**
'ज्ञानेश्वरांची साहित्यदृष्टी आणि सृष्टी'– प्रा. गो. म. कुलकर्णी, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. रुपये २५०/-

● १०) **सुशील प्रधान पारितोषिक (बालवाङ्मय)**
'गाणारं घर'– महावीर जोंधळे, अनुपम प्रकाशन केंद्र, औरंगाबाद. रुपये २००/-

● ११) **विनायक कोंडदेव ओक पारितोषिक (कुमारवाङ्मय)**
'खसखसपूरचे चार बहादर'– कमल राजाज्ञा, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे. रुपये १००/-

● १२) **डॉ. म. वि. गोखले पारितोषिक (नाट्यसमीक्षा)**
'शोकांतिकेचा उदय'– डॉ. विलास खोले, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई. रुपये ७५०/-

● १३) **रा. ना. नातू पारितोषिक (ऐतिहासिक ललित)**
'पोर्तुगीज राजवटीतील स्वातंत्र्यलढ्याची पाने– १५१०-१९४७'– ज. स. सुखठणकर, गोमंतक मराठी अकादमी, पणजी, गोवा. रुपये ७५०/-

● १४) **श्री. शां. हणमंते पारितोषिक (कोश व संदर्भ वाङ्मय)**
'मराठी सारस्वत (द्वितीय खंड)'– अनंत लक्ष्मण जोशी, अनमोल प्रकाशन,

● १५) ललितेतर वैचारिक ग्रंथ

(अ) लोकहितवादी देशमुख पारितोषिक

'भिवंडी दंगल १९८४'– सुरेश खोपडे, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई. रुपये ७५१/-

(आ) शि. म. परांजपे पारितोषिक

'डॉ. बाबासाहेब आंबेडकर-आर्थिक विचार आणि तत्त्वज्ञान'–
डॉ. नरेंद्र जाधव, सुगावा प्रकाशन, पुणे. रुपये २५०/-

(इ) ना. गो. चापेकर पारितोषिक

'आस्तिक शिरोमणी चार्वाक'– डॉ. आ. ह. साळुंखे, सदाशिव बागाईतकर स्मृतिमाला. २५०/-

(ई) विश्वनाथ पार्वती गोखले पारितोषिक

'मराठीच्या अस्मितेचा शोध'– वि. भि. कोलते, श्री विद्या प्रकाशन, पुणे. रु. १५०/-

पारितोषिकांचा निर्णय करण्यासाठी परीक्षक म्हणून पुढील व्यक्तींनी काम पाहिले :

प्रा. निर्मला मोने, डॉ. सुषमा जोगळेकर, डॉ. वि.म. कुलकर्णी, डॉ. शंतनु चिंधडे, श्री. सविता भावे, डॉ. अंजली सोमण, डॉ. मेधा सिधये, श्री. ना. गो. जोशी, डॉ. म. वि. गोखले, डॉ. सु. रा. चुनेकर, डॉ. द. दि. पुंडे, श्री. के. रं. शिरवाडकर, डॉ. रेखा इनामदार-साने, डॉ. मु. श्री. कानडे, डॉ. सदानंद मोरे, श्री. यदुनाथ थत्ते, सौ. लीलावती भागवत, डॉ. विद्या निंबाळकर, डॉ. श्रीरंग संगोराम, श्री. सुरेशचंद्र पाध्ये, प्रा. राजा दीक्षित, डॉ. अरुणा ढेरे, श्री. एकनाथ बागूल, श्री. हरी नरके, डॉ. प्र. ल. गावडे, डॉ. कल्याण काळे आणि डॉ. कल्याणी दिवेकर (निमंत्रक).

**दिवाळी अंक स्पर्धा :**

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे प्रतिवर्षी दिवाळी अंक स्पर्धा घेण्यात येतात. १९९२ च्या दिवाळी अंकांमधून खालील चार अंकांची निवड करण्यात आली. तसेच सर्वोत्कृष्ट ललित लेखही निवडण्यात आला.

● १) अ. स. गोखले स्मृत्यर्थ रत्नाकर पारितोषिक

'सत्याग्रही'– विचारधारा/संपादक– डॉ. कुमार सप्तर्षी. रुपये १००१/-

● २) रावसाहेब मोरमकर पारितोषिक

'अवकडई'– संपादक– चंद्रकांत खोत. रुपये १०१/-

● ३) का. र. मित्र पारितोषिक

'जनवाद'– संपादक– विलास मुत्तेमवार. रुपये १०१/-

● ४) शंकरराव किर्लोस्कर पारितोषिक

'मिळून साऱ्याजणी'– संपादक– विद्या बाळ. रुपये १०१/-

शाभा चित्रे यांच्या 'गौरी गौरी कुठे आलीस ?' या लेखास देण्यात आले.

या स्पर्धेच्या निर्णयासाठी सर्वश्री श्री. प्रसन्नकुमार अकलूजकर, डॉ. वि. भा. देशपांडे आणि डॉ. कल्याणी दिवेकर (निमंत्रक) यांची समिती नेमली होती.

## १९९३ सालातील परीक्षेचे इतिवृत्त

**परीक्षा कार्य**

जानेवारी १९९३ मध्ये झालेल्या मराठीच्या परीक्षांची एकूण केंद्रे ३२ होती. या परीक्षांना बसलेले परीक्षावार उमेदवार पुढीलप्रमाणे :

- **प्रथमा:– १५३१, प्रवेश– ६४७, प्राज्ञ:– ६७, विशारद– ४२**

या सर्व परीक्षांमध्ये यशस्वी झालेले गुणानुक्रमे पहिले तीन उमेदवार पुढीलप्रमाणे :

| | | प्राप्त गुण |
|---|---|---|
| **● प्रथमा:** | १) **केळकर युथिका अनिल**<br>केंद्र– ज्ञानप्रबोधिनी प्रशाला, पुणे | ८६/१०० |
| | २) **पारगावकर संध्या शामकुमार**<br>केंद्र– यशवंत हायस्कूल, इस्लामपूर | ८४/१०० |
| | ३) **देशपांडे अमित कृष्णकुमार**<br>केंद्र– ज्ञानप्रबोधिनी प्रशाला, पुणे | ८३/१०० |
| **● प्रवेश** | १) **कुलकर्णी विदुला विजय**<br>केंद्र– सरस्वती सेकंडरी स्कूल, ठाणे | १६४/२०० |
| | २) **बेर्डे रूपाली भार्गव**<br>केंद्र– टिळकनगर विद्यामंदिर, डोंबिवली | १५६/२०० |
| | ३) **कुलकर्णी दीपांजली अशोक**<br>केंद्र– सौ. विमलाबाई गरवारे हायस्कूल, पुणे | १५५/२०० |
| **● साहित्य प्राज्ञ:** | १) **पळणिटकर अर्चना परशुराम**<br>केंद्र– महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे | १८५/३०० |
| | २) **तेरेदेसाई स्मिता विजय**<br>केंद्र– महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे | १७४/३०० |
| | ३) **कुलकर्णी मेधा मधुकर**<br>केंद्र– महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे. | १६९/३०० |

डॉ. कल्याणी दिवेकर यांच्या मार्गदर्शनाखाली या वर्षीचे परीक्षाकार्य सुरळीतपणे पार पडले.

डॉ. सौ. मंजिरी नेऊरगावकर, सौ. विद्या केसकर, डॉ. सौ. विनया डोंगरे, डॉ. सौ. कल्याणी हर्डीकर, श्री. शरद अनवलीकर, श्री. हणमंत कुंभार, सौ. वासंती जोशी, सौ. आशा जोशी, सौ. शुभांगी भट, सौ. सुजाता शेणई, सौ. चित्रा नाडकर, डॉ. व. न. कुबेर, प्रा. वैजयंती चिपळूणकर, सौ. मृणाल वैद्य, डॉ. सुचेता वैद्य. डॉ. सौ. सुषमा जोगळेकर, डॉ. मधुरा कोरान्ने, डॉ. निवेदिता जोगळेकर, प्रा. सौ. सुनीता पळसोदकर, श्रीमती रविबाला फाकतकर, डॉ. सौ. उज्ज्वला गोखले, डॉ. मेधा सिधये, श्री. ए. के. सावंत, श्री. व्ही. डी. बारणे, डॉ. सुप्रिया अत्रे या सर्वांनी या वर्षीच्या परीक्षाकार्यात आत्मीयतेने सहकार्य केले. परीक्षा केंद्रांचे संचालक, मुख्याध्यापक व वर्गाची तयारी करून घेणारे शिक्षक या सर्वांचे आम्ही आभारी आहोत.

**ऋणनिर्देश :**

परिषदेच्या कार्यकारी मंडळाने केलेल्या विविध कार्यांत अनेक व्यक्ती आणि संस्था यांचे सतत सहकार्य लाभले. महाराष्ट्र शासन, महाराष्ट्र राज्य शिक्षण खाते, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, विश्वकोश कार्यालय, पुणे महानगरपालिका तसेच परिषदेच्या साहित्यिक साहाय्य निधीस भरघोस साहाय्य देणाऱ्या व्यक्ती व संस्था, सर्व शाखांचे कार्यकर्ते, वृत्तपत्रे, नियतकालिके, आकाशवाणी, नव्याने झालेले आजीव व साधारण सभासद व तसेच हितचिंतक या सर्वांचे आम्ही ऋणी आहोत.

आपले

**गं. ना. जोगळेकर, रवींद्र भट**

**कल्याणी दिवेकर, भगवान ठाकूर**

कार्यवाह

अनुक्रमणिका

| निधी व देणी | | रक्कम |
|---|---|---|
| **विश्वस्त निधी** | | ८,३८,७६१.४५ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ७,२२,६६५.४५ | |
| आजीव सभासद | ५४,०९६.०० | |
| रा.श्री.जोग स्मारकनिधी खात्यातून वर्ग | ६२,०००.०० | |
| **इतर राखीव निधी** | | |
| **अ. इमारत निधी-** मागील ताळेबंदाप्रमाणे | | ८९,६४४.९४ |
| **ब. ग्रंथालय निधी-** मागील ताळेबंदाप्रमाणे | | २३,५७३.१० |
| **क. वाङ्मय इतिहास योजना निधी** | | १,०४,०१२.७४ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ९१,९६३.५९ | |
| १९९२-९३ मधील विक्री | १७,०७९.१५ | |
| ३१-३-१९९३ साठा | ६२,६४०.०० | |
| | १,७१,६८२.७४ | |
| वजा - ३१-३-१९९२ साठा | ६७,६७०.०० | |
| वजा - १९९२-९३ मधील खर्च | ---------- | |
| **ड. पारितोषिक व स्मृतिदिन निधी** | | ४,०५,१५६.०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ३,९५,१५६.०० | |
| १९९२-९३ मधील जमा | १०,०००.०० | |
| **इ. फर्निचर खरेदी निधी -** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | | १०,०००.०० |
| **फ. इमारत नूतनीकरण निधी-** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | | ८१,४२१.०० |
| **ग. साहित्य साहाय्यक निधी** | | २,८१,२७७.५० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | २,५३,४२९.५० | |
| १९९२-९३ मधील जमा | २,८४८.०० | |
| उत्पन्न खर्च खात्यातून वर्ग | २५,०००.०० | |
| **इतर देणी-** | | २५,१९८.२५ |
| **ग्रंथालय अनामत** | | ८३,३२९.०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ७९,८९८.०० | |
| अधिक १९९२-९३ मधील जमा | ३,७९५.०० | |
| वजा - १९९२-९३ मधील परतफेड | ३६४.०० | |

दिनांक ३१ मार्च १९९३ रोजीचे ताळेबंद पत्रक

| जिंदगी व येणी | | रक्कम |
|---|---|---|
| **स्थिर जिंदगी** | | १,२४,६०८.०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | १,२७,८०३.०० | |
| वजा - घसारा २.५ प्रतिशतप्रमाणे | ३,१९५.०० | |
| **गुंतवणूक** | | |
| अ. कर्जरोखे- दर्शनी किमतीचे | | ५,३००.०० |
| कन्व्हर्जन लोन | | २,७००.०० |
| ब. शेअर्स- से. प्रो. रेल्वेज | | २,३००.०० |
| महाराष्ट्र स्टेट को-ऑप बँक लि. | | १,२५०.०० |
| क. विश्वस्त ठेवी | | १२,१७,५००.०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ११,३७,५००.०० | |
| अधिक ९२-९३ मधील गुंतवणूक | २,२४,०००.०० | |
| वजा - ९२-९३ मधील गुंतवणूक परत | १,१३,०००.०० | |
| वजा - उत्पन्न खर्च खात्याकडे वर्ग | ३१,०००.०० | |
| ड. कार्यकारी मंडळ ठेवी | | ९४,०००.०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ५८,२५०.०० | |
| अधिक- ९२-९३ मधील गुंतवणूक | २५,०००.०० | |
| वजा - ९२-९३ मधील गुंतवणूक परत | ------ | |
| अधिक -उत्पन्न खर्च खात्याकडून वर्ग | १०,७५०.०० | |
| इ. ग्रंथालय अनामत ठेवी | ------ | ०.०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | १,०००.०० | |
| वजा - उत्पन्न खर्च खात्याकडून वर्ग | १,०००.०० | |
| **फर्निचर व डेड स्टॉक** | | २३,३९०.४० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | २६,०८९.४० | |
| अधिक - ९२-९३ मधील खरेदी | २००.०० | |
| वजा - ९२-९३ मधील विक्री | ३००.०० | |
| वजा - घसारा १० प्रतिशत | २,५९९.०० | |



अनुक्रमणिका

| निधी व देणी | | रक्कम |
|---|---|---|
| **मराठी फार्स** | | १४,०५४.२३ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | १३,८४६.७३ | |
| अधिक - १९९२-९३ मधील विक्री | ३०७.५० | |
| अधिक - ३१-३-९३ साठा | २१,०४०.०० | |
| | ३५,१९४. २३ | |
| वजा - ३१-३-९२ साठा | २१,१४०.०० | |
| **साहित्य परिषद पारितोषिक निधी** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | | ३,९१४. २५ |
| **संशोधन प्रकाशने** | | १५,४६८.२२ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | १४,६१६.७२ | |
| अधिक - १९९२-९३ मधील विक्री | १,६६१.५० | |
| अधिक - ३१-३-९३ साठा | २२,८९८.०० | |
| | ३९,१७६.२२ | |
| वजा - ३१-३-९२ साठा | २३,७०८.०० | |
| **कै. रा. श्री. जोग स्मारक निधी** | | ०.०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | १०,०००.०० | |
| अधिक - १९९२-९३ मधील जमा | ५२,०००.०० | |
| | ६२,०००.०० | |
| वजा विश्वस्त निधी खात्यास वर्ग - | ६२,०००.०० | |
| **अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ खाते** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | | ५८.३० |
| | **एकूण** | १९,७५,८६८.९८ |

आमच्या आजच्या तारखेच्या अहवालानुसार
पाटणकर ॲण्ड असोसिएट्स् चार्टर्ड अकौन्टन्ट

भागीदार - एन्. सी. भळगट

पुणे, दिनांक १२ / ६ /९३

| जिंदगी व येणी | | रक्कम |
|---|---|---|
| **ग्रंथालय खाते** | | ४२,४६९.३० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ४५,११६.८० | |
| अधिक - १९९२-९३ मधील खरेदी | २,०७१.५० | |
| वजा - घसारा १० प्रतिशत | ४,७१९.०० | |
| **शिल्लक साठा कार्यवाह दाखल्यानुसार** | | १,०६,५७८.०० |
| वाङ्मय इतिहास प्रकाशने | ६२,६४०.०० | |
| संशोधनं प्रकाशने | २२,८९८.०० | |
| मराठी फार्स | २१,०४०.०० | |
| वीज बोर्ड अनामत ( मागील ताळेबंदाप्रमाणे) | | २६०.०० |
| इतर येणी | | ११,०३८.५० |
| वाङ्मय इतिहास इंग्रजी (मागील ताळेबंदाप्रमाणे) | | १,१३४.५० |
| आयकर वसुली | | ३०,५८१.०२ |
| ग्रंथालय अनुदान येणे खाते | | २,५००.०० |
| **अखेरच्या शिलका -** | | १,३३,२३७.२२ |
| रोख | २,१६९.९५ | |
| स्टेब बँक ऑफ इंडिया- ४५०५० | ९५९.३५ | |
| बँक ऑफ बडोदा - ५८४७ | १,८८०.६५ | |
| पुणे पीपल्स को-ऑप बँक लि. २५९० | २८०.९३ | |
| १५९४ | २,२४९.१५ | |
| १८०४ | ६,३७९.०० | |
| देना बँक - करंट खाते एम-२१ | ५३१.५० | |
| बँक ऑफ महाराष्ट्र - १५३० | ३,०५७.०१ | |
| बँक ऑफ बडोदा - करंट खाते | ५१४.२१ | |
| देना बँक - ३४७५ | १,१५,२१५.४७ | |
| **तूट खाते** | | १,७७,०२२.०४ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | १,३३,१२७.९४ | |
| अधिक ठेवी खात्यावरून वर्ग | २१,२५०.०० | |
| अधिक चालू वर्षाची तूट उत्पन्न खर्च पत्रकाप्रमाणे | २२,६४४.१० | |
| | **एकूण** | १९,७५,८६८.९८ |

आमच्या उत्तम माहितीप्रमाणे वरील स्थितीविवरणात दिलेल्या ट्रस्टच्या निधी आणि देयता मालमत्तेचा हिशोब खरा आहे. **महाराष्ट्र साहित्य परिषदेकरिता**

**म. वि. गोखले** — कार्याध्यक्ष

**ना. गो. जोशी.** — कोषाध्यक्ष





अनुक्रमणिका






## महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता,

शेड्यूल ११ नियम १७ (१) प्रमाणे

| खर्च | | रक्कम |
|---|---|---|
| मालमत्तेसंबंधी | | ९,८१७.८० |
| भुईभाडे व म्युनिसिपल कर | १,१७१.०० | |
| जनरल मेन्टेनन्स | ८,६४६.८० | |
| इमारत दुरुस्ती खर्च | ---- | |
| व्यवस्थापन | | १,०१,२८६.०३ |
| पगार | ४२,५०८.१५ | |
| छपाई, टायपिंग, स्टेशनरी | १४,६०३.०० | |
| टपाल व दूरध्वनी | १५,६१६.५५ | |
| कार्यकारी मंडळ सभा खर्च | १०,५३६.७५ | |
| प्रवास व प्रचारकार्य | ६४६.०० | |
| वीज | १७,३०७.८८ | |
| वार्षिक साधारण सभा खर्च | ६७.७० | |
| ऑडिट फी | | २,४५०.०० |
| किरकोळ खर्च | | २३,७०४.२० |
| इतर | १४,१०१.९५ | |
| आतिथ्य | ८,७०७.७५ | |
| बँक कमिशन | ८९४.५० | |
| व्याज | ----- | |
| घसारा | | १०,५१३.०० |
| इमारत | ३,१९५.०० | |
| फर्निचर व डेड स्टॉक | २,५९९.०० | |
| ग्रंथालय | ४,७१९.०० | |
| बुडित खात्यात वर्ग केलेली रक्कम इतर येणे खाते | | ३१,४५१.११ |

पुणे ४११ ०३०.

दिनांक १-४- १९९२ ते ३१-३-१९९३ अखेर कालावधीचे उत्पन्न खर्च पत्रक

| उत्पन्न | | रक्कम |
|---|---|---|
| व्याज (डिव्हिडंड, ग्रॉस) | | १,६१,५४२.२७ |
| देणग्या | | ६८,६१०.२० |
| अनुदान | | १,२६,५००.०० |
| शासकीय | १,००,०००.०० | |
| ग्रंथालय | २,५००.०० | |
| पत्रिका | २४,०००.०० | |
| इतर उत्पन्न | | ५५,८६२.१० |
| परीक्षा | २८,१५७.६० | |
| इतर जमा (टेलिफोन) | १,२५६.०० | |
| साधारण सभासद वर्गणी | ११,६९५.०० | |
| पत्रिका वर्गणी व जाहिरात | १४,४१५.२५ | |
| प्रकाशने | ३३८.२५ | |
| बुडित खात्याकडून वर्ग झालेली रक्कम इतर देणे खाते | | ३१,८९८.७२ |

| खर्च | | रक्कम |
|---|---|---|
| संस्थेच्या उद्दिष्टांकरिता | | २,०६,८६५.०५ |
| साहित्य, सांस्कृतिक कार्यक्रम | २७,०५४.०५ | |
| शाखा सभा | १३,४८०.०० | |
| पत्रिका | १,२५,५५५.३० | |
| ग्रंथालय (वेतन व इतर) | १९,६५२.२० | |
| परीक्षा | २०,४७३.५० | |
| निवडणूक खर्च | १५०.०० | |
| महामंडळ वर्गणी | ५००.०० | |
| पारितोषिक व स्मृतिदिन | | ४८,१७७.४० |
| साहित्यिक साहाय्य | | ७,७९२.०० |
| साहित्यिक साहाय्य निधीस वर्ग | | २५,०००.०० |
| | एकूण | ४,६७,०५७.३९ |

आमच्या आजच्या तारखेच्या अहवालानुसार
पाटणकर ॲण्ड असोसिएट्स् चार्टर्ड अकौन्टन्ट

भागीदार
- एन्. सी. भळगट

पुणे-,

दिनांक १२/ ६ /९३

| उत्पन्न | | रक्कम |
|---|---|---|
| चालू वर्षांची तूट ताळेबंदाकडे वर्ग | | २२,६४४.१० |
| | एकूण | ४,६७,०५७.३९ |

.आमच्या उत्तम माहितीप्रमाणे वरील स्थितीविवरणात दिलेल्या ट्रस्टच्या निधी आणि देयता मालमत्तेचा हिशोब खरा आहे.

**महाराष्ट्र साहित्य परिषदेकरिता**

**म. वि. गोखले**
कार्याध्यक्ष

**ना. गो. जोशी.**
कोषाध्यक्ष





अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

| खाते जमा | संकल्प १९९२-९३ | प्रत्यक्ष १९९२-९३ | संकल्प १९९३-९४ |
|---|---|---|---|
| व्याज व डिव्हिडंड | १,३०,०००.०० | १,३६,५४२.२७ | १,५०,०००.०० |
| साहित्यिक साहाय्य निधी (व्याज) | २८,०००.०० | २५,०००.०० | २५,०००.०० |
| देणग्या (योगक्षेमार्थ) | ७०,०००.०० | ६८,६१०.२० | ७०,०००.०० |
| शासकीय अनुदान | १,००,०००.०० | १,००,०००.०० | १,००,०००.०० |
| सा. सं. मंडळ अनुदान (पत्रिकेसाठी) | १२,०००.०० | २४,०००.०० | १२,०००.०० |
| ग्रंथालय अनुदान (९२-९३ ९३-९४) | २,५००.०० | २,५००.०० | २,५००.०० |
| पत्रिका (वर्गणी, जाहिरात इ.) | १५,०००.०० | १४,४१५.२५ | १७,०००.०० |
| वार्षिक सा. सभासद वर्गणी | ८,०००.०० | ११,६९५.०० | १२,०००.०० |
| परीक्षा शुल्क | १७,०००.०० | २८,१५७.६० | ३०,०००.०० |
| किरकोळ (रद्दी इ.) | ५००.०० | ------- | ५००.०० |
| संशोधन अनुदान | १,०००.०० | ------- | १,०००.०० |
| प्रकाशने | १,०००.०० | ३३८.२५ | २,०००.०० |
| ग्रंथ पारितोषिक व स्मृतिदिन | ८,०००.०० | १०,०००.०० | ८,०००.०० |
| इमारत नूतनीकरण | ------- | ------- | ------- |
| साहित्यिक साहाय्य निधी | ५,८००.०० | १०,६४०.०० | ११,०००.०० |
| तूट | ३३,४००.०० | ------- | ३२,७००.०० |
| | | एकूण | ४,७३,७००.०० |

म. वि. गोखले
कार्याध्यक्ष

ना. गो. जोशी.
कोषाध्यक्ष

कार्यवाह : गं. ना. जोगळेकर, भगवान ठाकूर, रवींद्र भट, कल्याणी दिवेकर

अथसकल्प १९९३-९४

| खाते खर्च | संकल्प १९९२-९३ | प्रत्यक्ष १९९२-९३ | संकल्प १९९३-९४ |
|---|---|---|---|
| म. न. पा. कर व भुईभाडे | १,२००.०० | १,७७१.०० | १,२००.०० |
| इमारत (देखभाल व विमा) | ५,०००.०० | ८,६४६.८० | ५,०००.०० |
| फर्निचर व नवीन सामान | ५,०००.०० | ------ | ३,०००.०० |
| पगार | ४०,०००.०० | ४२,५०८.१५ | ४५,०००.०० |
| छपाई व टंकलेखन, स्टेशनरी | २०,०००.०० | १४,६०३.०० | १६,०००.०० |
| टपाल व दूरध्वनी | १५,०००.०० | १५,६१६.५५ | १८,०००.०० |
| वीज | १७,०००.०० | १७,३०७.८८ | २०,०००.०० |
| कार्यकारी मंडळ (प्रवास) | १०,०००.०० | १०,६०४.४५ | १०,०००.०० |
| प्रवास व प्रचारकार्य | १०,०००.०० | ७,९८९.५० | १०,०००.०० |
| साहि. सांस्कृतिक कार्यक्रम | १५,०००.०० | ११,६५३.८० | १३,०००.०० |
| पत्रिका-कागद, छपाई, टपाल इ. | १,१०,०००.०० | १,२५,५५५.३० | १,३०,०००.०० |
| ग्रंथालय (खरेदी वेतन इ.) | २५,०००.०० | २१,७२३.७० | २५,०००.०० |
| परीक्षा | १७,०००.०० | २०,४७३.५० | २५,०००.०० |
| शाखा सभा (वर्गणी हिस्सा) | ७,०००.०० | १,९८०.०० | ३,०००.०० |
| महामंडळ (सभा व वर्गणी) | ५,०००.०० | ३,०३२.७५ | ३,०००.०० |
| आतिथ्य | ५,०००.०० | ८,७०७.७५ | ८,०००.०० |
| संशोधन | २,०००.०० | ------ | २,०००.०० |
| ग्रंथ पारि. व स्मृतिदिन इ. | ५५,०००.०० | ६६,१७७.४० | ६८,०००.०० |
| हिशोब तपासनीस | २,०००.०० | २,८५०.०० | २,०००.०० |
| किरकोळ | ५,०००.०० | ४,४०१.४५ | ५,०००.०० |
| प्रकाशने | १,०००.०० | ------ | १,०००.०० |
| विभागीय सा. संमेलन | १०,०००.०० | ५,०२४.०० | १०,०००.०० |
| घसारा | १०,०००.०० | १०,५१३.०० | १०,०००.०० |
| विश्वस्त व्यवहार | १,०००.०० | ६८२.५० | १,०००.०० |
| निवडणूक | ५,०००.०० | १५०.०० | ५००.०० |
| साहित्यिक साहाय्य निधी | २५,०००.०० | २५,०००.०० | २५,०००.०० |
| इमारत नूतनीकरण | ५,०००.०० | ------ | २,०००.०० |
| लिगल आणि प्रोफेशनल चार्जेस | ४,०००.०० | ८,३३३.०० | १,०००.०० |
| साहित्यिक साहाय्यनिधी शिल्लक | ------ | ७,७९२.०० | ११,०००.०० |
| | | एकूण | ४,७३,७००.०० |

